श्री

# ज्ञानदेवकृत अमृतानुभव

व त्यावरील

## श्रीशिवकल्याणकृत अमृतानुभवविवरण नित्यानंदैक्यदीपिका.



हा ग्रंथ,

**तीन प्रतींवरून तपासून**

प्रस्तावना आणि कठीण शब्दांचा कोश

यांसहित

**अण्णा मोरेश्वर कुंटे**

**यांनीं**

**मुंबई येथें**

"निर्णयसागर" छापखान्यांत छापविला.

शके १८१०.

# ज्ञानोबा.

आपेगांव या नांवाचें गंगातीरावर एक नामांकित क्षेत्र होतें. तेथील गोविंदपंत या नांवाचे जोशी होते. हे विष्णूचे निस्सीम भक्त होते. ज्ञानेश्वरविजय १–१८ **तैंगोविंदमहानुभाव विलसे सद्विप्रचूडामणी ॥ गैनीनाथकृपे अलभ्यमिनला सज्ञानरूपी मणी ॥ १८ ॥ सारी षट्कर्मयोगाविधिसहित सुखें आश्रमी योगनिष्ठा ॥ नीरायीनामभार्येसह भजत गुरूनाथ गैनी वरिष्ठा ॥ १९ ॥** यांच्या बायकोचें नांव निराबाई, ती परम भाविक व पतिव्रता होती. यांना एक पुत्र झाला. त्याचें नांव त्यांणीं विठोबा असें ठेविलें. आठवे वर्षी याचें मौंजीबंधन केलें. विठोबाकडून वेदशास्त्र अध्ययन करवून काव्यव्याकरणादिकांमध्यें हा निपुण झाला. **वेदाध्ययन धर्मशास्त्र निहिते श्रौतादिसांगे पिता ॥ हा वैराग्यविलासवंत न धरी संसारचिंता कथा ॥ २१ ॥** ज्ञा० वि० १. पुढें विठोबाला तीर्थाटन करावें असा अनुताप झाला. ह्मणून मातापित्यांजवळ आज्ञा मागितली. यापासून वडिलांस समाधान वाटून विठोबास तीर्थाटनास जाण्यास अनुमोदन दिलें. याविषयीं भक्तिविजय अ० ८ ओ० २३—**ह्मणोनी अनुताप धरोनियां मना ॥ विठोबा चालिला तीर्थाटना ॥ माया ममता टाकोनी जाणा ॥ हरिभजनीं विनटला ॥** अशा चित्तवृत्तीनें द्वारका, पिंडारक, सुदामपुरी, मूळमाधव, भालूकातीर्थ सोरटीसोमनाथ, धवलपुरी, व पुराणप्रसिद्ध व जगद्विख्यात अशीं मार्गांत समस्त महातीर्थें वंदन करून सप्तशृंगी, त्र्यंबक व भीमाशंकर हीं उर्कून आळंदीस येऊन पोंचला. तेथें चक्रतीर्थांत स्नान करून घाटावर देवतार्चन करीत बसला असतां, सिधोपंत या नांवाचे त्या गांवचे कुळकर्णी स्नानास आले. त्यांणीं विठोबास नमस्कार करून नामाभिधान पुसलें, व आपण कुठचे, येथें येण्याचें कारण काय, इत्यादि विचारतां आपला वृत्तांत विठोबांनीं सिधोपंतास कळविला. **वदे ग्राम गोदातटीं दिव्य आहे ॥ पितामाय माझी असे तेथ पाहे ॥ ३७ ॥ घरीं वृद्ध मातापिता क्षेत्रवासी ॥ अपेगांवची वृत्ति तेथील जोशी ॥ यजुर्वेदवाजीसनी शुद्ध शाखा ॥ असें बोलतां तोष पंतासि देखा ॥ ३८ ॥** सिधोपंताची एकुलतीएक रखमाबाई या नांवाची कन्या होती. तिला चांगलें स्थल मिळावें, या शोधांत ते फार दिवस होते. अनायासें हा प्रसंग फार उत्तम घडून आला, कारण विठोबाचें सौजन्य व भक्ति पाहून, व कुलवृत्त ऐकून, हा आपल्या रुखमिणीस योग्य वर आहे असा त्यांचा निश्चय झाला. **ज्ञानी रूपस सत्कुलीन तरणा सत्सूतपस्वी असा ॥ विद्यावंत विचारशील सुचिता सौजन्य सिंधू तसा ॥ गांभीर्यादिगुणें सदा विलससी सत्पात्र भाग्यें अह्मां ॥ जामाता हरिनें दिल्हा न करितां सायास ये आश्रमा ॥ ४३ ॥** ज्ञा० वि० १ मग सिधोपंतांनीं विठोबाची प्रार्थना केली कीं, आज आमचें घर आपण पवित्र करावें. मग त्यांना घरीं घेऊन गेले, व त्यांचा सामोपचार केला. एकदोन दिवस राहून घेऊन त्यांचे जवळ लग्नाची गोष्ट काढली. जरी प्रथम विठोबाच्या मनांत वृद्ध मातापितरांच्या अनुमोदनाशिवाय दूरदेशांत लग्न करावें असें आलें नाहीं; तथापि तो योग घडून आलाच. लग्नानंतर कांहीं दिवसांनीं

सासूसासरा, व विठोबा आणि त्यांची पत्नी आषाढीस पंढरीस गेलीं. तेथें तें रमणीय क्षेत्र, तो भगवन्नामाचा गजर, त्या भक्तांच्या झुंडी, तीं प्रेमळ निरूपणें, व सर्व जातीच्या भक्तांमध्यें परस्परांविषयीं समदृष्टी पाहून विठोबाच्या मनावर मोठा संस्कार झाला. पुन्हा सहकुटुंब ही मंडळी आळंदीस आली. विठोबांनीं आपला रामेश्वरास जाण्याचा मनोदय सिधोपंतांस कळविला, व त्यांचें अनुमोदन घेऊन पुन्हा पंढरीस जाऊन तेथून अनुक्रमानें, शैलपर्वत, मल्लिकार्जुन, वेंकोबाचा गिरी, गोकर्ण अशीं पहात पहात रामेश्वरास पोंचले. मग परत येतांना कोल्हापूर, माहुली इत्यादि तीर्थें करून आळंदीस येऊन पोंचले. रस्त्यावर विठोबाची वृत्ति कशी होती याविषयीं भक्तिविजय अ० ८ ओं० ७६९ **मार्गीं चालतां सत्वर गती ॥ हृदयीं चिंती विठ्ठलमूर्ती ॥ मुखीं गात नाम कीर्ती॥ सप्रेम गती करूनी ॥** आळंदीस पोंचल्यानंतर आतां मातापिता यांचें दर्शन घ्यावें असें मला वाटतें आहे, तरी आतां मला आज्ञा द्यावी अशी सासऱ्याची प्रार्थना केली. **आपुले कांतेसहवर्तमान ॥ घ्यावें वडिलांचें दर्शन ॥ आह्मीं येत असों बोळवण ॥ भेटीकारणें तयांच्या ॥ ८६ ॥ मग कन्या जामात घेवोनी पाहीं ॥ सिधोपंत आले आपेगांवीं ॥ गोविंदपंतासी लवलाहीं ॥ येऊनियां भेटले ॥ ८७ ॥** विठोबाचा घरसोडल्यापासून परत येई तोंपर्यंत सर्व वृत्तांत ऐकून विठोबाचा बाप गोविंदपंत व आई निराबाई यांस मोठा संतोष वाटला. **वस्त्रें भूषणें उभयतांशी ॥ सिधोपंत देत सन्मानेशी ॥ आज्ञा मागुनी आळंदीशी ॥ परतोनि आले तेधवां ॥ ९२ ॥** कांहीं दिवस लोटल्यानंतर विठोबाचीं वृद्ध मातापितरें निवर्तलीं. संसाराची खटपट ही विठोबास कधीं माहीत नव्हती, तशांत त्याचा सर्व काळ प्रथम अध्ययन, मग तीर्थाटन व भगवद्भजन यांमध्यें गेला असल्यामुळें मातापितरांच्या निवर्तनानंतर विठोबा अगदीं विरक्त झाले. ॥ **संसार चिंतेचा विटाळ ॥ कदा न धरीच विठ्ठल ॥ जैसे येतां तीन्ही काळ ॥ समसमान सर्वांशी ॥ ९४ ॥** अंगचें औदासीन्य व नुकतींच व्याही व विहीण निवृत्त झालीं आहेत ह्मणून जामाताचा एकवेळ समाचार घ्यावा ह्मणोन सिधोपंत आपेगांवास आले. याकरितांः— **मग ह्मणे जामातासी ॥ तुह्मीं तो विरक्त उदासी ॥ सर्व पदार्थ संसारासीं ॥ नित्यानित्य पाहिजे ॥ ९८ ॥** तर कृपा करून मजबरोबर आळंदीस चला. आळंदीस आल्यानंतर विठोबाच्या चित्तास कांहीं समाधान वाटलें. साधू संतांचें दर्शन, नित्य हरिकीर्तन, व दर आषाढी कार्तीकीस पंढरीची यात्राः—ह्या क्रमानें त्या क्षेत्रांत विठोबाचीं बरींच वर्षें लोटलीं. पुत्रसंतान नाहीं, ह्मणोन चित्तास औदासीन्य उत्पन्न झालें, व काशीस जाऊन संन्यास घ्यावा, असा त्याच्या मनाचा ग्रह झाला. कोणत्याहीप्रकारें आळंदींतून सुटका करून घेऊन विठोबा काशीस येऊन पोंचले. तेथें श्रीरामाश्रम या नांवाचे संन्यासी यांस शरण जाऊन संन्यासदीक्षा प्राप्त होण्याकरितां त्यांचे चरण धरिले. रामांश्रमानीं कांता, पुत्र, परिवार यांची विचारपूस करितां, विठोबांनीं मला दारापुत्रादि कांहीं नाहींत ह्मणून चित्तास अनुताप होऊन, दुस्तर संसार, दुर्धर व अनिवार माया, व जन्ममरणांचा येरझार, यांपासून मुक्त होण्याकरतां स्वामींना सद्भावानें शरण आलों आहें, अशी विनंती केली. स्वामीनीं याची विरक्त चित्तवृत्ति पाहून संन्यासदीक्षेस हा योग्य असें वाटून त्यांनीं त्याकरवीं संन्यासग्रहण करविलें, व त्याचें नांव चैतन्य असें ठेविलें. स्वामीपासून चैतन्यास मोठा लाभ झाला



ज्ञा० वि० २ २९ **श्रीशारीरकभाष्य तें पढविलें गीता सभाष्यें बरी ॥ श्रीवासिष्ठ अहर्निशीं गुरुमुखें शोधोनि निष्ठा धरी ॥ नानायोगमतें विचित्र निरखी अध्यात्मबोधी हिता ॥ वेदांतोपनिषद्विचार घडला संतोष दे आयिता ॥** कर्णोपकर्णीं सिधोपंतांस व रखमाबाईस विठोबाच्या चतुर्थाश्रमाची बातमी समजली ॥ **कानीं ऐकुनी संन्यासवार्ता ॥ रडे आक्रोशें पतिव्रता ॥ समाधान करतां मातापिता ॥ मग धैर्यें चित्ता आवरिलें १२६** जन्माचें सार्थक करावें ह्मणून रखमाबाईनीं अश्वत्थाची सेवा आरंभिली. एके दिवशीं त्या आश्वत्थाच्या पारावर श्रीपाद स्वामी येऊन बसले होते. हे येथें कसे आले, याविषयीं:—ज्ञा० वि० २. ३१.३२ **अकस्मात काशींत याच्या गुरूतें ॥ मनीं वाटलें या मठीं विठ्ठलातें ॥ सुखें स्थापिजे जायिजे रामलिंगा ॥ पुन्हा येइजे सेविजे देवगंगा ॥ ३१ ॥ असें वाटतां नीघता होय वेगीं ॥ पथीं चालतां ये अळंदीस मार्गीं ॥ अकस्मात आकाशपुष्पाप्रमाणें ॥ विधीनें तया आणिलें हेंचि माने ॥ ३२ ॥ यती ओढिला सत्य ईच्या तपानें ॥ अकस्मात अश्वत्थनारायणानें ॥** त्यांस पाहून सद्भावानें रखमाबाईनें नमस्कार केला. "अष्टपुत्रा सौभाग्यवती भव" असा आशीर्वाद स्वामींनीं देतांच रखमाबाईस हसूं आलें. श्रीपाद विचारतात, माझ्या आशीर्वादाचा आपणांस विनोद कां वाटला ? रखमाबाई ह्मणतात, महाराज चित्तास अनुताप होऊन मला भ्रतारांनीं सोडून संन्यासग्रहण केलें आहे. तेव्हां हा आशीर्वाद फलद्रूप कसा व्हावा? तरुण स्त्री संतानहीन टाकून जर संन्यासग्रहण झालें, तर शास्त्रामध्यें गुरू व शिष्य या दोघांस दंड सांगितला आहे, व दोघांसही प्रायश्चित्त घ्यावें लागेल, असें मनांत आणून रखमाबाईपाशीं त्यांच्या भ्रताराच्या खाणाखुणा विचारूं लागले. अंतीं हा शब्द आपल्यावरच येत आहे अशी त्यांची खात्री झाली. आपलीं कोणीं वडिल आहेत काय व त्यांचीं माझी गांठ पडावी अशी स्वामींनीं इच्छा दर्शित केल्यावरून रखमाबाईनें सिधोपंतास बोलावून आणलें. अधिक विचारपूस करतां आपला शिष्य जो चैतन्य तोच इचा नवरा अशी त्यांची खात्री झाली. मी चैतन्यास मठाधिकारी करून रामेश्वराचे यात्रेस निघालों व रस्त्यांत रखमाबाईपासून हें वृत्त ऐकून माझ्यावर दोष येत आहे व माझें सुकृत लयास पावत आहे करितां रखमाबाईस बरोबर घेऊन आपण मजबरोबर काशीस चलावें असें स्वामीनें सिधोपंतास सांगितलें. वाराणशीस पोंचल्यानंतर आश्रमांत जाऊन चैतन्यास खरा वृत्तांत काय हा पुसल्यानंतर तो ह्मणाला ॥ **ह्मणे तरुण कांता संतानहीन ॥ सत्यची टाकोनी आलों जाण ॥ १६९ ॥** स्वामी ह्मणाले, आपल्या पत्नीचा अंगीकार करून स्वदेशास जावें, व स्वधर्म आचरावा. व ह्मणाले कीं:—॥ **अविधी कर्माचें भय मानिसी ॥ विकल्पा झणी चित्तीं धरिसी ॥ माझी आज्ञा प्रमाण तुजसी ॥ हृषीकेशी साह्य तुज ॥** असा आशीर्वाद होतांच चैतन्यांनीं स्वामीचे पाय धरिले. सिधोपंत; जामात व कन्या घेऊन आळंदीस आले; व विठोबा गृहस्थाश्रमांत येऊन पुनरपि रखमाईसीं संसार करूं लागले. या संबंधानें गांवांत दुर्जनांचे अनेक आक्षेप होऊं लागले ॥ **एक ह्मणती विषयलंपट ॥ एक ह्मणती कृपण कंटक ॥ एक ह्मणती याचें मुख ॥ पाहूं नये सर्वथा ॥१५२॥ द्विजीं घातलें वाळीत ॥ आप्तवर्गीं सांडिलें त्वरीत ॥** अशा या स्थितींत विठोबांनीं गावांच्या बाहेर एक खोपटी बांधून कांतेसहित

राहिले व उदरपोषणार्थ भिक्षा मागूं लागले. **कुटुंबपोषणाकारण ॥ भिक्षा मागुनी मिळवी अन्न ॥ रात्रंदिवस नामस्मरण ॥ नाहीं खंडण क्षणमात्र ॥ १८२ ॥ गीता भागवत श्रवण मनन ॥ अखंड चित्तीं समाधान ॥ ऐसीं द्वादश वर्षें लोटतां जाण ॥ पोटीं संतानें जहालीं ॥ १८३ ॥ तिघे पुत्र कन्या एक ॥**

या चार मुलांचीं नांवें निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई. निवृत्ती हे शालिवाहन शके ११९० त जन्मले. ज्ञानदेव ११९३ त, सोपानदेव ११९६ त व मुक्ताबाई ११९९ त. दिवसें-दिवस हीं मुलें थोर झालीं. विठोबा स्वतः वेदशास्त्रसंपन्न व भक्तिमान असल्याकारणानें या चारही मुलांना तोच मार्ग लागला. अनुक्रमानें निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई हीं १५, १२, ९, ६ इतक्या वर्षांचीं होईतोंपर्यंत यांना सर्व रीतीचीं बापाचा कित्ता लागला. कीर्तन, भजन, अध्यात्माविषयीं विवेचन, वेद, शास्त्र, पुराण व इतिहास इत्यादिकांतील कथा व विषय यांची यांना माहिती झाली. बापाचा सुशील व भक्तिमान नित्यक्रम, सदा सार्वकाळ हरिस्मरण, ऐहिक सर्व विषयांचें वैराग्य, व एक विठोबाची भक्ति यांविषयींचा प्रेमा हा या चार भावंडांत मोठ्या प्रबल रीतीनें उत्पन्न झाला. केवळ बापाच्या वर्तनाच्या बाह्य संस्कारानेंच हीं मुलें प्रवीण झालीं असें ह्मणतां येत नाहीं. उपजत यांच्या बुद्धीच तीव्र होत्या, ह्मणोन सर्व बापाचे वर्तनाचें यांनीं केवळ अनुकरण केलें असें नाहीं, परंतु यांच्या बुद्धीवर भक्तिमार्गाचा पक्का ठसा उठला. तशांत यांच्या वडिलांनीं यांच्याकडून अध्ययनही करविलें. ज्ञानोबाच्या चरित्रामध्यें हा काल मोठा महत्वाचा आहे. याविषयीं उल्लेख पुढें करूं. मुलांच्या मुंजींचा सुखसोहळा आपण पहावा असें आईस वाटूं लागलें. ती यजमानास ह्मणाली, कीं, हीं तीन मुलें मुंजीयोग्य झालीं आहेत. आपण तर बहिष्कृत, याकरितां ब्रह्मवृंदांस विनंती करून धर्मशास्त्रांतून सवड काढून आपणास प्रायश्चित्त मिळावें, अशी तजवीज करावी. ह्मणोन ब्रह्मवृंदांची आळंदी येथें सभा जमविली. त्यांत मोठे शास्त्री व वैदिक होते. ह्यांनीं अनेक ग्रंथांचें विवेचन केलें, परंतु यांच्या प्रायश्चित्ताची तोड कोठेंच सांपडेना! देहांत प्रायश्चित्त हा एक प्रकार, पण याचा उपयोग काय? विठोबा निराश झाले. यांनीं दारापुत्रांचा त्याग करून थेट प्रयागाचा रस्ता धरला. व तेथें त्रिवेणींत देहार्पण केलें. याविषयीं नामदेव ज्ञानदेवेश्वरादींत ह्मणतात ॥ **श्रीपाद ह्मणती अवश्य करीन ॥ देह हें दंडीन अनुतापें ॥ ४ ॥ त्रीवेणी संगें मी घालीन कवती ॥ गेला पूर्व स्थिति वीत रागें ॥ ५ ॥ दारा पुत्र गृह त्यजूनी निघाला ॥ नमस्कार केला द्विजवृंदा ॥** असें ह्मणतात कीं, रखमाबाईला आपल्या भ्रताराचा यथार्थ शेवट समजल्यावर तिनेही आईबापांच्या स्वाधीन हीं चार मुलें करून तोच मार्ग धरिला. माता पिता आह्मांला त्यागून गेलीं. आह्मी आश्रयहीन दीन झालों, तर आमच्या संगोपनाचा अभिमान आपणास असावा असें निवृत्तींनीं सांष्टांग नमस्कार करून ब्राह्मणवृंदास सांगितलें, तर यापुढें आमची गति काय? या संबंधानें आज्ञा व्हावी असें विनयपूर्वक सुचविलें. ब्राह्मणांला यांची कांहीं दया आली नाहीं! तुमच्याबरोबर भाषण देखील करूं नये, तुमचें दर्शन झालें असतां सचैल स्नान करावें, असें द्विजांचें उत्तर आलें. मग काय विचारावें! चौघांना गहिंवर दाटून आला व सृष्टि निर्माणकर्ता जो सर्वेश्वर याला दूषण देऊं लागले. **तूं विश्व सृजिता सर्वेश्वर ॥ आह्मां का-**

**सया निर्मिलें ॥ ६९ ॥ विधातया ह्मणती विधी ॥ कां ललाटीं लिहिला अविधी ॥** असा प्रकार पाहून विप्र गहिंवरले. तुह्मांस पत्र देऊन पैठणास पाठवूं, व तेथील ब्रह्मवृंदाची जशी आज्ञा होईल तसें करूं. आपल्या जन्माच्या सार्थकाचा धर्मशास्त्राशिवाय दुसरा कांहीं प्रकार निघेल तर बरें, असा निवृत्तीचा निश्चय झाला. ना. ली. अ. २८. **असो सर्वोपरी निराधार ॥ आ-ह्मां कर्म क्रिये नसे आधार ॥ जरी धांवे गुरू दीनोद्धार ॥ निश्चय निर्धार गुरुप-दीं ॥ ७६ ॥ जे पितामहाचे श्रीगुरू समर्थ ॥ संकटीं पातले गहीनी नाथ ॥ निवृ-त्ती मस्तकीं देवूनी हस्त ॥ उपदेश देत तयांतें ॥ ९६ ॥ ह्मणती वत्सा पाहे पाहे ॥ तुह्मांस नसे भव भयाचे भये ॥ माझे सुप्रसन्न वरप्रसादें ॥ त्रैलोक्य विजय पावाल ॥ श्री आदिनाथ, मच्छेंद्र, गोरक्ष पर्यंत ॥ माळिका निवेदिली तयातें ॥ सद्गुरू आ-ज्ञापिती निवृत्तीतें ॥ उपदेश त्रिवर्गातें देईजे ॥** हा वृत्तांत झाल्यानंतर हीं ज्ञानदेवादि चार भावंडे आपसांत विचार करूं लागलीं. नामदेवकृत ज्ञानेश्वरआदि **अभंग १८. ह्मणती सकळ द्विज जावें प्रतिष्ठाना ॥ तेथूनी पत्र आणा वंद्य करूं ॥ १ ॥ नाहीं जाती कूळवर्णा अधिकार ॥ क्षत्रिय वैश्य शूद्र द्विज नव्हे ॥ २ ॥ नहो देवगण य-क्ष ना किन्नर ॥ ऋषी निशाचरते ही नहो ॥ ३ ॥ ते आह्मि अविनाश अव्यक्त जु-नाट ॥ निजबोधें इष्ट स्वरूप माझें ॥ ४ ॥ नहो आप तेज वायु व्योम मही ॥ महत्तत्वतेंही विराट नहो ॥ ५ ॥ नव्हे मी सगुण नव्हे मी निर्गुण ॥ अनुभूतीं भजन होऊनी नहो ॥ ६ ॥ निवृत्ती ह्मणतसे ऐके ज्ञानेश्वरा ॥ माझी परंपरा ऐसी आहे ७** नामदेवकृत ज्ञानेश्वरआदि—**अभंग १९. विधिवेद विरुद्ध संपर्क संबंध ॥ नाहीं भेदा-भेद स्व स्वरूपीं ॥ १ ॥ अविधि आचरण परम दूषण ॥ वेदोनारायण बोलियेला ॥ २ ॥ स्वधर्म अधिकार जाती परतत्व भेद ॥ उचित तें शुद्ध ज्याचें तया ॥ ३ ॥ ह्मणोनियां संतीं अवश्य आचरावें ॥ जना दाखवावें वर्तोनियां ॥ ४ ॥ कुळींचा धर्म अवश्य पाळावा ॥ सर्वथा न करावा अनाचार ॥ ५ ॥ प्रत्यवाय आहे अशा-स्त्रीं चालतां ॥ पावन अवस्था जरी झाली ॥ ६ ॥ ज्ञानदेव ह्मणे ऐकावें निवृ-त्ती ॥ बोलिली पद्धती धर्मशास्त्रीं ॥ ७ ॥** नामदेवकृत ज्ञानेश्वरआदि—**अभंग २०. हेंचि आह्मां श्रेष्ठ बोलिले केपरनिष्ठ ॥ असतां दुर्घट परि सेव्य असे ॥ १ ॥ पांड-वांचें कूळ शोधितां निर्मळ ॥ कुंडजारगोळबुद्धि कैशी ॥ २ ॥ भक्ति हे सरती जाती न सरती ॥ ऐशी आत्मस्थिती स्वसंवेद्य ॥ ३ ॥ दुर्वासी वसिष्ठ अगस्ती गौतम ॥ हे ऋषी उत्तम कुळींचे कैसे ॥ ४ ॥ व्यास आणी वाल्मीक कोण कूळ तयांचें ॥ तैसें न आमुचें सोपान ह्मणे ॥ ५ ॥ घेऊनियां पत्र निघाले सत्वर ॥ क-रोनी नमस्कार सकळांशी ॥ ६ ॥** याप्रमाणें परस्परांचा संवाद होऊन ब्राह्मणांस नमस्कार करून त्यांनीं पैठणचा रस्ता धरला. रस्त्यांत बरेच दिवस लागले. कित्येक ह्मणतात, कीं हे प्रथम त्र्यं-बकेश्वरास जाऊन तेथें कांहीं दिवस राहून नंतर पैठणास गेले. कांहीं असो आळंदी सोडल्यापा-सून ते पैठणास पोचततोंपर्यंत यांचा बराच काळ गेला असें वाटतें. पैठणांत ब्राह्मणांची सभा करून

आपला सर्व वृत्तांत त्यांस निवेदन केला. पत्र वाचून हे कां आले आहेत हेंही ब्रह्मवृंदांस श्रुत झाले त्यांणीं बहुत रीतीनें विचार करून पाहिला. परंतु प्रायश्चित्ताची सवड कोणत्याहीपरी निघेना, तथापि ते ह्मणाले:—**परी एकची उपाय यातें ॥ बोलिला असे शास्त्रमतें ॥ तो करितील तरी यांतें ॥ प्रायश्चित्त कासया ॥ ४१ ॥ श्रीहरीसी जाउनी शरण ॥ सर्वांभूतीं करावें भजन ॥ गोखरगजादि श्वान ॥ समसमान वंदावे ॥ ४२ ॥** याप्रमाणें ऐकून निवृत्ति, सोपान, व ज्ञानदेव यांना परमानंद वाटला. ते ह्मणाले, जसें आमच्या मनांत होतें तशीच धर्मनीतिही निघाली. मुक्ताबाईनेंही या यांच्या ह्मणण्यास रुकार दिला. सभेंत जमलेल्या ब्राह्मणांनीं निवृत्ती, सोपान, ज्ञानेश्वर व मुक्ति हीं नांवें ऐकून मोठें आश्चर्य मानिलें; व त्या वेळेस व त्यानंतर जितके दिवसपर्यंत हीं भावंडें पैठणास होतीं तोंपर्यंत त्यांचें वर्तन, विद्या, व भक्ति, पाहून त्यांची खात्री झाली; व हीं नांवें यथार्थ आहेत असें त्यांस वाटलें. **पैठणींचे जन समस्त ॥ सप्रेमभावें वेधले बहुत ॥ ह्मणती धन्य वैष्णवभक्त ॥ संसारीं विरक्त सर्वदा ॥ ७६ ॥ नित्य करुनी गंगास्नान ॥ वेदांतव्याख्या पुराणश्रवण ॥ रात्रीं होत हरिकीर्तन ॥ करिती श्रवण सकळीक ॥ ७७ ॥ हे वेदत्रय मूर्तिमंत ॥ यांसी न चले प्रायश्चित्त ॥ कीं जगद्गुरु देहातीत ॥ जीवन्मुक्त असती हे ॥ १०३ ॥** पैठणांत यांच्या भगवद्भक्तीची फार कीर्ति झाली. हें पत्र घेऊन जेव्हां आळंदीस जावयास निघाले, त्या वेळेस—**गांवाबाहेर निघतां जाण ॥ बोळवीत चालले ब्राह्मण ॥ अश्रुपातें भरले नयन ॥ देती क्षेम प्रीतीनें ॥ ११२ ॥ सद्गदहोऊनियां चित्तीं ॥ एकमेकांतें उत्तर बोलती ॥ ह्मणती ज्ञानेश्वराचे संगती ॥ उत्तम काळ क्रमियेला ॥ ११३ ॥ एक अर्ध कोशपर्यंत ॥ नरनारी आल्या बोळवीत ॥ तयासी ज्ञानेश्वर विनवीत ॥ परतोनि जावें मंदिरा ॥ ११४ ॥** हे मार्गक्रमण करित असतां नानापरींच्या कविता करून हरीचे गुण वर्णून कीर्तनें करीत महालय (नेवासे) या नांवाचे क्षेत्रांत आल्यानंतर मोहनीराज यास भेटले. एथें ज्ञानेश्वरांनीं भावार्थदीपिका या नांवाची प्राकृत भगवद्गीतेवर टीका केली. श्रीनिवृत्तिनाथ यांनीं मोठ्या प्रेमानें ज्ञानदेवास ह्मटलें, कीं तूं गीतेवर टीका केलीस हें ठिकच झालें, कारण गीतेचा जो अर्थ अगदीं गहन आहे. त्यावर प्राकृत लेखन आपण केलेंत यांत प्रेमळ जे भाविक जन आहेत यांस ज्ञानप्राप्ती होइलच. आतां आपण स्वबुद्धीच्या उत्कर्षानें अमृत ह्मणजे, अखंड, अशी जी वस्तु, जिचा अनुभव सर्वकाळ, सर्वदेशीं, सर्वावस्थेंमध्यें सर्वांस आहे, व जी सिद्धच आहे, तिचा अनुवाद आपण करावा. **अवश्य ह्मणूनी तये क्षणीं ॥ मस्तक ठेविला सद्गुरुचरणीं ॥ मग स्वात्मबुद्धीनें विचारूनी ॥ अमृतानुभव ग्रंथ केला ॥ १२४ ॥** आळंदीहून निघाल्यापासून पैठणास येईतोंपर्यंत बराच काळ क्रमला असें वर ह्मटलें आहे. या कालामध्यें गैनीनाथाचे आज्ञेप्रमाणें निवृत्तीनें आपल्या तिन्हीही भावंडांस उपदेश केला. ज्ञानदेव आदीमधील जे तीन अभंग वर घेतले आहेत, त्यांत निवृत्तीचें केवळ तादात्म्यस्वरूप झालेलें आहे असें अठराव्या अभंगावरून स्पष्ट समजतें, परंतु ज्ञानोबाचा शिष्टाचार रक्षणकरण्याचा आग्रह, शास्त्रविधी न उल्लंघन करण्याची इच्छा, ही ऐकुणिसावे अभंगावरून स्पष्ट दिसते. सोपानानें तर शास्त्रामध्यें जरी विधिनिषेधांचे प्रकार पुष्कळ असले, तथापि अगदीं नीच जा-

तीचे पावन झाले, इतकेंच नाहीं, तर वाल्मिकादिकांसारखे जगद्वंद्य झाले आहेत, असा कांहीं उद्गार काढला आहे. आत्मप्रतीतीविषयीं या भावंडांमध्यें विषमता या अभंगांच्या लेखावरून दृष्टीस पडते. परंतु पैठणाहून निघतांना अथवा तेथें असतांनाही ही विषमता जाऊन श्रीनिवृत्तीनाथाच्या उपदेशाचा परिणाम पूर्ण झाला आहे असें दृष्टीस पडतें. महालयक्षेत्राहून हे आळंदीस येण्यास परत निघाले, **मार्गीं चालतां चौघेजण ॥ सप्रेम करिती नामस्मरण ॥ रात्रीं नगरांत उतरून ॥ हरिकीर्तन करिताती ॥ १२७ ॥** विषमता जाऊन अखंड चिदैकरसाचें अस्वादन यांना झालें आहे असें या खालील लेखावरून दिसतें. **माया ममता मानापमान ॥ सांडोनि देहाचा अभिमान ॥ ब्रह्मादि पिपीलिकादि करून ॥ लेखिती समान समदृष्टी ॥ १२८ ॥** आळंदीस येऊन पोंचल्यानंतर यांनीं जें पैठणचें पत्र आणिलें होतें तें ब्रह्मवृंदांस दिलें. यांची विद्वत्तेची कीर्ति, विराग, सौजन्य व आत्मज्ञान हीं पैठणचे पत्रांत स्पष्ट लिहून पाठविलीं असावींत. **सप्रेमकरितां हरिकीर्तन ॥ श्रवण करिती सकळ जन ॥ ह्मणती आह्मांकारण ॥ अवतरले सद्गुरू ॥ १४२ ॥** याप्रमाणें हरिकीर्तनांत व आनंदांत हीं भावंडें काळ क्रमूं लागलीं. हें सर्वांस मान्य होतें, तथापि विसोबा यानांवाचा श्रीमान व कर्मठ एक ब्राह्मण होता, तो यांचा तिरस्कार करी. तथापि यांचा सहवास झाल्यानंतर हाही सात्विक होऊन त्यांचाच भक्त झाला. **होतां नारदाचें दर्शन ॥ वाल्मिकें टाकिला तामसगुण ॥ तेवीं ज्ञानदेवाचे संगती करून ॥ सात्विक लक्षण आलें कीं ॥ १९९ ॥**

आळंदींत असतां चांगदेव नामाचा योगी ज्ञानदेवादिकांस भेटावयास आला. हा हठ्योगामध्यें फार प्रवीण होता, अशी याची ख्याती होती. हठ्योगाच्या सिद्धीला व चांगदेवाच्या महिमेला मान देणारे असे याचे बहुत शिष्य होते. ह्मणतात कीं हा व्याघ्रावर बसे व याच्या हातांत सापाचा चाबूक असे. यांनीं ज्ञानेश्वराची महिमा सर्व देशभर पसरलेली ऐकिली, व त्यांना भेटावें असें चांगदेवाचे मनांत आलें. ज्ञा० वी० ॥१॥ ९ ॥ **वेदत्रयासम विराजति देहधारी ॥ हे ब्रह्मसारपुतळे जगसौख्यकारी ॥ जे वर्तती निजविलासगुणे सदाही ॥ सत्कीर्तिघोष अतिवाहत देशदाही ॥ ९ ॥ ऐसा विचित्र महिमा महिमाजीं ऐके ॥ तो चांगया निघत शिष्य कुळें अनेकें ॥ व्याघ्रावरी वळघला बहु योग सिद्धि ॥ दावी जना सुकृत वैभव तत्समृद्धी ॥ १३ ॥** चांगोबाची व ज्ञानोबाची गांठ पडल्यानंतर साक्षात ज्ञानसंपन्न चिदानंदरसांत निमग्न असे हे साधू पाहून, अमृतानुभव हा योगसिद्धीपेक्षां अनंत पटीनें मोठा अशी खात्री होऊन, चांगोबांनीं मुक्ताबाईपासून उपदेश घेतला. **भेटोनि ज्ञानफळ पाउनि स्वच्छ झाला ॥ याचा अहंकृतिविलास बरा विझाला ॥ ओझें जुनाट अति टाकुनि शुद्ध झाला ॥ मुक्ताकृपे परम मुक्तिपदाशि गेला ॥ १६ ॥**

एके दिवशीं ज्ञानदेव पंढरपुरास गेले. मनांत इच्छा ही, कीं नामदेवाची भेट घ्यावी. ज्ञानोबा आपणाला भेटायाला आले याचें नामदेवास मोठें आश्चर्य वाटलें. ज्ञानोबा ह्मणतात, आपल्याला आह्माला कांहीं विचारावयाचें आहे. **कांहीं एक जीवींचें गुज ॥ ऐकशील तरी सांगेन तुज ॥ नामदेवासी हातीं धरूनी सहज ॥ अंतर मंदीरीं पैं नेलें ॥ १७ ॥ ह्मणे जिवन्मुक्त**

झालिया पावन ॥ न सांडिजे गुरुदेवतीर्थभजन ॥ भूतळींचीं तीर्थें संपूर्ण ॥ तुझि-या संगतीनें पाहवीं ॥ १८ ॥ ऐसा हेत धरूनी चित्तीं ॥ तुझे भेटीस आलों प्रीति ॥ माझे मनोरथ पूर्ण होती ॥ किंवा न होती मज सांगा ॥१९॥ ऐसें वचन ऐकोनी ॥ नामा उद्विग्न झाला मनीं ॥ ह्मणे पंढरी क्षेत्र टाकोनी ॥ तीर्थाटनीं कां जावें ॥ नामदेवाला मनापासून पंढरीक्षेत्र सोडावें व इतर तीर्थें करावीं असें वाटेना. तथापि ज्ञानदेवाचा अति आग्रह, त्याला तोडवेना; ज्ञानोबा ह्मणाले. परी नामया ऐसा प्रेमळ भक्त ॥ घडावी संगत मज याची ॥ याचे संगतीचें घेऊनि सुख ॥ देहाचें करावें सार्थक ॥ मग दोघांनीं पंढरीक्षेत्र सोडिलें. रस्त्यावर ज्ञानाच्या गोष्टी परस्पर करीत चालले. नामदेव हे भक्त, यांच्या भक्तीचा मार्ग नामस्मरण. ज्ञानदेव हे चिद्रूपरसांत निमग्न अमृतअनुभवी; तेव्हां अर्थात नाम व ज्ञान यांमध्यें कांहीं विसंगती पडूं लागली. नामदेव ह्मणे मी नेणें ॥ योग युक्ति साधन ॥ माझी विश्रांती जगजीवन ॥ भक्त खरा परंतु तूं मी याचा भेद अजून मोडला नाहीं. नामदेवा ऐक; येरू ह्मणे रे प्रेमळ भक्ता ॥ त्यावीण ठावची न दिसे रिता ॥ भेदभाव सांडुनी आतां ॥ हृदयीं अद्वयता ओळगावें ॥ आतां एकमेकांची समजूत पडावी ह्मणून ॥ ज्ञानदेव ह्मणे नामयासी ॥ तुवां स्वाधीन केला हृषीकेशी ॥ तो भक्तिमार्ग मजपाशीं ॥ विस्तारासी सांगावा ॥ १३ ॥ कवणेरीतीं करावें भजन ॥ कैसें करावें श्रवण मनन ॥ कैसें आहे निदिध्यासन ॥ धृतिधारण कोणतें तें ॥ नामदेव ह्मणतातः— मी नेणें बहुव्युत्पत्ती ॥ मी नेणता वहु अज्ञान ॥ आणि तुह्मी पुसता अध्यात्मज्ञान ॥ कल्प तरू याचक होऊन ॥ कृपणमंदिरा पातला ॥ मग नामदेवांनीं जे ज्ञानोबाचे प्रश्न होते त्यांचें उत्तर दिलें. व भक्ति आणि ज्ञान यांच्या गोष्टी करीत रस्त्यावर ठिकठिकाणीं कीर्तन करीत दिल्लीस येऊन पोंचले. तेथील यवनराजा भगवद्भक्तांविरुद्ध होता. तथापि गांवांतील लोकांच्या झुंडीच्या झुंडी यांच्या कीर्तनास जमत. त्या राजानें या भगवद्भक्तांची पुष्कळ तऱ्हेनें परीक्षा केली. अंतीं त्याला यांच्या वैराग्याची, ज्ञानाची, व भक्तीची खात्री होऊन यांना मान देणें जरूर पडलें. दिल्लींतून निघून हे काशिक्षेत्रास येऊन पोंचले. रस्त्यावर ज्या तीर्थावर अथवा गांवांत उतरत तेथें भाषापरत्वें कविता करून हरिकीर्तनें करीत चार महिने हे काशींत राहिले. तेथें यांची व कबिराची गांठ पडली. कबिराची कीर्ति अति अद्भुत ॥ नामदेवासी जाहली श्रुत ॥ मग ज्ञानदेवासी सांगोनी मात ॥ आले भेटीस कबिराच्या ॥९९॥ भ० वि० अ० ११. ज्ञानदेवानें कबिरास सांगितलें कीं दक्षिणमहाराष्ट्रांत पंढरी या नांवाचें क्षेत्र आहे तें आपण येऊन पहाल तर आपले मनास संतोष होईल. हें ऐकून कबीर ह्मणाले, आह्मी एखाद्या कार्तिकीस येऊं. मग गया, प्रयाग, अयोध्या, मथुरा, द्वारावती, इत्यादि ठिकाणीं राहून मारवाडदेशांत आले. मारवाडांतून बद्रिकाश्रम, हिमाचल, ओढ्या-जगन्नाथ, केदार, उज्जनी, परळी वैजनाथ, सोरटी सोमनाथ, मल्लिकार्जुन, नाशिक, त्र्यंबक, हीं क्षेत्रें फिरून, पश्चिम समुद्राच्या बाजूनें भीमाशंकरास आले. तेथून रामेश्वराकडे चालले व परत फिरतांना आंवढ्या नागनाथास आले. तेथें एक दोन दिवस राहून कीर्तनें केलीं. या कीर्तनांपासून तेथील मंडळीस मोठा आनंद झाला. यांच्या कीर्तनानें सर्व जातींची मंडळी इतकी तल्लीन होऊन गेली कीं,

महिपती ह्मणतात, ती मंडळीः— **श्रवणीं ऐकतां श्रीहरीचे गुण ॥ विदेही होऊनि बैसले ॥१००॥** भ० वि० अ० १२. **ध्यानांत आणूनी जगजेठी ॥ अल्हादें टाळिया पीटिती ॥ विठ्ठलनामें गर्जना करिती ॥ आनंद चित्तीं न समाये ॥ १०१ ॥** तेथील कर्मठ ब्राह्मणांना हा टाळघोष आवडला नाहीं. ते ह्मणाले, उगाच गोंगाट करावा, टाळ्या पिटाव्या, मोठ्यानें हांका माराव्या, हे संताळे खेळ पंढरीसच शोभतात, नागनाथास आवडत नाहींत. आह्मीं, उंच वर्णाचे ब्राह्मण आहोंत. आह्मी सर्वज्ञ शास्त्राधिकारी असतां हा नामदेव उगाच वल्गना काय करितो. परंतु नामदेवाची निःस्पृहता, व तें सिद्धांत ज्ञान ऐकून, ब्रह्मवृंदांनीं आपला अभिमान सोडून नामदेवाची व ज्ञानोबाची प्रशंसा केली. असे फिरत फिरत हे पंढरीस आले. नामदेवानें पंढरी पाहतांच त्याला मोठा आनंद झाला. या ठिकाणीं अनेक भक्तमंडळी यांना भेटावयास आली. येथें यांनीं आपले तीर्थाचें उद्यापन केलें.

पंढरीस असतां तीर्थयात्रा करून आलेले हे साधु, यांना भेटण्याकरितां गोराकुंभार, सावंतामाळी, कूर्मदास, भानुदास, नरहरीसोनार, आणि चोखामेळा इत्यादि महा प्रसिद्ध भक्तिवैराग्यशील साधु भेटण्यास आले होते. ज्ञानदेवाची स्थिति या वेळेस लोकदृष्ट्या अतिविलक्षण झाली होती. ते विनंती करून सर्व साधूंस ह्मणाले कीं, आतां आपण समाधिस्थ व्हावें अशी इच्छा उत्पन्न झाली आहे. कांहीं काळ पंढरींत घालवून हे आळंदीस आले. तेथें अनेक ठिकाणची व विशेषेंकरून पंढरीची पुष्कळ संतमंडळी जमली. कार्तिक वद्य अष्टमी शके १२१९ या दिवशीं ज्ञानोबा समाधिस्थ होणार ह्मणून, असें ह्मणतात, कीं इंद्रायणीच्या तीरावर एक मोठा मंडप उभारला, व कीर्तनें होऊं लागलीं. सिद्धेश्वर या नांवाचें जें मोठें तेथें देऊळ आहे त्या देवळाच्या वामभागीं अजान वृक्षाच्या छायेखालीं दोन खणांची गुहा तयार केली; व त्रयोदशीच्या दिवशीं सर्व सिद्ध साधु इतक्यांच्या समक्ष मोठ्या आनंदांत यांनीं गुहेंत प्रवेश केला. यांचे समाधीचें वर्तमान फार दूरदूरच्या गांवांत पसरलें होतें, ह्मणून समाधि घेण्यापूर्वीं व समाधिस्थ झाल्यानंतरही आळंदींत मोठी गर्दी झाली होती. अधिकारपरत्वें ज्ञानोबाविषयीं मंडळीच्या मनांत नानातऱ्हेंचे तरंग उत्पन्न झाले.

ज्ञानोबाचें निवळ चरित्र या प्रकारचें आहे. यांच्या चरित्रास साधनः— नामदेवकृत ज्ञानदेवआदि, भक्तिविजय, संतलीलामृत, भक्तितत्वामृत, मत्स्येंद्रसंहिता, मुक्तितत्वामृत, मुक्तिकथासार, नाथलीलामृत, कथाकल्पतरू इत्यादि ग्रंथ आहेत. शके ११९३ वांत ज्ञानोबाचा जन्म झाला. शके १२१९ रांत हे समाधिस्थ झाले. यांनीं केलेले ग्रंथः— त्यांत मुख्य १—भगवद्गीतेवरील प्राकृत टीका (भावार्थदीपिका अथवा ज्ञानेश्वरी.) २—अमृतानुभव. ३—अभंग ज्यांत डौर, मदालसा, दिउटा, आंधळें, पांगुळ, मुके, सौरी, बहिरे, बाळसंतोष, पंचीकरण, वासुदेव, असे लहान लहान प्रबंध आहेत. ४—उत्तरगीतेवर टीका. ५—योगवासिष्ठावर टीका. ६—चांगदेव पांसष्टी. व ७—हरिपाठ. ज्ञानदेवाचे चरित्राचे चार विभाग होतात. जन्मल्यापासून ते आईबाप मेरे तोंपर्यंत जो काल गेला हा प्रथम भाग. साधारण वर्षानुक्रमानें ह्मटलें असतां ज्ञानोबा या वेळेस बारा वर्षांचे असावे. दुसरा विभाग निवृत्तीची नुसती संगती, ह्मणजे निवृत्तीशीं ज्ञानोबाचा बंधुरूपानें सहवास. तिसरा, ज्ञानोबास निवृत्तीपासून उपदेश मिळून निवृत्ति गुरु व ज्ञानोबा शिष्य या तऱ्हेचा दोघांचा सहवास. चवथा, ज्ञानोबाची स्वतंत्र-

पणें वागणूक ह्मणजे त्यांचा आळंदी येथील वास, पंढरपुरची यात्रा, नामदेवासह तीर्थाटण, व समा
जावत्कालपर्यंत ज्ञानोबाचा आपल्या भावंडांसकट मातापित्यांशीं सहवास होता, तावत्कालपर्यंत जे
संस्कार ज्ञानोबाचे मनावर व त्यांचे भावंडांचे मनावर घडले, त्याहींकरूनच त्या सर्वांची एक विलक्षण
स्थिति होऊन राहिली. ज्ञानोबाचा बाप विठोबा. हा भगवद्भक्तांच्या घराण्यांतील. याचा वडील
गोविंद जोशी. यांना गैनीनाथाचा उपदेश मिळाला होता. गोविंदपंतांनीं विठोबाकडून वेदाध्ययन
करविलें होतें. ह्मणजे अर्थात दश ग्रंथांचा संस्कार यांना पूर्ण झाला होता. हे काव्य, व्याकरण, व न्याय,
हेही पढले. नंतर यांणीं एक मोठें तीर्थाटण केलें. त्या तीर्थाटणांत, नानादेश, नानारीतिभाती, नाना
पंथ, नाना तऱ्हेचे भक्त, नाना तऱ्हेचीं देवतार्चनें हीं अनुभवास आलीं. नंतर यांनीं संन्यास घेतला.
त्या वेळेस त्यांच्या गुरूनीं यांकरवीं शारीरसूत्रादिक ब्रह्मविद्येवर जे ग्रंथ आहेत, त्यांचें अध्ययन
करविलें. या अध्ययनाला अन्य दर्शनाचें अध्ययन हें अवश्य साधन आहे. कारण अस्तिक आणि
नास्तिक दर्शनांची चांगली ओळख झाल्याशिवाय ब्रह्मसूत्रें व शारीरकभाष्य हीं चांगलीं समजावयाचीं
नाहींतच. अशा तऱ्हेचे वेदशास्त्रसंपन्न विठोबा. केवळ शास्त्रसंपन्नच नव्हेत, परंतु हे भक्तिसंपन्नही
होते. नामस्मरण, पंढरीची वारी, हरिकीर्तन, देवाच्या गुणानुवादाचें निरूपण, हा सतत यांचा ने-
हमीं क्रम असे. स्वभावतः हे अनुतापी असत. तशांत मातापितरें मेलीं यामुळें, पुढें पुत्रसंतान हो-
ईना यामुळें, गुरूपदेशावरून, बहिष्कृतस्थितींतील अडचणीपासून, व शेवटीं प्रायश्चित्त मिळेना याव-
रून, विठोबा हे केवळ मूर्तिमान वैराग्यच होते. रखुमाबाईचीही स्थिति अशाच तऱ्हेची. तिचीं आईबापें
भगवद्भक्त. तिचा भ्रतार हा असा वर वर्णन केलेला, बहु गुणांनीं संपन्न. यावरून, व भ्रतारानें संन्यासग्रहण
केलेल्या कालामध्यें तिचें औदासीन्य, व बहिष्कृतस्थिति, या सर्वांचा परिणाम अति औदासीन्य, मोठें
वैराग्य व निःसीमभक्ती, अशी झाली होती. ज्ञानोबाचा अशा दोन व्यक्तींशीं रात्रंदिवस समागम. त्या
मुळें आईबापांच्या भक्तीचें व वैराग्याचें अनुकरण, त्यांत विठोबापासून मिळालेलें शिक्षण, याचा परि-
णाम कोणाही साधारण मुलावर मोठा व्हावयाचाच; तर ज्याची उपजत विशाल बुद्धी, अशा ज्ञानो-
बावर एक मोठा जगडव्याळ संस्कार झाला होता. वेदाध्ययन, नीति व धर्मशास्त्र, काव्य, व्याकरण,
न्याय, इतिहास व पुराणें यांमध्यें ज्ञानोबाचा प्रवेश बापामुळें फार उत्तम झाला. पुढें निवृत्तीच्या समाग-
मापासून आणीक एक दुसऱ्या तऱ्हेचा संस्कार झाला. आईबापांनीं प्रायश्चित्त मिळावें ह्मणून आळं-
दीच्या ब्राह्मणांची याचना केली; ती याचना निरुपयोगी होऊन मातापितरांनीं देहत्याग केला. अशा
संकटांत हीं चार अनाथ भावंडें व त्या सर्वांचे निवृत्ति हे दादा. इतर तीन भावंडांचा सांभाळ आप-
ल्यावर येऊन पडला, कर्ममार्गापासून ह्मणजे श्रुतिस्मृतिपुराणोक्त व लोकव्यवहारिक शुचिर्भूत-
पणा आपणांस येत नाहीं, आपण सर्वथैव पतित, असा विचार मनांत येऊन सृष्टिनिर्माणकर्ता
जर सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, सर्वन्यायी असा कोणी आहे, तर आह्मीं जे सृष्ट यांना या अशा दुःखांत
ठेवणें हें त्याला लांछन आहे. तर लांछनाजोगता प्रकार नसून केवळ व्यवहारांतच गडबड आहे. अशी
निवृत्तीची खात्री होऊन, याशिवाय दुसरा कांहीं प्रकार आहे कीं काय ह्मणून शोधूं लागतां अद्वैत-
सिद्धांताचे प्रवर्तक गैनीनाथ हे त्यांस भेटले. त्यांपासून सर्व संशयांची निवृत्ति होऊन निवृत्तिनाथास
पूर्णदशा प्राप्त झाली. प्रवृत्तीच्या घोंटाळ्यांत असणारे निवृत्ति अशा स्थितींत, प्रवृत्ति व निवृत्ति-

रहित निवृत्ति, अशा दोन्हींस्थितींच्या निवृत्तींशीं ज्ञानोबाचा समागम झाला. यानंतर जे अन्य मार्ग, त्यांत प्रबळ दोन मार्ग, असे लोकप्रचारांत त्यावेळेस होते; एक योग, व दुसरा केवळ नामस्मरणानें ईश्वरप्राप्ति, त्याविषयीं ज्ञानोबा विचार करूं लागले. अद्वैतसिद्धांताचे पूर्ण मर्मज्ञ हे होते. "सर्वं खल्विदं ब्रह्म". या सृष्टिव्यापारांत मुळीं सृष्टीच नाहीं, व्यापारही नाहीं, मग त्या व्यापरांतर्गत सुखदु:ख, ज्ञानअज्ञान, पतितपावन, बद्धमुक्त, अशीं हीं द्वंद्वें कोठून असणार! जें ज्ञानअज्ञानरहित, जन्ममृत्युरहित, सुखदु:खादिरहित, जें कांहीं एक अनिर्वचनीय आहे; ज्याचा अनुभव प्रत्येकास आहे, व जें प्रत्येक आहे, व जें साध्यसाधनरहित व नामानामव्यतिरिक्त, जें सदा प्राप्त त्यास योगाभ्यासानें काय साध्य होतें, व नामानें काय प्राप्त होतें, हें ज्ञानोबांनीं आपल्या स्वतंत्रस्थितीमध्यें पाहिलें. या वेळेंतच यांचा व चांगदेवाचा समागम झाला, व याकारणास्तवच नामदेवाला बरोबर घेऊन यांनीं तीर्थाटणें केलीं. नाम व ज्ञान, हीं दोन्हीं पडताळून पाहिलीं. यावरील लेखावरून ज्ञानोबाच्या चरित्राचे जे चार भाग होतात ते स्पष्ट लक्षांत येतील.

दुर्दैव ह्मणा अथवा सुदैव ह्मणा, या हिंदुस्थानासारखा देश या महीतलावर दुसरा नाहीं. भुगोलविद्येसंबंधी पाहिलें असतां हिंदुस्थानाचें वैचित्र्य, भूगर्भविद्येसंबंधी पाहिलें असतां हिंदुस्थानाचें वैचित्र्य, पदार्थविज्ञानामध्यें वैचित्र्य, उद्भिद्, खनिज, धातु, मणी, मंत्र, औषधी, शिल्पविद्या, इत्यादि सर्वप्रकारें अधिभौतिकांत हिंदुस्थान विचित्रच विचित्र. विद्युद्वातावरणादि प्रकार जे आधिदैविक, यांतही वैचित्र्य; अध्यात्माविषयीं तर हा प्रकार विशेषच आहे. "नाना देव नाना मतें ॥ पाहूं जातां असंख्यातें ॥" असें एका कवीचें ह्मणणें आहे. केवळ धर्म व मतानें वैचित्र्य आहे एवढेंच नाहीं, तर भाषा, वर्ण, व्यवहार, पेहराव, आकृति, व्यवसाय यांमध्यें देखिल वैचित्र्यच. शेवटीं राज्यव्यवस्थेची हीच तऱ्हा. कोण जाणे परमात्म्याचा हा अंश असाच काय!! असो. ज्ञानोबा निर्माण होण्यापूर्वी अध्यात्मसंबंधानें या हिंदुस्थानांत नाना तऱ्हेचे प्रकार होऊन गेले होते. अनादि वेदधर्म, ज्यांत केवळ भक्तिवात्सल्य मुख्य होतें; यज्ञयागादि ज्यांत कर्ममार्ग प्रबल होता; अध्यात्मविवेचन ज्यांत वैराग्य विशेष होतें; अशी ही बरेच वर्षांची प्राचीन धर्मव्यवस्था, या वेळचे भक्तिमार्गाचे प्रवर्तक ऋषि, यज्ञयागादिकाचे प्रवर्तक आचार्य, व अध्यात्मविवेचनाचे प्रवर्तक ब्रह्मवादी. या ब्रह्मवाद्यांमध्यें मतविकल्प उत्पन्न होऊन ब्रह्मप्राप्ति अथवा मोक्ष याचें विवेचन होऊं लागलें. सृष्टि निर्माण झाली कशी? सृष्टिनियंता कोण आहे? आपली येथें स्थिति कां? जगतांत चित्रविचित्र प्रकार कां दिसतात? व, यांची परिसमाप्ति कोठें? असे हे गहन विचार उत्पन्न झाले, या विचारांला साधनें काय आहेत. तर हीं साधनें निर्माण झालीं. या साधनांच्या अनुरोधानें या वरील सर्व विषयांचें विवेचन होऊं लागलें. या विचारांमध्यें मतांतरें पडून, षड्दर्शनें उत्पन्न झालीं. यांच्या विचारसरणीमध्यें शाब्दप्रमाण अथवा आप्तवाक्य ह्मणजे वेद, याचें मोठें प्राधान्य आहे. वेद प्रमाण मानणारे मुनी यांना वेदवाक्याचा समन्वय करून व्यवस्था करावी लागली. परंतु वेदालाच प्रमाण न मानणारे असा एक वर्ग या मुनींमध्यें उत्पन्न झाला. यांच्या मताच्या प्रमुख लक्षणांवरून यांना सूचक नांवेंही मिळालीं. बौध्द, चार्वाक, लोकायतिक, आदिकरून एक दुसरा मुनिवर्ग उत्पन्न झाला. वेदप्रमाण मानणारे यांना अस्तिक असें ह्मणूं लागले. वेद प्रमाण न मानणारे यांना नास्तिक असें

ह्मणतात. पुढें अनेक देवतार्चनें प्रचारांत आलीं. त्या त्या देवतेच्या आराधनेवरून, प्राभाकर, रसे श्वर, माहेश्वर, पाशुपत, अशीं मतें उत्पन्न झालीं. होतां होतां स्थानमाहात्म्यानें, नानातीर्थें व नान दैवतें हीं प्रचारांत आलीं. ठिकठिकाणीं नदी, पर्वत, गुहा, दरी, सरोवरें, झरे, यांचीं माहात्म्यें उ त्पन्न होऊन सर्व हिंदुस्थानभर तीर्थांची व पवित्र स्थानांची रेल चेल होऊन गेली. हिंदुस्थानांतील सनातन धर्म वैदिक या वेदाला अनुसरून ह्मणजे वेद प्रमाण धरून ज्या मताचें, ज्या तीर्थांचें, ज्या देव तेचें, ज्या वस्तुविशेषाचें आराधन होई, तोच हिंदुधर्म व याव्यतिरिक्त जे, ते, वेदबाह्यधर्म, असा प्र घात पडला. वेदबाह्य धर्मापैकीं अति अडचण करणारें असें मत ह्मटलें ह्मणजे बौद्धाचें, त्यांत शू न्यवाद व विज्ञानवाद हे तर अगदीं दुरुत्तरच झाले. अधिकारपरत्वें या बौद्ध लोकांनीं व्यवस्थ केली. राजापासून ते रंकापर्यंत यांनीं धर्मव्यवस्थेची मांडणी केली. हजारो राजे व असंख्य प्रजा बौद्ध होऊन राहिले. वेदधर्म बुडतो असें मोठें संकट येऊन पडलें व बौद्धधर्म उन्मूलन करण्यास पुन्हा व्यवस्थापक उत्पन्न झाले. यांपैकीं कुमारिलभट्ट, मंडणमिश्र शंकराचार्य हे प्रमुख. अशा मंडळींनीं धर्म- व्यवस्था केली खरी तथापि जीं पूर्वीच्या देवता व स्थानें होतीं हीं असंख्य होऊन, हिमालयापासून तों रामेश्वरापर्यंत, एक मोठा प्रचंड धर्माचा व्यवहार उत्पन्न झाला. नाना सांप्रदाय उत्पन्न होऊन या सांप्रदायाचे अधिकारीही उत्पन्न झाले. या प्रत्येक सांप्रदायाचे अनुयायीवर्ग निरनिराळे झाले. सांप्रदायांत कांहीं गूढ तत्वें उत्पन्न होऊन गुरुशिष्यपरंपरा बसली. ज्यांना या सांप्रदायांत शिरण्या- स कठीण पडूं लागलें, त्यांना एक सोपा मार्ग निघाला. त्या सोप्यामार्गाचें नांव नामस्मरण. अशी व्यवस्था ज्या वेळेस पूर्णदशेस आली त्या वेळेस ज्ञानोबाचा अवतार झाला. निवळ ऋषीपासून तों नामस्मरण भक्तीपर्यंत जे अनेक मतव्यवहार अस्तिक व नास्तिक या देशांत उत्पन्न झाले या सर्वांचा पूर्ण विचार करून जो मोठा अनुग्रह या सिद्धपुरुषानें करून आह्मांस कसें पावन केलें आहे, हें आतां पाहूं या. याला आधार ज्ञानोबाची गाथा व अमृतानुभव.

यांच्या ग्रंथांपैकीं ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, अभंग डौरादिकाची गाथा, चांगदेवपांसष्टी व हरिपाठ हे ग्रंथ सहज उपलब्ध होतात. या ग्रंथांवरून ज्ञानोबाचें यथार्थ ज्ञान होतें. सर्व भगवद्भक्तांमध्यें हे शिरोमणी का ? यांचा अधिकार काय ? यांनीं आह्मावर काय उपकार केले आहेत? व यांच्यापासून आह्मी लाभ कसा करून घ्यावा ? याविषयीं चार अक्षरें लिहितों. भावार्थदीपिका अथवा जी लोक- प्रसिद्ध ज्ञानेश्वरी ही भगवद्गीतेवरील टीका. ज्ञानेश्वरीविषयीं उल्लेख करण्याच्या पूर्वीं स्वतः भग- वद्गीता इचें माहात्म्य काय आहे तें पाहूं. अध्यात्मविचाराचा ज्या शास्त्रांत उल्लेख आहे, ह्मणजे ज- गद्वंद्य वेदापासून, ब्राह्मण, उपनिषदें, षड्दर्शनें, स्मृति, इतिहास, व पुराण, ज्यामध्यें, सर्वतः, अथवा अं- शतः जगतोत्पत्ती, मनुष्यधर्म, बंध व मोक्ष व ज्ञान आणि अज्ञान अशा तऱ्हेच्या विषयांचा उल्लेख केला आहे. यांची पृथक् पृथक् विचारणा केली असतां, त्या प्रत्येकांत एकदेशता दृष्टीस पडते. ह्या एकदेशतेनें परस्परांशीं विरोध पडतो. ह्या विरोधाच्या योगानें प्रत्येक शास्त्रमतास एकदेशीयव्यक्तित्व उत्पन्न होतें, आणि ह्या व्यक्तित्वाच्या योगानें त्या त्या शास्त्राच्या अनुयायी लोकांत जरी हिंदु या नांवानें ऐक्य आहे तथापि मोठें गहन मतांतर असून मैत्रभावांत विकल्प येतो. हा घोटाळा दूर करण्यास जो भगवंतांनीं प्रयत्न केला, व प्रयत्न नव्हे, परंतु तो घोटाळा दूर केला, ह्यांत जें शास्त्र उत्पन्न झा-

लें ह्याचें नांव गीता. हें गीताशास्त्र अनेक ठिकाणीं अनुवादिलें आहे. अधिकारानुरूप व मतवात्सल्य ह्यामुळें गीताशास्त्राचे अर्थ अनेक झालेले आहेत. हा प्रकार श्रीमच्छंकराचार्य, मध्व, रामानुज, वल्लभ, श्रीधर, नीलकंठ, शंकरानंद, मधुसूदन इत्यादिकांच्या भाष्यांवरून, मतभेदाच्या अनुरोधानें गीताशास्त्राचे भिन्न भिन्न अनुवाद झाले आहेत हें सहज लक्षांत येतें. अधिकारपरत्वें जें वर ह्मटलें, यांत ही, असाच प्रकार झाला आहे. अधिकारपरत्व व्हावयाला कारणें अनेक आहेत. व्युत्पत्तीच्या योगानें जे नानावाद करावे हे एक जातीचे अधिकारपरत्व, केवळ भाषेच्या ज्ञानानें जो गीताशास्त्राचा अनुवाद होतो हे दुसरें, व केवळ भक्तीच्याच भरानें जो अनुवाद करावा हे तिसरे. अशा तऱ्हेचीं अधिकारपरत्वें शोधावयास गेलें असतां अनेक निघतील. याचीं उदाहरणें जीं प्राकृत अथवा हिंदुस्थानांतील अनेक भाषेमध्यें गीतेचीं भाषांतरें झालीं आहेत, तसेंच यवन लोकांनीं जीं भाषांतरें केलीं आहेत त्यांवरून ही गोष्ट लक्षांत येण्यास सुलभ आहेत. निवृत्तिमहाराज यांनीं ज्ञानोबास गीतार्थ प्रकट करण्यांत प्रसाद दिला, ह्मणजे जें सर्व शास्त्रांचें माहेर, व ज्या गीताशास्त्राचा हाच उद्देश आहे कीं, अनेक आर्यमतांचा मेळ बसवावा व मुमुक्षूनें कर्म, ज्ञान, व उपासना यांतील कोणताही पक्ष स्वीकारला असतां चित्तास समाधान व्हावें. ज्ञानोबांनीं गीतार्थ मराठी भाषेंत प्रकट केला आहे. ज्ञानोबाचा अधिकार फार मोठा होता. हा ह्यांच्या चरीत्रावरून लक्षांत येतोच. तशांतून निवृत्तिनाथांचें ह्यांना पाठबळ. गीतार्थ जसा आहे तसा प्रगट करावा येवढाच काय तो ज्ञानेश्वरी या टीकेचा उद्देश. यांत ज्ञानोबाचा स्वानुभव प्रकट करण्यास सवड नाहीं. गीतेविषयीं अर्थगांभीर्याचें केवढें माहात्म्य आहे व तो स्पष्ट करण्यास निवृत्तीची केवढी मदत हें खालील वेंच्यांवरून समजेल. ज्ञा० १—५४॥ **हे अपार कैसेनि कवळावें ॥ महातेज कवणें धवळावें ॥ गगन मुठींत सुवावें ॥ मशकें केवीं ॥** अ० ६ ॥ ३२॥ **ते बुद्धिही आकळितां सांकडे ॥ ह्मणऊनी बोली विपाये सांपडे ॥ परी श्रीनिवृत्तीकृपा दीप उजेडे ॥ देखोन मी ॥** अ० ९ ॥३२॥ **तव श्रीगुरु ह्मणती काइ जाहलें ॥ हें समस्तही आह्मां पावलें ॥ आतां सांगे जें निरूपिलें ॥ श्रीकृष्ण देवें ॥** अ० ॥ १० ॥ ४९ ॥ **तैशी देशी आणि संस्कृत वाणी ॥ एका भावार्थाच्या सुखासनीं ॥ शोभती ऐणी ॥ चौखट ऐका ॥** अ० ॥ ११ ॥ २२॥ **तव श्रीनिवृत्तीदास ह्मणे ॥ जी श्रीकृष्णार्जुनांचें बोलणें ॥ मी प्राकृत काय सांगों-जाणें ॥ परी सांगावा तुह्मीं ॥** अ० १४—१४६ ॥ **तया अक्षरा आंतील भाव॥ पाववीन मी तुमचा ठाव ॥ ऐका ह्मणे ज्ञानदेव ॥ निवृत्तीचा ॥** आतां कोठें कोठेंही स्वानुभवाचे मासले दृष्टीस, पडतात ते केवळ, अध्यायाच्या अवतरणांत अथवा उपसंहारांत अल्पच सांपडतात. अ० १४–१३ **नाद ब्रह्म खुजे ॥ कैवल्यही तैसें नसजे ॥ ऐसा बोल देखिजे ॥ जेणें देवें ॥** अ०१७—१७ ॥ **जें सर्वथा सर्वही नोहिजे ॥ तें अद्वैता तुंतें लाहिजे ॥ हें जाणें मी वर्म तुझें ॥ आराध्यलिंगा ॥** ज्ञानेश्वरींत गीतार्थाचा उल्लेख करणें हेंच मुख्य वर्म आहे. त्यांत ज्ञानोबास स्वातंत्र्य नाहीं.

देवानें जग उत्पन्न केलें, त्यांत प्राणिमात्र सर्व पदार्थ सृष्ट आहेत. पापपुण्यानुसार उंचनीचपणा जगतांत दृष्टीस पडतो. पुण्यवान पुरुषास धन, दारा, शरीरसंपत्ति, यांचें सुख असतें व तो वार-

वार पुण्यमार्गांत राहून अंतीं स्वर्गप्राप्ती पावतो. पाप्यास नरकप्राप्ती आहे. चौऱ्यांशीं लक्ष योनींचा येरझार हा प्रत्येकाचे पाठीं लागला आहे. अशा तऱ्हेचे जे साधारण कर्ममार्गाचे व्यवहार यांला अनुसरूनच ज्ञानोबाचें पहिल्या अवस्थेंतील समजः— या सर्व प्रपंचांतून सुटण्यास ऐहिक सर्व पदार्थांचा त्याग करून, समसमान बुद्धि ठेऊन, हरीचें भजन करणें, विठोबाला शरण जाणें, पंढरीची यात्रा करणें, व नेहमी सगुण स्वरूपाचें ध्यान करणें, हा भक्तिमार्ग या वेळीं ज्ञानोबाचा होता. अष्टांगयोगादिक साधनें, अथवा इतर जीं वेदशास्त्रपुराणांत सांगितलेलीं यज्ञतपदानादि सर्व निरुपयोगी आहेत. तसेंच काशी, अयोध्या, इत्यादि महान तीर्थें पंढरीपुढें कांहीं नव्हत. नामस्मरण हाच सर्व मार्गांमध्यें उत्तम मार्ग; उत्तम नव्हे परंतु हा एकच मार्ग. असें या खालील वेंच्यांवरून सहज लक्षांत येईल. आरंभीं आवडी आदरें आलें नाम ॥ तेणें सकळ सिद्धिजगीं जालें पूर्णकाम ॥ १ ॥ १ ॥ पतितपावन साचे ॥ श्रीविठ्ठलाचें नाम वाचे ॥ २ ॥ २ ॥ गातां वातां नाचतां प्रेम उल्हासें ॥ चराचरीं दोष नाशियले अनयासें ॥ ३ ॥ २ ॥ गोपाळारे तुझें ध्यान लागो मना ॥ अनू नविसंबे हरी जगत्र जीवना ॥ ४ ॥ १ ॥ विश्वाचें जिवन तें म्या सारदेखियलें ॥ योगीध्याती ध्यानीं ब्रह्म तेंचि गोकुळाशीं आलें ॥ ६ ॥ ४ ॥ सांवळें सगूण सकळा जीवांचें जीवन ॥ घनानंदमूर्ती पाहातां हरपलें मन ॥ ७ ॥ २ ॥ तयाचें करीपां स्मरण ॥ आळसू न करीं अंतःकरण ॥ ९ ॥ १ ॥ कर्मातें शंभू मानी आपण ॥ किति पळसी कर्माभेण ॥ बापरखुमादेवीवर विठ्ठला-शरण ॥ केलीं कर्में निवारी नारायण ॥ १२ ॥ ६ ॥ रंगा येइ वो ये रंगा येइ वो ये ॥ विठाई कींठाई माझे कृष्णाई कान्हाई ॥ १५ ॥ ॥ १ ॥ पंढरिचे देवते ॥ विठ्ठल नवसी येवो ॥ १६ ॥ २ ॥ अष्टांग योगें न सिणीजे ॥ यमनेम निरोधन न कीजेरया ॥ १९ ॥ १ ॥ जाइनगे माये तया पंढरपुरा ॥ भेटेन माहेर आपुलिया ॥ २२ ॥ १ ॥ सकळही माझें गोत पंढरीसी जाण ॥ बापदेवीरखुमावरा विठ्ठलाची आण ॥ २५ ॥ २ ॥ माझें जीवींचें तुह्मीं कावो नेणा ॥ माझा बळिया तो पंढरीराणा वो माये ॥ २८ ॥ १ ॥ नामरूपीं प्रीती कीं ध्यानीं सगुणमूर्ती ॥ हेंचि तुझी यशकीर्ती जाणोनियां ॥ हृदईं तुझें रूप मुखीं नामघोष ॥ ९१ ॥ १ ॥ पुत्र कलत्र संपत्ति देखोनी संतोष मानीसी ॥ घडीमाजी नासोनि जाईल जैसें कां अभ्र आकाशीं ॥१०९ ॥ ३ ॥ आह्मां सगूण निर्गूण समान ॥ नेणो जन्म जातक भान ॥ दृश्य द्रष्टा दर्शन त्रिपुटी नलगे माहावाक्यादी शब्द तत्व मत्स्यादि बोध हे ही ॥ आह्मां सकळ वाऊगेरया बापरखुमादेवीवरू विठ्ठलू चिंतिता ॥ ११७ ॥ ३ ॥ चौऱ्याशीं लक्ष योनी क्रमुनीं सायासीं ॥ नरदेहा ऐसें भांडवल पावलाशी ॥ जतन करीरे गव्हारा ॥ नभजें नभजें यासंसारा ॥ बीज सांडुनी असारा वाया झोंबतोशी ॥ ११९ ॥ १ ॥ जीवाचिया-जीवा प्रेमभावाचियाभावा ॥ तुजवांचुनीकेशवा अनूनावडे ॥ १९७ ॥ १ ॥

घरदार वोखटें त्यजूं ह्मणसी तरी शरीरायेवढें जाड ॥ मायबाप वोखटी त्यजूं ह्मणसी तरी अहंकार अविद्येचें कोड ॥ बंधुसखे त्यजूं ह्मणसी तरी काम

क्रोध मद मत्सर अवघड ॥ बहिणी पाठिच्या त्यजूं ह्मणसी आशा तृष्णा माया अवघड रया ॥ १ ॥ त्यजिलें तें काय कासया ह्मणिजे सांगपां मजशीं ऐसें ॥ जया भेणें तूं जाशी वनांतरातें तव तुजचि सरिसेरया ॥ आपुले आश्रमीं स्वधर्मीं असतां सर्वत्र एकुचि जाणा ॥ बापरखुमादेविवरू विठ्ठलु इतुकीयासाठीं नेईल वैकुंठभुवना ॥ ३ ॥ २७४ ॥ पंढरपुरिचा निळा लावण्याचा पुतळा ॥ विठो देखियला डोळा बाई येवो ॥ ३०५ ॥ १ ॥ कटावरी ठेऊनी हात जना दाऊ संकेत ॥ भवजळाब्धीचा अंत इतुलाची ॥ समचरणीच्या खुणा उभा पंढरीचा राणा ॥ तो आवडे जनामना दुर्ल-भगे माये ॥ ४ ॥ कैवल्याचा गाभा कीं ब्रह्मविद्येचा वालभा ॥ ३०७ ॥ यमनेम प्राणायाम प्रत्याहार हे सकळैव उपावपरी अपायरे ॥ जंव तमानीळ सांवळा हृदईं ठाण मांडुनी न ऱ्हायेरे ॥ ३१४ ॥ ७ ॥ वेदाशास्त्रा पुराणा आणि यज्ञतपदाना ॥ श्रुती-धांडोळितां मना ठावो नुरेची मा मा ॥ ह्मणोनी गवळणी अंगोळीया धरती ॥ ९ ॥ ॥३२०॥ यमधर्म सांगे दूता ॥ तुह्मीं परिसावी निजकथा ॥ जेथें रामनामवार्ता ॥ तया देशा नव जावें ॥ १ ॥ नामें महादोषा हरण ॥ नामें पतीतपावन ॥ नामें कलि-मलदहन ॥ भवबंधनमोचक ॥ ३२४ ॥ नाम प्रल्हाद उच्चारी ॥ तया सोडवी नरहरी ॥ ३२७ ॥ १ ॥ भुक्ति आणि मुक्ती नामापाशीं प्रत्यक्ष ॥ चारीवेद साही शास्त्रें दे-ताती साक्ष ॥ २ ॥ ३२९ ॥ काशी अयोध्या कांती मथुरा माया गोमती ॥ ऐसीं तीर्थें इत्यादिकें आहेती ॥ परी सरी न परती पांडुरंगी ॥ ३४९ ॥ पूर्व जन्मीं पाप केलें तें हें बहुत विस्तारलें ॥ विषयसुखा नाशिवंत सेवितां तिमिर कोंदलें ॥ चवऱ्याशीं लक्ष योनी फिरतां दुःख भोगिलें ॥ ज्ञानदृष्टी हरपली ॥ दोन्ही नेत्र आंधळे ॥ ४३० ॥ सकळ धर्माचें कारण ॥ नामस्मरण हरिकीर्तन ॥ ४८४ ॥ ज्ञानदेव ह्मणे नामे-वीण जो नरू ॥ तो होय भूमीभारू ये संसारीं ॥ ३ ॥ ५३३ ॥ चहुं वेदीं जाण षड्-शास्त्रीं कारण ॥ अठराही पुराणें हरिशींगाती ॥ ५४९ ॥ नामसंकीर्तन वैष्णवांची जोडी ॥ पापें अनंत कोडीं गेलीं त्यांचीं ॥ ५६६ ॥ ज्ञानीयासी ज्ञान ज्ञानदेवीं ध्यान ॥ कलिमलछेदन नाम एक ॥ ३ ॥ ६१७ ॥

आईबाप होते तोंपर्यंत अशा तऱ्हेची समज. यापुढें जो निवृत्तिनाथाशीं यांचा समागम झाला, त्यांत प्रथमतः ज्ञानोबास असें वाटूं लागलें, कीं, बोधाशिवाय सर्व व्यर्थ. ज्ञान, हें नामापेक्षां मोठें आहे. ह्मणून त्यांणीं वारंवार निवृत्तीची प्रार्थना केली आहे, व नानातऱ्हेचे प्रश्न विचारिले आहेत. त्यांपैकीं एक मोठा विलक्षण प्रश्न असा कीं, विश्रांतीचें स्थान हें कोठें आहे? व खरी खूण कोणती? कशी समजावी? हें सर्व या गाथ्यांतील वेंचावरून लक्षांत येईल.

वेदशास्त्र जाणितले ॥ आगमीं पूर्ण ज्ञान झालें ॥ पुराण मात्र धांडोळिलें ॥ आहे तें राहिलें वेगळेंची ॥ ३ ॥ शब्द ब्रह्मे होसी आगळा ॥ ह्मणसि न नभियेसी क-ळिकाळा ॥ बोधेंवीण सुखसोहळा ॥ आहे तो जिव्हाळा वेगळाची ॥ ४ ॥ ११ ॥ क-वणाचे मायबाप ॥ कवणाचे गणगोत ॥ मृगजळ वाहत जाईल रया ॥ १९ ॥ बाप

रखुमादेवी वरू न विसंबे सर्वथा ॥ निवृत्तीनें सांगितलें तत्वता ॥ २ ॥ २६ ॥ निवृत्ति प्रसादें मी गोवळियो ॥ माझा भावो तो विठ्ठलन्याहाळिवो ॥ ३ ॥ ३२ ॥ ज्ञान गूढगम्य ज्ञानदेवा साधलें ॥ निवृत्तीनें दिलें माझ्या हातीं ॥ ५६४ ॥ ४ ॥ ज्ञानदेव शरण निवृत्तीच्या चरणा ॥ कासवीचा पान्हा पाजियेला ॥ ९ ॥ ५८३ ॥ ज्ञानदेव विनवी निवृत्तीस काज ॥ हरपली लाज संदेहेसी ॥ ५८९ ॥ निवृत्ती निवांत समरसें पाहात ॥ अवघाचि दिसत देहि विदेह ॥ ५ ॥ ५८८ ॥ निवृत्ती निजबोध आनंदादिकंद ॥ शाखाद्रुमभेद हरी झाला ॥ ५ ॥ ५९९ ॥ वृत्तीची निवृत्ती देखिली म्यां तुझी ॥ हरपली माझी चित्तवृत्ती ॥ ४ ॥ ५९३ ॥ सकळ तीर्थें निवृत्तीच्या पायीं ॥ तेथें गूडी देई माझ्या मना ॥ १ ॥ ६०३ ॥ ज्ञानदेव निवृत्ती पुसतसे काडें ॥ पुंडलीकें केवढें भाग्य केलें ॥ ६ ॥६२९॥ ज्ञानदेवा सार सावळीये मूर्ती ॥ निवृत्तीनें गुंती उगवीली ॥ ३ ॥ ६४८ ॥ विश्रांतीचें स्थान कोण रूप आह्मां ॥ ऐसा हा महिमा सांगा स्वामी ॥ १ ॥६६५॥ ज्ञानदेव पुसे निवृत्ती सौरसे ॥ पुंडलीकें कैसें पुण्य केलें ॥ ३ ॥ ६८४ ॥ बाप निवृत्तीराजे दावीतातो खूण ॥ नाम नारायण पाठ कीजे ॥ २ ॥ ६७८ ॥ ज्ञानदेवा गोडी हरिपदीं आवडी ॥ प्रवृत्तीची थडी उल्लंघीली ॥ ३ ॥ ७०८ ॥

निवृत्तीचा उपदेश मिळाल्यानंतर ज्ञानोबाला सगुणउपासना, ध्यान, नमन, इत्यादिकांचें वैषम्य वाटूं लागलें. मला निवृत्तीनीं ज्ञानगंगेंत बुडविलें. सर्व प्रवृत्तिमार्गापासून मुक्त करून ज्ञानमार्ग दाखविला. आतां माझें समाधान झालें. निवृत्ति माहाराजांनीं जोउपदेश केला हा एक सांप्रदायिक उपदेश होता. हा उपदेश निवृत्तिनाथाला गैनिनाथापासून प्राप्त झाला होता. हा कसा झाला व केव्हां झाला हें पूर्वीं सांगितलेंच आहे. या गुरुशिष्यपरंपरेचें नांव नाथसांप्रदाय. यांमध्यें वेदांत प्रमुख असून सगुण कृष्णभक्ति विशेष होती. या संबंधानें निवृत्तिनाथाचा एक अभंग आहे. आदिनाथ ऊमाबीज प्रकटीलें ॥ मच्छींद्रा लाधलें सहज स्थीती ॥ १ ॥ तेची प्रेममुद्रा गोरक्षी दीधली ॥ पूर्ण कृपा केली गयनीनाथा ॥ ध्रु० ॥ वैराग्ये तापला सप्रेमे निवाला ॥ ठेवा जो लाधला शांतिसुख ॥ २ ॥ निर्द्वंद्व निःशंक विचरतां मही ॥ सुखानंद हृदयीं स्थिर झाला ॥ ३ ॥ विरक्तीचें पात्र अन्वयाचें सुख ॥ देऊनी सम्यक अनन्यता ॥ ४ ॥ निवृत्तीगयनी कृपा केली असे पूर्ण ॥ कुळ हें पावन कृष्णनामें ॥ ५ ॥ निवृत्ति गुरू व ज्ञानदेव शिष्य या अवस्थेमध्यें जे उद्गार ज्ञानोबांनीं काढिले आहेत त्यांपैकीं कांहीं खालीं लिहिल्याप्रमाणें. तो जाणावा ज्ञप्तिरूप ॥ निवृत्तीनाथाचें स्वरूप ॥ ५ ॥ ८ ॥ श्रीगुरुप्रसादें ज्ञानबोधू झालावो ॥ नव्हतें ठाऊकें पडिलें मायेवो ॥ १७ ॥ २ ॥ निवृत्तीनें बीज सांगितलें ॥ ४७ ॥ २ ॥ निवृत्तीनें दाविला परेशु ॥४९॥३॥ श्रीगुरू निवृत्तीनें दाविलें सुख ॥ ३॥५०॥ येणें निवृत्तीराये खुणा दावोनिया ॥ सकळगुणी गुणातीत तुटली आधीरया ॥ ३ ॥५१॥ निवृत्तीराये खुण अंजन ॥ दावुनी निधान प्रकट केलें ॥ ३ ॥ ६१ ॥ निवृत्तीराये खुणा दांवुनी सकळ ॥ निजे चैत्तन्य पाहे निखळ रया ॥ ३ ॥ ८७ ॥ निवृत्तीरायें वेगीं दाखविला ॥ आदि अंतीं तोचि सबराभरितुं ॥ रूपनामरहितु नीच नवा ॥ २ ॥१००॥

**अवघड तें घडलें माझ्या अंगीं ॥ ती हीऋण चौघी मज देवविले ॥ ज्यासी दिधलें त्यासी नांव परी नाहीं ॥ १ ॥ जया रूपनाहीं त्यासी ऋण देवविलें ॥ निवृत्तिगुरूनें अधिक केलें ॥ निमिषमात्रें दाविलें धन माझें ॥ २ ॥ १३३ ॥ निवृत्तीप्रसादें म्या ब्रह्मची जेविलें ॥ २ ॥ १८१ ॥ ज्ञान देवज्ञानगंगे निवृत्तीनें बुडविलें ॥ ६२८ ॥७॥ तुज सुगुण ह्मणों कीं निर्गुणरे ॥ सगुण निर्गुण एकू गोविंदुरे ॥ १ ॥ अनुमानेना अनुमानेना ॥ श्रुती नेति नेति ह्मणती गोविंदुरे ॥ धृ० ॥ तुज स्थूल ह्मणूं कीं सूक्ष्मरे ॥ स्थूळ सूक्ष्म एकु गोविंदुरे ॥ २ ॥ तुज आकार ह्मणूं कीं निराकाररे ॥ आकारू निराकारू एकू गोविंदुरे ॥ ३ ॥ तुज दृश्य ह्मणूं कीं अदृश्यरे ॥ दृश्य अदृश्य एकू गोविंदुरे ॥४॥ निवृत्तीप्रसादें ज्ञानदेव बोले ॥ बाप रखुमादेवी वरू विठ्ठलरे ॥**

ज्ञानोबाची स्वतंत्र स्थिति हा यांच्या चरित्रांतला चवथा विभाग. निवृत्ति ज्ञानोबाचे गुरू. अर्थात ज्ञानोबापेक्षां गुरूचें महत्व मोठें असावें व गुरूच्या आयुष्यमर्यादेंत तरी गुरूचा गौरव असावा. असें नसतां पैठणापासून निवृत्तीचें नांव विशेष ऐकूं न येतां ठिकठिकाणीं जें महत्व मिळालें आहे तें सर्व ज्ञानोबालाच. याला कारण एवढेंच दिसतें कीं, ज्ञानोबाची ज्ञानसंपत्ति इतकी वाढली, कीं जेणेंकरून गुरू कांहींसा लोपाप्रत पावला. तथापि या लेखनाचा अर्थ असा न समजावा कीं, ज्ञानोबाची निवृत्तीविषयींची पूज्यबुद्धी कमती झाली; अथवा, लोकांमध्यें त्यांची विटंबना होऊं लागली. जो सांप्रदायिक नाथवेदांत याच्यापुढें ज्ञानोबाची गति झाली, व सर्वत्र ऐक्य आहे असा त्यास अनुभव आला. या अश्या संधींत ज्ञानोबाचा व चांगदेवाचा आणि नामदेवाचा समागम झाला. त्यांत योग, हा अनुभवापुढें कांहीं नव्हे, हें चांगदेवपांसष्टीवरून समजून घ्यावें; व नामभक्ति ही ज्ञानापेक्षां व अनुभवापेक्षां किती कामी आहे हें तीर्थाटणांत नामदेवास समजविलें. हा प्रकार गाथ्यांतील कांहीं वेंचे देतों त्यावरून लक्षांत येईल.

**ज्ञानदेव ह्मणे अवघेंची मृगजळ ॥ सांडोनी पाल्हाळ नित्य ध्याई ॥२॥७६॥ कर्मा कर्मपारुषलें ॥ देवधर्म लोपले ॥ गुरुशिष्य निमाले ॥ जाले क्षीरसिंधू ॥ तेथें गोडीवीण चाखणें ॥ जिव्हेवीण बोलणें ॥ नेत्रेंवीण पाहणें तेंचि ब्रह्म ॥ ४ ॥ ८३ ॥ मेरूपरतें एक व्योम आहे ॥ तेथें एकू पाहे तेजःपुंजू ॥ १ ॥ तेज नव्हे तेजःपुंजु नव्हे ॥ शीतळ नव्हे शांतही नव्हे ॥ धृ० ॥ बापरखुमादेवीवरू विठ्ठलही नव्हे ॥ नव्हे तो होये चतुर्देहेवीण ॥ आठवितां नुपरे मोवितां न मोववे ॥ सांगतां न संगवे गुण त्याचे ॥ १ ॥२९३॥ ध्येय ध्याता हे दोन्ही नाहीं ॥ जेथें ज्ञेय ज्ञानाउरे कांई ॥१॥ अरे मना परापर परतें पाहीं ॥ तें तूं स्वयें आपण पाहेरे मना ॥ २ ॥ ४५८ ॥ निर्जीवा दगडा काय करशील सेवा ॥ तो तुज निर्देवा देईल काय ॥ १ ॥ कवणे गुणें भुली पडली गंव्हारा ॥ तिर्थाच्या माहेरा नोळखीशी ॥ २ ॥ ४६६ ॥**

साध्यसाधनसाधकराहित जें कांहीं एक, जें प्रमाणाला, मापतां येत नाहीं, जेथें मनाचा संचार नाहीं, जें कोणत्याही ज्ञानेंद्रियास गोचर नाहीं, जें कोणच्याही कर्मेंद्रियाकडून प्राप्त होत नाहीं, जें शब्दाला वाचक नव्हे, परंतु जें सर्व हें वर सांगितलेलें आहे, असें सिद्ध न करतां सिद्ध व सिद्ध असतां असिद्ध, जें अनादि सिद्ध, ज्याचा अनुवाद करणें ह्मणजे मौन, असा या अनिर्वचनीय वस्तु-

विषेशाचा जो अनुवाद यास सिद्धानुवाद असें नांव ठेवून, जें सर्वदा, सर्वांस सर्वकाळ, नित्य उपलब्ध, याचेंच नांव अमृतानुभव, त्याचा जो शब्दानें स्पष्ट भाव करणें हा, हा ग्रंथ अमृतानुभव. असे या आमृतानुभवशब्दाचे दोन अर्थ होतात. हा ग्रंथ ह्मणजे अति मोठा केलेला ज्ञानोबांनीं चमत्कार. रेड्याकडून वेद बोलवणें, मृतपितर साक्षात श्राद्धास बसविणें, प्रेतास सजीव करणें, योगबलानें पाटीस मांडे भाजण्याजोगी उष्णता आणणें, जड भिंतीस चालविणें आणि चौदाशें वर्षांच्या योग्याचा पराभव करणें, यापेक्षां सर्व जगतास एकदम अमृतत्व देणें हा केवढा मोठा चमत्कार. जसा सूर्यापुढें काजवा कांही नव्हे, तसे जे क्षुद्र चमत्कार ह्मणजे जे केवळ अर्थवाद आहेत, यांपेक्षां जें सर्व दृङ्मात्र आहे, यास अमृतत्व सिद्ध करणें हा चमत्कार केवढा मोठा बरें? या अमृतानुभव ग्रंथाचे १० विभाग केले आहेत. प्रत्येक विभागास प्रकरण अशी संज्ञा दिली आहे. प्रथम प्रकरणाचें नांव शिवशक्तिसमावेश. यांत प्रारंभीं शिष्टाचाराला अनुसरून ज्ञानोबा देवोदेवी हीं जगाचीं जीं उत्पादक द्वैताला अनुसरून आहेत यांस नमन करतात, व या नमनांतच सर्व ग्रंथाचा मुद्दा व सिद्धांचा अनुवाद व अमृताचा अनुभव हा एका पदानेंच दर्शवितात. **"एसी इये निरुपाधिके,"** एवढ्यांतच ग्रंथाचा आरंभ व समाप्ती झाली. देवास देवी उपाधि नव्हे. देवीस देव उपाधि नव्हे. जग ही अशा निरुपाधिक देवो देवीची उपाधि नव्हे. मी जगतांस उपाधि नाहीं. मग वंद्य कोण? वंदनकर्ता कोण? आणि वंदन कशाचें? जें आहे तें सर्व तोच, ह्मणजे **"सर्वं खल्विदं ब्रह्म."** असा हा अमृताचा सिद्धानुवाद करण्यांत वेद, शास्त्र, श्रुति, स्मृति, पुराण, इतिहास, यांच्या सर्व व्यापारास एकदम हरकत आली. तेव्हां या सर्वांच्या ह्मणण्याचें रहस्य काय आहे, व या सर्वांचें सिद्धांत केवळ वल्गना आहेत काय? जर वल्गना आहेत तर ह्या दाखविल्या पाहिजेत. ह्मणोन या ग्रंथाची पुढें प्रवृत्ती. जगत हा सृष्ट पदार्थ नव्हे. जगत व जगदात्मा हा निराळा करतां येत नाहीं. तरमग वेद, असें ह्मणतो कीं सद् ह्मणोन एक अद्वितीय पूर्वीं होतें. त्यास इच्छा उत्पन्न झाली कीं आपण अनेक व्हावें. ह्या इच्छेच्या योगानें एकाचें एकत्व मोडून द्वैत उत्पन्न झालें. असें असतां, आपण हें सर्व तोच आहे असें कसें ह्मणता? असें पक्षकाराचें ह्मणणें पडलें. ज्ञानोबा उत्तर देतात, कीं एक ह्मणणें हेंच त्या एकास लागू नाहीं. एकासच जर गुण विशिष्टें करून एकत्व असतें, तर एक असें ह्मणतां आलें असतें. यावरून द्वैत उत्पन्न होत नाहीं. असें जर आहे, तर पक्षकार विचारतात, कीं आपणास वस्तु विशेषाचा पूर्ण निश्चय करतां येतो आहे. तर ती कशी हें सांगाबरें? ज्ञानोबा उत्तर देतात, कीं आकारानें त्याचा रूपनिर्देश करतां येणारच नाहीं. असो. पक्षकार ह्मणतात कीं, हें जें आह्मीं द्वैत ह्मणतों आहोंत हें ऐक्यांतच आहे. जग निर्माण झालें तरी हा ऐक्य भाव तुटत नाहीं. परंतु तो ऐक्यभाव द्वैताचा आहे. तें ऐक्य कसें, तर त्या द्वैतांत जीं दोवें त्यांचें अस्तित्व एकच, त्यांच्या ज्ञानाला साधन एकच, यांची नांदणूक ऐक्याचीच. असें तिसऱ्या ओवीपासून ते आठ ओवीपर्यंत द्वैतवाद्यांचा पूर्वपक्ष ज्ञानोबांनीं प्रतिपादन केला. या द्वैतपक्षाला ज्ञानोबा ९ व्या ओवींत भेदु असें नांव देतात. या द्वैतवादामध्यें मायावाद व प्रकृतिपुरुषवाद ह्मणजे बादरायण, कपिल, आणि पतंजलि यांच्या मताचा पूर्व पक्ष केला आहे. हे द्वैतवादी प्रथमतः द्वैत उभें करून अवसानीं ऐक्य सिद्ध त. तें द्वैत कसें, तर माया किंवा प्रकृत्यादि याशिवाय मुक्त स्वभाव ह्मणजे गोसावी जो परमा-

त्मा याला कोणते ही तऱ्हेचें महत्त्व नाहीं. या उपाधींच्या योगानें द्रष्टा दृश्य अशी मांडणी करतां येते. नाहीं तर येत नाहीं. ज्ञानोबा ह्मणतात, या द्वैतवाद्यांचा आह्मास फार उपयोग झाला. कां कीं आह्मी यांचें खंडण केलें ह्मणजे यांनीं ज्यांचें खंडण केलें आहे ते सहजच खंडित होतात. कणादादि जे परमाणुवादी किंवा पौराणिक जो प्रकृतिपुरुषवाद हा यांच्या खंडणांत सहजच खंडित होतो. आतां अंतीं हे ऐक्यस्थापन कसें करतात, तर माया ही लटकी ठरली, किंवा प्रकृत्यादि, साधनें, असीं ठरली, ह्मणजे विवेक उत्पन्न होतो. मग कैवल्यस्वरूप येतें. आतां, दोहोंचा ऐक्यभाव कसा आहे याविषयीं पक्षकाराचे दृष्टांत १७ पासून ते २० ओवीपर्यंत देतात. ज्ञानोबा ह्मणतात, कीं आपण पुष्कळ वाद केला खरा, द्वैत उभें केलें खरें, परंतु ह्या द्वैतामध्यें जीं दोन आपण उभीं केलीं तीं मुळींच दोन नाहींत, व जें आपण प्रमाणशास्त्र त्याला लाविलें तें प्रमाणच नाहीं. यास गूळ, कापूर, दिवा व सूर्य यांचीं उदाहरणें देऊन ज्ञानोबा द्वैतखंडण करतात. या द्वैतवाद्यांनीं आणखी एक उपकार केला आहे, तो हा कीं शून्यवादखंडण केला आहे. आतां पुढील ४० ओव्या पर्यंत प्रकृतिपुरुषवाद आपल्या कसा उपयोगी पडतो तें दर्शवितात. वारा आणि त्याची गती, कस्तुरी आणि तिचा परिमळ, हीं जशीं दोन नाहींत, याप्रमाणें शिव ह्मणजे वस्तु, व दृङ्मात्र, वस्तुजात, हीं दोन नव्हेत. दृङ्मात्र ह्मटलें ह्मणजे वस्तु आणि वस्तु ह्मटलें ह्मणजे दृङ्मात्र. ज्याचे वाचक ॐकार ही नव्हे. या तऱ्हेचीं हीं दोन, ज्यास शिवशक्ति, देवोदेवी, अथवा पाहिजे तें ह्मणा, हवें तें नांव द्या, हवें तें रूप कल्पा, ह्या सर्वांचा अर्थ एकच. तर असें जें सर्वत्र एक आहे, ह्यांत नमकभाव कोठून उत्पन्न होणार? आणि मी नमन करणारा ज्ञानदेव हा त्याशिवाय दुसरा कोठून? याप्रमाणें ५९ ओवीपर्यंत ऐक्य कसें आहे तें दृष्टांतांनीं सांगून, हा नमनप्रकार कसा, तर ऐक्याच्या. शेवटीं, असें स्थापन करतात, कीं जग हा सृष्ट पदार्थ नव्हे. याचा निर्माण कर्ता अन्य नाहीं. जें सर्व कांहीं आहे तें तोच आहे. ह्मणोन या प्रकरणाचें नांव शिवशक्तिसमावेश.

यानंतर दुसरें जें प्रकरण, त्याचें नांव गुरुस्तवन. पहिल्या ओवींत गुरूचें स्वरूप वर्णन करितात. करुणेनें दयार्द्र होऊन अनेक जन्मांतरांचे येरझार भोगणारे असे जे अविद्येच्या अरण्यामध्यें सुटण्याकरितां धांवा करणारे जीव, यांचा जो पाठराखा, जो अमूर्त परमात्मा याचा मूर्तिमान अवतार, वेदविद्यासंपन्न, व अनंत जन्मांतरांत मुक्ति होण्याकरतां अनंत उपाय केलेल्या जीवरूपी झाडास वसंतच. ही गुरूची व्याख्या अगदीं वेदांतसाराच्या व्याख्येप्रमाणें आहे. **अयं अधिकारी जन्ममरणादिसंसारानलसंतप्तः * * उपहारपाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठं गुरुमुपसृत्य * * सगुरुः परमकृपयाध्यारोपापवादन्यायेनैनमुपदिशति * * । यथा वृक्षाणाम् समष्ट्यभिप्रायेण वनमित्येकत्वव्यपदेशः * * तथा नानात्वेन * * जीवगताज्ञानानाम् ।** माझे गुरु श्रीनिवृत्ति यांचें मी वंदन करतों. यांनीं अध्यारोपापवादांच्या योगानें मला मुक्ति दिली. आतां या पुढें अनेक गुरुशिष्यसांप्रदायाचे चार ओवीपासून ते १८ ओवीपर्यंत ज्ञानोबा वर्णन करतात. गुरूला आपल्या शिष्यास सज्ञान करण्याला मार्ग, बोध करणें हाच आहे, असें प्रवृत्ति व निवृत्ति मार्गाचे सांप्रदाय सांगतात. बोध करणें याला साधन वाचा. गुरु व शिष्य भेद नसतां हा प्रकार कसा घडून येतो? जर सर्वत्र ऐक्य आहे तर गुरु व शिष्य या परंपरेला सवडच नाहीं. २१ व्या ओवीमध्यें या गुरुशिष्य सांप्रदयाचें खंडण

केलें. अहो, जो प्रकाशगहन, जो सर्वत्र प्रकाशमानच आहे, तेथें बोध कोणाला कोणीं करावा, अनेक शब्दजाल उत्पन्न करून त्याचा बोध अथवा गुणानुवाद करणारीं शास्त्रें आहेत. कित्येक शास्त्रांत प्रमाणांनीं तो साध्य झाला आहे. परंतु तथ्यांश पहातां, **"दुजयाच्या रागीं रुसे ॥ एकपणाजो ॥** प्रमाणानें मापूं जाल तर शून्यवाद उत्पन्न होतो. योग साध्य ह्मणून पहावयास जावें, तर दर्शन आणि द्रष्टा असें द्वैतच नाहीं. नमन करावयाला जावें, तर ह्याला नांवच नाहीं. आत्म्यास आत्मप्रवृत्ति नाहीं. मग निवृत्ति ह्मणावें कोणाला? अशी ही अनिर्वचनीय गुरूची स्थिति. तरी व्यवहारामध्यें लटके रूढींत येत आहे. जड हें चैतन्याप्रत प्राप्त होत आहे. ज्ञानोबा ह्मणतात, अहो तुह्मीं असे अनिर्वचनीय कोणा ही सिद्धांत सांपडत नाहीं. स्वामि आणि भृत्यभाव हा तुह्मांमध्यें उभा करतां येत नाहीं. सामान्य रूपानें तर आपण अगाधच. मग आत्मा या विशेष रूपानें देखील आपला थांग लागत नाहीं. पुढें ४३ ओवीपासून ६० पर्यंत परमात्म्याला ऐक्यभावानें कसें ओळखतां येतें, हें दाखवितात, व या सर्वांचें पर्यवसान ६१ ओवींत स्पष्ट करितात. **ह्मणूनी शिष्य आणि गुरुनाथु ॥ या दाहों शब्दांचा अर्थु ॥ श्रीगुरूची होतु ॥ परी दोहीं ठायीं ॥** याच गोष्टीचा अनुवाद ७७ ओवी पर्यंत करून बोधानें बोध होण्याजोगता हा नव्हे. हा सिद्ध आहे. याला साधनें कोठेंच नाहींत. ह्मणून गोसावी हें पद या अर्थांत योजतात. आतां गुरूची जर अशी व्यवस्था, तर ज्या वाचेनें बोध होतो तर त्यांची व्यवस्था ह्मणजे शब्दब्रह्माची व्यवस्था ही याच तऱ्हेची, असें ह्मणून गुरुस्तवन प्रकरण संपतें.

गुरु शिष्यास बोध करतो याला साधन वाचा. या बोधें करून आत्म्याची अज्ञानरूपी निद्रा जाते व तो जागृत अवस्थेंत येतो. ज्ञानोबा ह्मणतात, ही जागृत आवस्था नव्हे. परा पश्यंती मध्यमा वैखरी, यांच्या योगानें अज्ञानाचा नाश होतो. मग या वाचा तरी कशाला रहातात. जी अज्ञानाची वाट ती यांची वाट. देहाचे, मनाचे, सूर्याचे, दृष्टांत देऊन, हेंच स्पष्ट करून दाखवितात. व ७ ओवीपर्यंत हाच विषय प्रतिपादन करितात. आतां अविद्येचें स्वरूप विलक्षण आहे. **॥ जिती अविद्या ऐसी ॥ अन्यथा बोधातें गिवसी ॥ तेची यथा बोधेसी ॥ निमाली उठी ॥** अविद्याकाळीं बंध असतो. अविद्या सरली कीं मोक्ष उत्पन्न होतो. ह्मणजे जीवाला स्वातंत्र्य नाहींच. अविद्या असली कीं अज्ञानांत असावें. गेली कीं मोक्षांत पडावें. हा विलक्षण प्रकार अज्ञान्यासारख्यालाच शोभतो. बागुलबुवाचे, घटाचें, याला दृष्टांत देतात. आतां मोक्ष जो आहे, तरी हा बंधच. अशाच तऱ्हेचे अनुवाद शिवसूत्रामध्यें व भगवद्गीतेंत सांपडतात. ज्ञानावस्था इचा पाश, ह्मणजे बंधन, सत्वगुण. सत्वगुणापासून ज्ञान. हा सिद्धांत श्रीकृष्णांनीं किंवा शिवांनीं केला, हा मोठ्यांचा सिद्धांत, ह्मणून आह्मीं त्याला मान देतों असें नव्हे. सगुणाची हीच स्थिति. पण ज्या ठिकाणीं गुणच नाहींत, तेथें हें ज्ञानाज्ञान कोठून? आतां हें मोक्ष देणारें ज्ञान जो बंध ह्मणून आह्मीं वर दाखविला, त्याच्या योगानें जर आत्मज्ञान होत आहे, तर सूर्याला दैदीप्यमान्य होण्यास प्रातःकाळाची प्रार्थना केली पाहिजे. अहो! दिव्याला कोणीं दिव्यांनीं पाहिलें आहे काय? दृङ्मात्र वस्तुजात, अखंड प्रकाशरूप आहे. त्याला ओळखण्यास नानाशास्त्रें हीं देशांतरें हिंडोन प्राप्त होईल काय? वस्तुमात्र तो स्वतःच आहे. मग कल्पित एक ज्ञान उत्पन्न करून त्या ज्ञानानें त्याला ओळखावयाचें हा

केवढा सायास. मग त्या ज्ञानाचा लय होतो. असलें हें लय पावणारें ज्ञान काय कामाचें? या कारणास्तव, ह्या ज्या चारी वाचा बोध करण्यास समर्थ आहेत असें ह्मटलें आहे हा वेदांतशास्त्राचा चार देहांचा शृंगार आहे. आतां कितीही बोध जरी झाला तथापि त्या बोधांत अज्ञानाचा लेश असतोच. याला कापूर, विभूति इत्यादिकांचीं उदाहरणें देऊन वाचेनें ह्मणजे शब्दानें बोधाचें ऋण फिटत नाहीं. व वाचांचा ज्ञान व अज्ञानाशीं निकट संबंध आहे असें ह्मणून तिसरें प्रकरण संपतें.

बोध झाल्यानंतर आत्मज्ञान झालें. हें ज्ञान अखंडज्ञानाप्रमाणें व्यवहारांत येतें. याचें महत्त्व फार वाटूं लागतें. परंतु जशी निद्रा जाऊन जागृती उत्पन्न होते. ती जागृती जशी अखंड नव्हे. ह्मणजे पुन्हा केव्हां तरी निद्रा येणारच. याप्रमाणें अज्ञानाला नाशून जें ज्ञान उत्पन्न होतें तें अखंड नव्हे. याकरितां, अशा ज्ञानाच्या योगानें **तत्वमसि** असें परमात्म्याचें व जीवाचें ऐक्य करणारें ज्ञान याचा प्रकार सुरीच्या धारेनें सुरीची धार कापते या ह्मणण्याप्रमाणें झाला. अज्ञान नाहींसे झालें ह्मणजे ज्ञानही नाहींसें झालें पाहिजे. याप्रमाणें या विषयाचा परिस्फोट १४ व्या ओवीपर्यंत करितात. दुसऱ्या कांहीं दर्शकांनीं दाखऊन उत्कर्षास यावें अशी अखंड ज्ञानाची स्थितिच नव्हे. आपल्याच डोकीला धरून आपणास ओळकंबतां येईल काय? याच तऱ्हेचीं दृष्टी, स्वाद, आकाश, नाद, सूर्य, परिमळ, फळ, इत्यादिकांचीं उदाहरणें देऊन ज्ञानाचाच ज्ञानांत व्यवहार होत नाहीं, असें दाखवितात. मग ज्ञानानेंच ज्ञानास ओळखतां येत नाहीं. तर अज्ञानाला ठिकाण कोठें? याला स्पष्ट करण्यास तेजाचें उदाहरण घेतात. तेजाला तेजत्व हें अंधारामुळें. अंधारच जर नाहीं, तर तेजाला तेजत्व कशाचें? जर ज्ञानास ज्ञानत्वच नाहीं तर शून्यवादाला मोठा ठिकाण झाला. होईना कां. ज्ञानोबा ह्मणतात, तरी शून्य ओळखायाला राहिलें कोण? मालविला दिवा, निद्रेमध्यें कोणाला मारलें, अशा तऱ्हेचीं उदाहरणें घेऊन या शून्यवादावर कोटिक्रम करितात. अखंड ज्ञान अशा तऱ्हेचें आहे कीं ज्यांत ज्ञानही नाहीं आणि अज्ञान ही नाहीं. अखंड वस्तु जी आहे तिला सद्भाव ही नाहीं आणि अभाव ही नाहीं. हें दृढीकरण करण्यास ४३ ओवीपर्यंत दृष्टांत देऊन हें प्रकरण संपवितात.

परमात्मस्वरूप सच्चिदानंद आहे. हा शास्त्रीय व मुख्यत्वें करून वेदांतशास्त्राचा निश्चय. हीं पदें कशीं उत्पन्न झालीं? एक परमात्मा त्रिप्रकारात्मक आहे, किंवा निरनिराळा तीन प्रकारचा आहे. शास्त्र ह्मणतें **"तीहीं तीहीं उणी लेख,"** हीं तीन निराळीं नाहींत असें जाणा. तीन निराळीं घेतलीं असतां अर्थनिष्पत्ती होत नाहीं. याला सोनें, दूध, व कापूर यांचीं उदाहरणें देतात. पांढरेपणा हा कापूर नव्हे. परिमळ हा कापूर नव्हे. मार्दव हाही कापूर नव्हे. एक संगतीनेंच तीन ही घेतलीं तरच कापूर होतो. याप्रकारानें सच्चिदादि पदांनीं परमार्थबोध होतो. अशीं ही सच्चिदानंद पदाची शास्त्रमांडणी ज्ञानोबा ७ ओवीपर्यंत सांगतात. साधारण प्रचारांत सच्चिदानंद भेदानें परमात्म्याची रूढी होत आहे. व ज्या वेळेस व्याख्या करण्याचा प्रकार सुरू होतो त्या वेळेस सत्तेपासून प्रकाश, प्रकाशापासून आनंद हा निवडतां येत नाहीं, व अंतीं आनंदावरच अवसान ठेवावें लागतें. असा घोटाळा शास्त्राच्या शास्त्रांतच उत्पन्न होत आहे. पृथक् पृथक् जेव्हां शब्दानें वर्णन करायाला बसलें, तेंव्हा अशी घटना झाली; परंतु एकच जर पहावयास गेलें, तर तेथें ऐक्य हें नाहीसें होतें. **थेंबी पडतां उदक ॥ थेंबा धरूं ये लेख ॥ परी पडल्या ठाईं उदक ॥ वांचूनी आहे ॥** तर

वेदांनीं जें परमात्मस्वरूप सच्चिदानंद या पदांनीं वर्णन केलेलें आहे हें कशावरून? तर केवळ अन्योन्यावृत्तीवरून केलेलें आहे. वेद, ह्याचें हें नांव आहे असें ह्मणत नाहीं. जसें एखाद्या पदार्थावर सूर्याचें तेज पडलें आहे तेवढ्याच तेजावरून जशी सूर्याचा महिमा लक्षांत यावयाचा नाहीं, त्याप्रमाणें वाचेला ह्मणजे वेदाला ज्याच्यामुळें वाचकत्व, तो वेद, त्याच्याविषयीं व्याख्या कशी करील बरें? जो मुळीं कधीं कोणाचा विषय नव्हे, जो प्रमेय या कोटींत पडतच नाहीं, मग प्रमाण कोठून? प्रमेयाचा परिच्छेद करणें हा प्रमाणशास्त्राचा मुद्दा. परंतु जें स्वतःसिद्ध, ज्याचें ज्ञान, व्हावें ह्मणून इच्छावें तर ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय, ही त्रिपुटीरहित ह्मणा अथवा एकांतच ज्याची स्थिति, ह्या ठिकाणीं सच्चिदादि पदें जर लागू पडत आहेत आणि जर हीं सर्वमान्य आहेत, तर हीं आलीं कोठून? ज्ञानोबा ह्मणतात **हे बोल वस्तुवाचक ॥ नव्हती. हें शेष विचाराचें ॥** त्या विचारांत काय दर्शन आहे हो? तर स्वसंवाद झाला ह्मणजे स्वानुभव झाला, ह्मणजे हीं नाहींशीं होतात. याला मेघ, फळ, आहुती देणारा हात, आरसा व निद्रेंतून जागा करणारा यांचीं उदाहरणें देतात. **तैसे सच्चिदानंद चोखटा ॥ पदें लागती वाटा मौनाच्या ॥** आतां या सच्चिदानंदस्वरूपासंबधी वेदांतशास्त्रांत एक मोठी भानगड आहे. ती २८ ओवीपासून ३९ ओवीपर्यंत सांगतात. व तेंच डंका याचें एक उदाहरण देऊन हा घोटाळा दाखवितात. अहो! जो कोणच्याही सिद्धांतांनीं अजूनपर्यंत ओळखला गेला नाहीं, व ज्यांचें सिद्धांत "निदसुरीया," ह्मणजे झोपेंतलें चावळणें याप्रमाणें, तर पाकनिष्पत्ति नसतां जसें जेवलों ह्मणून ह्मणावें याप्रमाणें आहे. दोनप्रहरचा सूर्य पाहण्याकरतां दिवा लावावा, न जन्मलेल्या स्वरूपवतीचें लावण्य वर्णन करावें, अशातऱ्हेचा हा सिद्ध वस्तूविषयीं शास्त्रानुवाद आहे. याला कामाचें, नादाचें, अग्नीचें, दर्पणाचें व पिकाचें उदाहरण देऊन, आपलें बोलणें ज्ञानोबा स्पष्ट करतात. विशेष किंवा सामान्य अशा प्रकारानें सिद्धानुवाद होत नाहीं. येथें अनुवाद करणें ह्मणजे गप राहणें हेंच आहे. तेथें सच्चिदानंद लक्षणानें जर उपपत्ति शास्त्रें करतात, तर ती कशी असावी? उपाय करायला जावा तर उपाय होत नाहीं. प्रतितीला सोयच नाहीं. विचार करायला बसावें तर विचार नाहींसा होतो. मग हें शेष विचाराचें असें जें ह्मटलें आहे याला कशी काय तजवीज करावी? व या विचाराच्या तजविजीनें कसा घोटाळा होतो याला उदाहरण अभ्रकाचें देतात. अभ्रकाचा एक तुकडा घेऊन जर त्याचे सगळे पदर निराळे केले, तर निरनिराळ्या पदरांवरून अभ्रकाची स्थिति लक्षांत येत नाहीं, व पुन्हा पूर्वीचा अभ्रक जर पाहावयास जावें तर पदर केलेले आहेत. ह्मणोन हे जें पदत्रयानें याचें जें वर्णन तें होत नाहीं. तर हीं पदें ह्मणजे शब्द याचा उपयोग काय? तर उपयोग येवढाच, असें शास्त्र ह्मणतें कीं, जर कदाचित विचार करतांना अडचण पडूं लागली, तर या पदांनीं त्याची आठवण होते. परंतु ज्ञानोबा ह्मणतात, कीं स्मरणदानाविषयीं जरी व्यवहारांत शब्दांचा उपयोग होतो आहे, तथापि परमात्म्याविषयीं हीं अप्रयोजक आहेत. असें पुढील प्रकरणाचें अवतरण देऊन हें पांचवें प्रकरण संपवितात.

शब्द स्मरण करून देण्याच्या उपयोगीं आहे, असें जरी ह्मटलें, तरी वस्तु स्पष्ट करून दाखविणें, या विषयीं याचा उपयोग नाहीं. दिसणारा पदार्थ आहे, तो आरशांत दिसेल; न दिसणारानें आरशांत कसें दिसावें बरें? सूर्य जसा आकाशाचा प्रकाशक, त्याप्रमाणें या शब्दाच्या यो-

गानें आकाशाला अंबरत्व असें नांव मिळालें आहे. खतः शब्दाची स्थिति पाहिली असतां हा खपुष्प आहे; असें असून हा जग निर्माण करितो. विधिनिषेधांचे मार्ग दाखवितो. बंध, मोक्ष याच्यामुळेंच. अविद्या यानेंच उभारिली. वस्तूला नाहींशी यानेंच केली. शिव आणि जीव या वेदांतशास्त्रांतल्या खटपटी याच्याच. विरुद्ध मार्ग याच्याच योगानें रूढींत येतात. या शब्दाचे गुण काय काय वर्णन करावे! शेवटीं हा ह्मणे विसरल्याची आठवण करून देतो. अहो स्वसंवेद्य वस्तूला आठवावी कोणी व विसरावी कोणी? एकी एक. तेथें दुसरें कोठलें आणावें. जिभेला जीभ चाखते काय? याकरितां जेथें स्मरण आणि विसर हा नाहीं, तेथें शब्दाची प्रवृत्ति कशी होणार? न होईल तर न होवो, पण पक्षकार ह्मणतात, शब्दानें अविद्येचा नाश होतो, ह्मणजे बोध होऊन आत्म्याला आत्मा भेटतो. ज्ञानोबा ह्मणतात,—हें बोलणें वेडगळ आहे. याला दृष्टांत सूर्याचा व निद्रेचा देतात. अविद्या ही नाहीं. आत्म्याला आत्मस्थिती नाहीं. अविद्या आणि वांझेचें मूळ हीं दोन्ही एकसारखीं. मग तर्कानें काय करावें? इंद्रधनुष्य, अगस्तीची तृष्णा, गंधर्वनगर जाळणें, दिवसा दिवा लावणें, सावलीचा शोध करणें, ओडंबरीचे दागिने घालून शृंगारणें, अशा तऱ्हेचे दृष्टांत देऊन अविद्येचा अभाव ३८ ओंवीपर्यंत सिद्ध करून दाखवितात. आतां अविद्येला सद्भाव आहे असें जर ह्मणावें, तर ज्ञानोबा ह्मणतात, अनेक सिद्धांत आहेत, त्यांपैकीं कोणाएकानें तरी तीचें स्वरूप वर्णन केलें आहे काय? जो तो ह्मणतो अविद्या मायावी आहे. ती आपलें स्वरूप लपविते. बरें मग आतां शब्दानें लपणाऱ्या वस्तूला कसें मारावें? जें नाहीं त्याला शब्दानें प्रमाणत्व कसें यावें? हें अनेक उदाहरणें देऊन ६७ ओंवीपर्यंत सिद्ध करून दाखवितात. आतां ज्या शास्त्रांमध्यें अविद्येविषयीं विचार केला आहे त्या बोलूनचालून वल्गना आहेत. तेव्हां अविद्येचा सद्भाव ह्मणा अथवा अभाव ह्मणा, तीला नाशून शब्द प्रमाणदशेस येईल असें ह्मणतां येत नाहीं. तेव्हां विचाराचा शेष हें जें शब्दाचें लक्षण कलें आहे हें व्यर्थ आहे. आतां आत्म्याला आत्मा, शब्दाच्या योगानें दिसतो हें ह्मणणें आणि माझें लग्न मशींच लागलें हें ह्मणणें, हीं दोन्हीं सारखीं आहेत. तसें जो अखंडवस्तूला अखंडज्ञान असतां दुसऱ्या कोणी ज्ञानानें आणून दाखवावी? ही गोष्ट घडणारच नाहीं. याला नाना दृष्टांत देऊन शंभर ओंवीपर्यंत सिद्ध करून दाखवितात. व ह्मणतात कीं जीं शास्त्रांत ज्ञान आणि अज्ञान वर्णिलीं आहेत हीं केवळ पूर्वी जो शब्द वर्णन केला यामुळें शोभतात. त्या शब्दाचें वैभव काढून घेतलें, ह्मणजे हा जो शब्दप्रलय आहे तो नाहींसा होऊन जिकडे तीकडे निभ्रांत सुदिन होतो, असें ह्मणून हें प्रकरण संपवितात.

अज्ञान या शब्दापासून येरवीं बोध होतच नाहीं. अखंडज्ञान या संबंधानें तर अज्ञान नाहींच. आतां अज्ञान अनादि आहे असा जो शास्त्रांचा सिद्धांत आहे हा सर्व शब्दामुळें. शब्द हा लटका. कुंभारानें केलेला मातीचा घोडा त्यावर बसून एकाद्या युद्धांत जय मिळवून येऊं ह्मटलें, तर साधावयाचें नाहीं. तसेंच गारुड्यानें केलेल्या दागिन्यांचा शृंगार करतां येत नाहीं. त्याप्रमाणें वेदांतशास्त्रानें उत्पन्न केलेलें अज्ञान कोण्याही तऱ्हेनें प्रवृत्ति पावत नाहीं. व्यवहारिक ज्ञानासंबंधानें अन्यव्यावृत्ती अज्ञान आहे, असें ह्मणावें, तर तेथें देखील याला ठिकाण नाहीं. कारण अधिष्ठान जर अखंडज्ञान तर ज्याच्या भासामुळें व्यावहारिक ज्ञान, त्या ठिकाणीं अज्ञान कसें असावें?

असो, अज्ञान हें एक लटकें ठरलें, ह्मणजे ज्ञान देखील त्याच कोटींत पडतें. अज्ञान याची जाती अभाव. हा नैयायिकांचा सातवा पदार्थ. अभावाची जाती अशी आहे, कीं ज्या ठिकाणीं तो असतो, त्या ठिकाणचा बोध व्हावयाचा नाहीं. तथापि, शास्त्र ह्मणतें, कीं अज्ञान हें आत्म्यामध्येंच आहे. व आत्म्याशिवाय तर दुसरा पदार्थ नाहींच नाहीं. बरें आतां याची गती काय होते ती पहा. अज्ञान हा अभाव, हा आत्म्यामध्यें. आत्माच काय तो सर्वत्र झाला कीं नाहीं नाहींसा? जर नाहींसा नाहीं, आणि अज्ञान आहे, असें समजतें, तर द्वैत उभें राहतें, आणि तें शास्त्राच्या विरुद्ध! तेव्हां जो अखंडज्ञानात्मा, त्याला अज्ञान अज्ञान करूं शकत नाहीं. तर अज्ञानवाद करणारे हो, तुह्माला मोठी लाज असावी. अथवा असें ह्मणा, कीं जें आमचें अज्ञान आहे, हें अज्ञानच नव्हे. अहो डोळ्यांवर पडदा आला आहे, आणि डोळ्यानें दिसतें आहे, तर त्याला आंधळा कोण ह्मणेल? अग्नी प्रज्वलीत आहे, आणि त्यांत सर्पण टाकलें तर तें जळेना, मग त्याला अग्नी कोण ह्मणेल? घरांत आंधार पडला आहे, आणि सर्व वस्तु जशा दिसाव्या तशा दिसतात, याला आंधार कोण ह्मणेल? त्याप्रमाणें आत्म्यांत अज्ञान आहे, आणि आत्मा जशाचा तसाच! तेव्हां अज्ञान या शब्दाला खोटेपणा आला कीं नाहीं पहा बरें! बरें हें राहूंद्या. शब्दवाद सोडून न्यायाच्याच सोईनें पाहूं. अज्ञान ह्मणजे अंधार, आत्मा ह्मणजे प्रकाश. दोन्ही एकत्र करा पाहूं. जागेपणा आणि निद्रा, आठव आणि विसर, उष्ण आणि थंडी, दिवस आणि रात्र, जगणें आणि मरणें, हीं द्वंद्वें एके ठिकाणीं नांदतात अशी कांहीं न्यायाच्यामध्यें सवड निघते का? अर्थात निघत नाहीं. तेव्हां आत्म्यामध्यें अज्ञान, अथवा आत्म्याशिवाय निराळें अज्ञान राहूं शकत नाहीं. कल्पना करा कीं, एक मिठाचा मासा केला, आणि त्यांत जीव घातला, आणि तो पाण्यांत टाकला, तर मिठाचा ह्मणून विरघळून जातो, जमिनीवर ठेविला, तर मासा ह्मणून मरून जातो. या उदाहरणावरून **अत्मेनसि विरोधी ॥ ह्मणोनी नुरेचि ये संबंधी ॥ वेगळे तरी सिद्धी ॥ जायेचिना ॥** आप्तवाक्य याची व्यवस्था याप्रमाणें होते! आतां प्रत्यक्ष आणि अनुमान हीं जीं दोन तर्कशास्त्राचीं अन्य साधनें, त्याच्या अनुरोधानें अज्ञानाची गती काय होते पाहूं. प्रत्यक्ष पहावयाला जावें, तर ज्ञानेंद्रियें हीं अज्ञानाचीं, मग अज्ञानानें अज्ञानाला कसें ओळखावें? कार्य कारण या प्रकारानें अनुमान करायला जावें तर कारणापासून कार्य आभिन्न नाहीं, असें कोण ह्मणेल? तेव्हां अनुमानाची एथें गती नाहीं. जें मुळींच नाहीं, तें पहाण्याचें वेड कां तुह्मांला? ज्ञानोबा ह्मणतातः— **तेवीं पहावया अज्ञान ऐसें ॥ हें अंगीं पिसें कायसें ॥ न पहातां अपैसे ॥ न पहाणेंचि कीं ॥** कोण्याहि शास्त्रसिद्धांतानें या अज्ञानाच्या निर्धार करतां येत नाहीं. अज्ञानानें आपला शूरपणा सोडला आहे. पक्षकार ह्मणतात, हे चित्रविचित्र प्रकार आपल्या पुढें दिसताहेत, प्रत्येक वेळीं द्रष्ट्याला दृश्य भासत आहे. तो द्रष्टा परंपरेनें या चित्रविचित्र दृश्याची खटपट अनुभवित आहे. येवढ्यावरूनच दृश्य आणि द्रष्टा या दोहोंमध्यें दृश्य या पासून अज्ञानाचें अनुमान होतें. एक चंद्र दोन दिसूं लागतात. पाणी जमिनींत घालावें आणि तें झाडास पोचावें. हीं दोन उदाहरणें घेऊन दृश्यास्तव अज्ञान आहे, असा पक्ष उभा होतो. ज्ञानोबा ह्मणतात, दिवा लागला ह्मणजे अंधार होतो काय? किंवा चंद्राच्या चांदण्याला कधीं कोणी काळोख ह्मटलें आहे काय? पाण्यानें कधीं आग लागली आहे काय? पुनवेच्या चंद्रानें

अमावास्या होते काय? दङ्मात्र वस्तुजात ज्ञानपूर्ण असे अनेक सिद्धांताचे अनुवाद असतां, हा अ-ज्ञानाचा गोंधळ कुठून आणलात? जर हें दङ्मात्र आत्मा नव्हे, तर मग तो शून्य काय? शून्य ह्मणण्याजोगें कुठें कांहीं नसून ही व्यर्थ खटपट कां करावी? मिथ्यावाद ह्मणजे अज्ञानवाद यांत परमात्म्या-विषयीं शास्त्र मौन धरतें. विशेषवाद हे तर हवें तसें बहकतात. उदाहरणास्तवः— वेद सर्व शास्त्रांची योनि, आत्मनिर्धार आहे का त्यांत? नाहीं! सौरादि षड्दर्शनें-आत्मनिर्धाराशिवाय! देहवादी, चार्वाकादि, अहंकाराला मोठें प्राधान्य देतात, होतो आत्मनिर्धार त्यांच्या हातून? बौद्ध, मोठें बुद्धीचें प्राबल्य दा-खिवतात, झाला आहे आत्मनिर्धार यांच्या हातून? मीमांसक, नाना मीमांसा करतात, आत्मनिर्धार झाला आहे यांच्या हातून? विज्ञानवादी, ज्ञानेंद्रियांचें मोठे प्राधान्य सांगतात. झाला आहे आत्म-निर्धार? पुराणें व स्मृति इत्यादि अनंत शब्दजाल उत्पन्न करतात. आत्मनिर्धार आहे काय? योगी नाहीं त्या सिद्धी करतात. आत्मनिर्धार कुठें आहे? आत्मप्रत्ययाविषयीं निर्धाराचे मोठे दोन प्रकार दृष्टीस पडतात. एक शब्दानें व दुसरें दर्शनानें. दर्शनसंबंधींही नानाप्रकार आहेत. शब्दब्रह्माविषयीं पूर्वीच सिद्ध केलें आहे कीं, **शब्दाचा संचार नाहीं जेथें ॥** आतां अनेक मतांनीं त्याचें दर्शन होतें असें प्रतिपादिलें आहे. **दर्शन बीजें तेथें ॥ राणीव आणी ॥** ज्ञानोबा ह्मणतात, दर्शनाचा प्रकार ऐका, ज्याच्यामुळें दर्शनास दर्शनत्व, तेथें दर्शनाची काय महिमा? त्या अवर्णनीय ऐक्यांत दर्शनांत दर्शनत्व हा पृथक् भाव कसा होणार? व कोणास कोण भेटणार? **कोणा कोण भेटे ॥ दिठी कैंचि फुटे ॥ ऐक्यासकट पोटें ॥ आटोनि गेली ॥** तें ऐक्य असें पसरलें आहे कीं नित्य नवें अनंत तऱ्हेंचें. **दृश्याचिया सृष्टी ॥ दिठीवरी दिठी ॥ उठलीया तळवटी ॥ चिन्मात्रींचि ॥** तथापि अनंत जरी आहे ह्मणून तळवटचें जें एक चिन्मात्र तें, **आनघरीं जाणिजेना ॥** त्याला दुसरे कोणी दाखवून द्रष्टाकरितां येणार नाहीं. या ऐक्यांत द्रष्टा व जे अनंत तऱ्हेंचें दृश्य दर्शन हें कोण्या परीचें आहे? याला उदाहरणें, आरसा, वारू, पाणी व कल्लोळ, अग्नी व ज्वाळा, सूर्य व त्याचीं किरणें, चंद्र व चांदणें, कमळ व पांकळ्या, सह-स्रार्जुन व त्याचे हात, कोष्टयाचा माग व त्यांतील दोरे, अनंत शब्द व वाचा, गुळाची ढेप व त्याचे फुटून झालेले तुकडे, अशीं देतात, व ह्मणतात कीं, **हें दृश्य देखो ॥ किं बहु होवोनि फांको ॥ परि भेदाचा नव्हे विखो ॥ तेंचि ह्मणोनी ॥ १४९ ॥ तया आत्मयाच्या भाका ॥ न पडेचि दुसरी रेखा ॥ जरी विश्वा अशेखा ॥ भरलें आहे ॥** या दर्शन-संबंधानें जे पक्षकार यापुढें उभे केले आहेत त्यांत आत्मा एक नाहीं, परंतु अनंत आहेत, अशांचा पक्ष प्रथम उभा करितात, व दृश्य व द्रष्टा हीं पृथक असल्याशिवाय शुद्ध बुद्ध मुक्तस्वभाव जो आत्मा, याच्या मुक्तस्वभावामुळें हें जें दृश्य अनंत फांकलें आहे, हें फांकूंच सकणार नाहीं, असा सांख्यवाद उभा करितात. त्याला उदाहरण ज्ञानोबाचेंच घेऊन पक्षकार आपलें मत दर्शवितात. **दुबंधी क्षीरोदकीं ॥ वाने परी अनेकी ॥ दिसती तरी तितुकी ॥ सुतेआथी ॥** यावरून आत्मभिन्नत्व दर्शवितात. व **न फुटतां बीजकणिका ॥ माजी विस्तारे वडुअसिका ॥ तरी अद्वैत फांका ॥ उपमा आथी ॥** ह्मणजे चिद्रूप, पुरुष, आणि जड, प्रकृती, यांचा संबंध झाल्याशिवाय हे आपण अनंत होऊनी फांको असें जें ह्मणतात तें घडत नाहीं. पक्षकार ह्मणतात,

डोळ्याच्या पांपण्या झांकल्या ह्मणजे दृष्टी जी आहे ती आपापल्यांतच असते. चंद्राशिवाय समुद्राला भरती येते काय? अवसेस चंद्र सतराव्या कळेंत आहे तथापि चांदणे पडतें का? याकरितां हें तुमचें ऐक्य व्यर्थ आहे. **तैसें दृश्य जिणता द्रष्टें ॥ पडलें जैंताचि येकुटे ॥ तया नांव वावटें ॥ आपणपेया ॥ १६४ ॥** ज्ञानोबा ह्मणतात, खरें, अहो जें अनादी दृश्य, अनादी द्रष्टा, अनादी दर्शन, त्याला तुह्मीं कोणच्या रीतीनें जोडितां? त्यांत दोन कशीं उभीं राहतात? आकाश आणि गगन, स्पर्श आणि पवन, दीप्ति आणि तपन यांचा संबंध कसा जोडता? ऐक्यांतच सर्व प्रकार घडून येतात. हें मनाचें उदाहरण देऊन ज्ञानोबा स्पष्ट करून दाखवितात. व ह्मणतात कीं, **यालागीं एकें चिद्रूपें ॥ आपणया आपणपें ॥ देखिजे कां आरोपें ॥** रत्नावर कोणी दुसऱ्या तेजाचें पांघरूण आहे काय? सोन्याला सोनेपण यायला दुसरे कोणिकडे गेलें पाहिजे काय? याच-प्रमाणें गूळ, उजेड, अग्नि, वेल यांचीं उदाहरणें देतात, व ह्मणतात कीं. **ऐसें आपणया आपण॥ आपुलें निरीक्षण ॥ करावें येणेंविण ॥ करीतुचिअसे ॥ १७१ ॥** आतां जरी आपण असें ह्मणता तथापि योगबलानें द्रष्टा आणि दृश्य असें स्पष्ट आहे हें सिद्ध होतें. ज्ञानोबा विचारितात, या तुमच्या योगाचें पर्यवसान काय होतें बरें? व साक्षीरूप जो द्रष्टा हा आत्मपरिच्छेद करूं शकतो काय? नाहीं. **द्रष्टा दृश्य ऐसें ॥ दोन्हीं अळुमाळ दिसे ॥ येरपरस्परानु प्रवेशे ॥ कांहीं नाकी ॥** याप्रमाणें जें आपण साक्षीरूपानें द्रष्टा पाहतों असें ह्मणतां, हें बिलकूल नाहीं. व शेवटीं तुमच्याच निर्धाराप्रमाणें द्रष्टेपण दृश्यांत भरून, दोन्हीही न राहतां शेवटीं कांहींच राहत नाहीं. ह्मणजे—**एकाएकु वेंचला ॥ शून्य बिंदु शून्यें पुसला ॥ द्रष्टा दृश्या निमाला ॥ तैसें होये ॥** सरतेशेवटीं अनिर्वचनीय ऐक्यच. आतां, व्यवहारामध्यें त्रिपुटी भास होत आहे, असें जर ह्मणाल तर, विचारांती आपणाला स्पष्ट दिसतें कीं, कार्य, कारण, कर्ता, अशा तऱ्हेच्या जितक्या त्रिपुटी तितक्या प्रतिक्षणीं नाहींशा होत आहेत. हें कशा तऱ्हेनें घडतें तें १८२ पासून १९२ ओंवी पर्यंत दाखवितात. आतां द्रष्टा आणि दृश्य जर नाहीं, तर दृश्यदर्शनसंबंधानें हें ऐक्य कसें आहे हें सांगतात. **हे दोन्ही परस्परें ॥ नांदती एकाहारें ॥ बांधोनी येर येरें ॥ नाहीं केलें ॥** दृश्य खोटें आहे, द्रष्टा खरा असा भास तुमच्या बोलण्यांत दिसतो, असें ह्मणून दृश्य ही माया आहे, असें पक्षकार ह्मणतो. व हें दृढ करण्याकरितां, मुख दर्पणांत दिसणें, स्वप्नामध्यें जे भास होतात ते निद्रेमुळें, तसेंच मृगतृष्णा, सावली, हे दृष्टांत देतात. ज्ञानोबा ह्मणतात, आरसा पाहिला तरच मुख दिसतें नाहींतर वांया जातें काय? मुख हें आरशाशिवाय ठिकाणच्या ठिकाणीं आहेना? **ह्मणू-न आपणपे द्रष्टा ॥ नकरितांची असे पैठा ॥** याप्रमाणें दोरी सर्पाभास हा दृष्टांत व या तऱ्हेचे दुसरे दृष्टांत देऊन ह्मणतात कीं, **ह्मणोनी स्वंप्रकाशायया ॥ आपणपे देखावया ॥ निमित्त हा वांचोनिया ॥ नाहींचमा ॥** हीच गोष्ट जळ व तरंग, कापूर, गंगा, व सिंधू, घृत, ज्वाळा व वन्ही, असे दृष्टांत देऊन स्पष्ट करितात, आणि ह्मणतात कीं, **तैसें दृश्यकां द्रष्टा ॥ या दोन्ही देशा वांझटा ॥ पाहतां एकीकाष्ठा ॥ स्फूर्तीमात्र तो ॥** ही स्फूर्ति २४९ पा-सून २९१ ओंवीपर्यंत कशी आहे हें सांगतात. **येथें बोलणें नसाहे ॥ चालणें नसमाये ॥ अनुभऊन लाहे ॥ अंगी मिरौ ॥** या बोलण्याचा उपसंहार २६९ ओंवीपर्यंत करून या

आत्म्याशिवाय दुसरें कांहींच नाहीं असें सिद्ध करून दाखवितात. **ह्मणोनीये आत्मलीले ॥ नाही आन कांटाळे ॥ आतां ययाचि येतुले ॥ हाचि यया ॥** व शेवटीं ते **कोणेनिकृष्टे ॥ दाविले अज्ञानाचेनिबोटे ॥** तर या अज्ञानाची थोरवी जी ती आहे, ती अज्ञान या शब्दाच्या पूर्वी अ हें अक्षर ठेविल्यामुळेंच आहे. **अपूर्व ज्ञानाक्षरी ॥ वसतां ज्ञानाची थोरी ॥ शब्दार्थाची उजरी ॥ अपूर्व नव्हे कीं ॥** याप्रमाणे अखंड ज्ञान कसें आहे हें २९२ ओंवीपर्यंत सांगतात. **ह्मणोनी अज्ञानसद्भावो ॥ कोणेही परीनलाहो ॥ ह्मणून अज्ञानवावो ॥ पाहोंठे लीयाही ॥** असें ह्मणून हें सातवें प्रकरण संपतें.

**ह्मणोनि अज्ञानवावो ॥ पाहो ठेलिया ही ॥** याप्रमाणें आमचें जें नांव ज्ञानोबा, त्यावरून ज्ञान ह्मणून कांहीं असेल असें समजूं नये. गुरुदेव, जे यांनीं आह्माला आह्मींच करून टाकिलें. या वचनांनीं ज्ञानोबा असें दर्शवितात कीं, आह्मीं कोण आहोंत, ह्मणजे ऐक्य काय आहे, तर अनिर्वचनीय आहे. तर तें आह्मां आह्मीं आहों ह्मणजे तें ऐक्य कसें आहे? हें कसें समजावें? हा अनुभव कसा यावा? याला गुरूंनीं कांहीं, उपाय सांगितला आहे काय? होय, गुरूंनीं, **आह्मीं अह्मामाजी न समाये ॥** ह्मणजे, ऐक्यभाव समजावयाला जेवढे उपाय कराल ते सर्व द्वैत उभें करितात, असें स्पष्ट सांगितलें. तें कसें, तर त्या ऐक्यांत आत्मपण नाहीं, स्वसंवित्ति नाहीं, कैवल्य नाहीं, वाचेनें त्याची गोष्ट करितां येणार नाहीं, दृष्टीला तें दृश्य होणार नाहीं, तें भोग्य नव्हे, तें प्रकट नाहीं, तें लुप्त नाहीं. तेथें नवीनही कांहीं नाहीं. तर तें ऐक्य कसें आहे? तर प्रवृत्ति व निवृत्ति यांरहित जो निवृत्तिच्या योगानें अनिर्वचनीय स्थितींत आह्मीं आहोंत तें वाचेनें स्पष्ट करितां येत नाहीं. तेथें अज्ञानाचा काय पाड? तें नासून कसचें ज्ञान होणार? त्याला माया काय आवरण करूं सकेल? अहो! जेथें अज्ञान नाहीं, तेथें ज्ञान कोठलें हो! अज्ञान आणि ज्ञान ह्मणणें यामध्यें अर्थाचा अन्योन्याश्रय आहे, असें जर ह्मणाल , तर अज्ञान गेलें ह्मणजे ज्ञान होतें, ह्मणजे जसें स्त्रीचें डोकें काढून पुरुषाला लावलें व पुरुषाचें काढून स्त्रीस लावलें ह्मणजे दोन्ही ही नाहींशीं होतात, त्याप्रमाणें अज्ञान गेलें ह्मणजे ज्ञानही नाहींसें होतें. **एवं ज्ञानअज्ञान दोन्ही ॥ ये पोटी सुनी अहाणी ॥** असें ह्मणून हें आठवें प्रकरण संपतें.

प्रथम प्रकरणांत शिवशक्ति समावेश यारूपानें ऐक्य स्थापन केलें. तें ऐक्य कसें समजावें व गुरूपासून त्याचा कशा तऱ्हेचा बोध होतो, हें गुरुस्तवन या अध्यायांत सागितलें. हा बोध ह्मणजे शब्दब्रह्म याचें पर्यवसान काय आहे हें तृतीय प्रकरणांत सांगून, त्या बोधापासून ज्ञान प्राप्ति होते, व ती कशा तऱ्हेची आहे, हें चतुर्थ प्रकरणांत सांगून, त्या ज्ञानापासून आपण सच्चिदानंदस्वरूप आहोंत असें जें वाटतें याचा अभिप्राय काय आहे, हें पांचवे प्रकरणांत वर्णन करून, हे शब्द व अशा तऱ्हेच्या शब्दांची शास्त्रादिकांची प्रवृत्ति अधिष्ठानांत नाहीं, अज्ञानापासून बंध झालेला ह्मणजे तें अज्ञान, कोण्याही तऱ्हेनें नाहीं असें हें सातवें प्रकरण, मोक्ष अथवा जीवन्मुक्ति ही ज्ञानापासून प्राप्त होते, तर तें ज्ञानच नाहीं असें हें आठवें प्रकरण. आत्मस्थिति कोण्या प्रकारची आहे, तर ती एकरूप आहे, बंधमोक्षअतीत, अंतर्बाह्य आत्मास्थितीच, उपासना, योग, प्रत्यहारादि अष्टांगें, यांना बिलकूल सवड नाहीं. तर हा अखंड व्यापारही सर्वात्मस्थिति, हें अनिर्वचनीय ऐक्य कसें आहे? हें वर्णन करितां

जरी येत नाहीं, तरी त्याचें दिग्दर्शन ज्ञानोबा करितात, वास आणि घ्राणेंद्रिय, श्रवण आणि कर्णेंद्रिय, दृश्य पदार्थ आणि डोळा, हीं एकच आहेत. ह्मणजे ज्ञानेंद्रियें, व ज्ञान व ज्ञाता अशा या त्रिपुटीरहित एक अखंडज्ञान आहे. विंझणें, चांफा, व माथा जिव्हा व रस इत्यादी, भोग्य भोक्ता व भोग अशी त्रिपुटी नसतां एक अंखंड भोगच आहे. कमळ व सूर्य, चकोर व चंद्र, फूल व भ्रमर, अशा तऱ्हेचें कार्य कारण कर्ता अशी त्रिपुटी नसून एक अखंड कार्यच आहे, अशा तऱ्हेनें हें अनिर्वचनीय अद्वैत, अस्फुट, अक्रिय, कांहीं एक येथें अनुभव नाहीं. **वेंचूनीया कल्लोळ ॥ ह्मणोनि धापे करतळ ॥ तेथें तरी निखळ ॥ पाणीच फांके ॥** या दृष्टांतानें अनुभव कसा हें सांगितलें. पंच ज्ञानेंद्रियांचें काय होतें हें, **तेथें संबद्धो होय न होय ॥ तंव इंद्रियाचें तें नोहे ॥ मग असतची आहे ॥ संबंधुना ॥** हें आशावचनानें सांगितलें. वाचा, क्रिया, ज्ञान; इत्यादिकांचा, प्रकार, **तंव दोन्ही न होऊनी होये ॥ काय नेणो ॥** योग प्रत्याहार, कैवल्य, इत्यादी हे प्रवृत्तिमार्ग यांचा प्रकार असा होतो, **घरामाजी पाये ॥ घालतां मार्गुही तोचि होये ॥** आठव, विसर, समाधी, याचा प्रकार हा असा, **होऊनि ठेला एकांतु ॥ विश्वचि हें.** देव, भक्त, स्वामी, भृत्यु, यामध्यें, ध्यान निर्धारादी होत नाहींत, कारण, **नाहीं आनसंसारा ॥ देवेवांचुनीं ॥** याप्रमाणें सर्व रीतीनें ऐक्यच आहे, असें नाना तऱ्हेनें निरनिराळ्या निर्धारांचें प्रमुख लक्षणावरून ऐक्य कसें आहे हें सांगून, **कोणाचें कांहीं नेघसी ॥ कोणजाणे भोगसी ॥ गौरव कैसें ॥** असें ह्मणून हें नववें प्रकरण संपतें.

अनिर्वचनीय आहे, सर्वत्र ऐक्य आहे तें सर्वांस अनुभूत आहे, तेथें शब्दाचा संचार नाहीं, योगादिक साधनें नाहींत, ज्यांना बोधापासून ज्ञान नाहीं, असें जर सिद्ध आहे, तर आपण ग्रंथ कशाकरितां लिहिला? असा पूर्वपक्ष झाला असतां ज्ञानोबा ह्मणतात, अहो निवृत्ति, अहो तुह्मीं, अनिर्वचनीय कोणी एक, त्या तुह्मी अह्मांला नेहमीं अनिर्वचनीय सुखांत ठेविलें अहांत. त्या सुखाचें अनिर्वचनीय ऐक्य कसें आहे हें अनंतवस्तू धर्मावरून सतत प्रकटत आहे, ज्याचा जो वस्तुधर्म तो तेवढ्यापुरताच नसतो. ह्मणजे या अखंडऐक्यांत पृथक्त्व कोणासही नाहीं. परस्परानुप्रवेशानें हें ऐक्यच आहे. हे वस्तुधर्म, सूर्य, चंद्र, सिंधू, इत्यादिकांचीं उदाहरणें देऊन स्पष्ट करितात. ह्मणून **आह्मी बोलिलों जेंजें कांहीं ॥ तें प्रकटची असे ठाईं ॥ मास्वयंप्रकाशा कायी ॥ प्रकाशावें बोले ॥** सिद्धानुवाद करणें, हा एक आमचा धर्म, यांत आह्मीं विशेष कांहीं केलें नाहीं. **या कारणें मिया ॥ गौप्य दाविलें बोलोनियां ॥ ऐसें नाहीं अपैसया ॥ प्रकाशुची ॥** अशा तऱ्हेचें या ग्रंथाचें काय स्वरूप आहे हें सांगतात, **तैसें तिये ईश्वरीं ॥ अंगोळी नुभे दूसरी॥ किंबहुना सरोभरी ॥ श्रीशिवेंसिची ॥** असें हें दहावें प्रकरण संपतें. अधिकारानुरूप या अमृतानुभवग्रंथाचें हें असें दिग्दर्शन झालें.

ज्ञानोबाच्या अमृतानुभवग्रंथावर टिका बऱ्याच आहेत. अमृतानुभवपदबोधिनी या नांवें एक निरंजनांनीं केलेली आहे. दुसरी, विश्वनाथराव अथवा कोल्हापुरांत प्रसिद्ध भय्याकाका या नांवाचे, यांनीं केलेली, ज्योत्स्ना. तिसरी, हंसराजकृत समओवी. चवथी, प्रल्हादबावाकृत समश्लोकी. पांचवी,

ही श्रीअमृतानुभवविवरण नित्यानंदैक्यदीपिका. ही श्रीशिवकल्याणकृत. हे शिवकल्याण कोण? व कधीं झाले? याविषयीं उल्लेख दहावे प्रकर्णाचे शेवटीं श्रीशिवकल्याण स्वतांच करितात.

त्रिकाळ स्नान संध्या, सोंवळ्याओंवळ्याची खटपट, देवतार्चन, वेदघोष, भस्माचे पट्टे, मुद्रा, गोपिचंदनाचे नाम, धुपार्त्या, पंचाग्निसाधन, अग्निहोत्रादिक वेदोक्त कर्में, पुराणोक्त देवविशेष, स्थानविशेष यांचीं माहात्म्यें, तीर्थाटणें, उद्यापनें, अशा तऱ्हेचा, व याहीपेक्षां अतिबिकट ब्राह्मण्याचा प्रवात; व्याकरण, न्याय, मीमांसा, इत्यादिकांचा शास्त्रीलोकांचा ताठा; नानातऱ्हेचीं योगसाधनांचीं बळें, चित्रविचित्र, गोसावी, बैरागी, यति, बाळसंतोष, वासुदेव, इत्यादिकांच्या राहाटी व प्रचार, कर्मठ व न्यून शोधणाऱ्या भिक्षुकांचा कुटिलपणा, मध्व, रामानुज, वल्लभ, शांकर, इत्यादिकांचे नाना वेदांतवाद, या सर्व घोटाळ्यांत शिक्षेशिवाय, अध्ययनाशिवाय, उपदेशाशिवाय, कायिक, वाचिक, मानसिक व व्यावहारिक द्रव्यव्ययाशिवाय, सुईच्या अग्राचा देखील प्रवेश व्हावयाचा नाहीं, तर मोक्षप्राप्ती कशी व्हावी? क्षुद्र ऐहिक सुखाला जर प्रचंड व्यवसाय केला पाहिजे, तर मोक्ष प्राप्त होण्यास किती दुर्घट प्रयत्न? प्रयत्न कसूचा परंतु तें असाध्यच.

अशा तऱ्हेची ब्राह्मण्याची, वेदोक्त धर्माची, न्यायव्याकरणादि शास्त्रांची, योग्यांच्या सिद्धीची, बिकट गुरुशिष्यसांप्रदायाची, व पंथांची, व्यवस्था बसून गेलेली, अश्या प्रसंगीं अनाथ, ज्ञानहीन ह्मणून घेणारे, केवळ भगवन्नावाची नांव तयार करून भवसागर तरून जाण्याकरितां ठिकठिकाणीं सोपा मार्ग उत्पन्न झाला. चोखामेळ्यासारिख्या नीच जातीपासून ते शास्त्रसंपन्न श्रीरामाश्रमासारखी, मंडळी नाममार्गांत प्रवृत्त झाली. अशा या चमत्कारिक वेळीं ज्ञानोबांनीं आपल्या ज्ञानबलानें सर्व जगाचा घोंटाळा दूर केला. यांची निस्सीम भक्ति, यांचें आत्मविवेचन, याला दुसरी उपमाच नाहीं. ह्मणून सर्व भक्तांमध्यें हे शिरोमणी. यांचा अधिकार काय? तर व्यावहारिकरित्या पाहातां, हे वेदशास्त्रसंपन्न होते. यांच्या ज्ञानबलानें यांणीं जो सिद्धानुवाद केला आहे, यांत सर्वांची खरी खूण यांणी निर्विवाद अनुवादिली आहे. या अनुवादावरून अधिकारानुरूप यांचा अधिकार काय आहे, हा समजतो. याला पडताळून पहाणें असल्यास प्रत्येकानें या अनुवादाचा विचार करावा व ज्यांणीं ज्यांणीं यासंबंधानें या अनुवादाचा विचार केला आहे त्यामध्यें जो मतवाद दृष्टीस पडतो हाच या अधिकाराचा साक्षी आहे.

ज्ञानोबाचे सर्व प्राणिमात्रांवर उपकार आहेत. उंच नीच, सज्ञान, अज्ञान, जड चैतन्य, असे जे नाना तऱ्हेचे वाद, आह्मी सर्व बंदींत आहोंत, हा बंद आह्माला कर्मापासून झाला आहे, हीं सर्व कर्में अज्ञानमूलक आहेत, व हें अज्ञान अनादि आहे, यापासून सुटण्यास तप, यज्ञ, दानादि, प्रवृत्ति व निवृत्तिमार्गाशिवाय उपायच नाहीं; तर अशा ज्या नाना समजुती यापासून आह्मांस दूरकरून जें खरें ऐक्य आहे हें प्रकट केलें व जे आह्मीं बहकत होतों त्या आह्माला पावन केलें, हाच आमच्यावर यांचा मोठा उपकार. आतां ह्यांच्यापासून आह्मी कसा लाभ करून घ्यावा याचें उत्तर फार सोपें आहे. अध्यात्मज्ञानासंबंधीं जें विवेचन या भरतखंडांत झालें आहे, असें विवेचन कोणत्या देशांत झालेलें नाहीं. निदान जे यवन आह्मावर राज्य करीत आहेत, व ज्यांच्या राज्याचा

परिणाम सर्वप्रकारें आमच्या तन मन धनावर झाला आहे, असा दृष्टीस पडतो, तथापि या सिद्ध पुरुषाच्या अनुवादानें **प्रकाशाचीं कवाडें उघडून, जी आपली नित्यदेखणी दशा,** ती आपल्या जवळ नित्य असतां, आपणाला इतरांचें अनुकरण करण्याचें अगदीं कारण नाहीं, हाच लाभ. हा सर्वांस या अमृतानुभव ग्रंथाच्या सेवनानें व्हावा, हीच या ग्रंथ छापविणाऱ्याची इच्छा आहे.

---

श्रीशिवकल्याणकृत

# श्रीअमृतानुभवविवरणनित्यानंदैक्यदीपिका.

## प्रकरण प्रथम.

### शिवकल्याणकृत मंगलाचरण.

सद्गुरुंपरमानंदंवंदेआनंदविग्रहं ॥ यस्यसंनिधिमात्रेणचिदानंदायतेतनुः ॥ १ ॥ नित्यानं दायगुरवेशिष्यसंसारहारिणे ॥ भक्तकार्यैकदेहायनमस्तेचित्सदात्मने ॥ २ ॥ यस्यादर्शनमात्रतोखिलमिदंविश्वंसमाभासते यज्ज्ञानेनविलीयतेमृदियथाकुंभादयस्तन्मयाः ॥ एवंनित्यमनित्यवाग्विलसितंदूरंतरंगादिवत् नित्यानंदमहंभजामिसततंस्वानंदपूर्णपरं ॥ ३ ॥ नीलोत्पलदलश्यामंपद्मपत्रनिभेक्षणं ॥ ध्यायेच्छ्रीविठ्ठलंनित्यंजघनस्थकरद्वयं ॥ ४ ॥ ध्यायेन्नित्यंमहेशं रजतगिरिनिभंचारुचंद्रावतंसं रत्नाकल्पोज्वलांगंपरशुमृगवराभीतिहस्तंप्रसन्नं ॥ पद्मासीनं समंतात्स्तुतममरगणैर्व्याघ्रकृत्तिंवसानं विश्वाद्यंविश्ववंद्यंनिखिलभयहरंपंचवक्त्रंत्रिनेत्रं ॥ ५ ॥

जयजयजीचिन्मात्रपूर्णा ॥ नित्यानंदानित्यकल्याणा ॥ करुणाकरासुखघना ॥ गुरुवर्याजी ॥ १ ॥ तूंकाळत्रयींअविच्छिन्न ॥ यालागींनित्यकल्याण ॥ बोधबोधकतानसोन ॥ नित्यकल्याणजें ॥ २ ॥ बोधमात्रजैंअसेठायीं ॥ तेथैंउणेंहीहोणेंनाहीं ॥ अथवाबहूहोवोनिकांहीं ॥ फांकोंहीनेणें ॥ ३ ॥ एवंयेखूणेनचुकोन ॥ मीलाधलोंपसायदान ॥ हेंहीकांहींखूण ॥ तुंवांनविकारोनदाखविली ॥ ४ ॥ जेवींअमृतआणिमिष्टांशु ॥ हाभेदेंवीणअमृतींसहवासु ॥ तेवींमीदीनआणितूंईशु ॥ एकेचिरूपीं ॥ ५ ॥ जेवींरवीचेनिअनुग्रहें ॥ प्रभाप्रकाशवंतीहोये ॥ तेवींमीलाहेसोये ॥ तवञ्चेचि ॥ ६ ॥ तूंचिन्मात्रसिंधुनिष्कळ ॥ तेथेंमींतुझाप्रत्ययेकल्लोळ ॥ सर्वांगेंसीसजळ ॥ तुजमाजीवसे ॥७॥ तेथेंनावेकदिसेचपळपण ॥ परीतेंचपळताचिदिसेअचळपण ॥ निजांगेंजेंजीवन ॥ ढळलेंचिनाहीं ॥ ८ ॥ तेथेंलयआणिउपक्रमु ॥ तोउदयअस्तेंवीणस्वरूपाभिरामु ॥ ह्मणोनिचआत्मारामु ॥ ह्मणोलाहिजे ॥ ९ ॥ नानातूंस्वरूपाभिरमण ॥ तेथेंचिमीपावतसेंतुझेपण ॥ परीनवलतुझीअद्वैतखूण ॥ द्वंद्वभागानये ॥ १० ॥ तोमीतुझानिजदासु ॥ माझियेराहटीमाजीतूंईशु ॥ भरोनिक्रियालेशु ॥ उपजोंचिनेदिसी ॥ ११ ॥ प्रभुसच्चिदानंदात्र्यंबका ॥ तुजसच्चिदानंदत्वजियाअंबिका ॥ तियेस्वानुभूतीसीअसिका ॥ आनंदमात्रतूं ॥१२॥ नेणोंतियांतुजरूपकेलें ॥ किंवातुवांचितियादाविलें ॥ हेंवाउगेंकायबोलें ॥ बोलावेंप्रभू ॥ १३ ॥ अहोतुझानिर्धारुआलाहाता ॥ उगेंराहणेंघडलेंजीशतपथा ॥ त्यानिर्धारामाजिपाहतां ॥ अंबानाअंबाधीशु ॥ १४ ॥ नसोनिअंबानाअंबाधीशु ॥ विलासरूपतूंचिन्महेशु ॥ नावेकघेवोनिक्रूरवेशु ॥ त्रिपुरासुरासीवधिसी ॥ १५ ॥ सच्चिदानंदत्रिशूलेंवसविसीकर ॥ निवटिसीजीत्रिगुणत्रिपुर ॥ मगचित्सुखेंहेंचराचर ॥ दुमदुमोंलागे ॥ १६ ॥ असोतुझाजोचिदोन्मेश ॥ तोचिजीवात्मागणेश ॥ सर्वारंभींजयास ॥ श्रेष्ठत्वआलें ॥ १७॥ अहोतोआपुलेप्रसादेंकरूनी ॥ करवितसेयाजगाचीउभवणी ॥ परीआपणपूज्यमात्रवांचूनि ॥ नालिंपेकोठें ॥ १८॥ अहोजेंजेंकृत्यजयास ॥ तेथेंतेथेंसाह्यताघडतसेत्यांस ॥ परीसाक्षित्वेंकासयास ॥ लिप्तचिनव्हे ॥ १९ ॥

अहोप्रपंचोन्मुखहोवावयास ॥ हाचिदेतसेआपुलीवास ॥ आणिपरतोनितुझियागांवास ॥ येईजेव्हां ॥ २० ॥ तेव्हांत्याचेंचिलाहोनिकृपाजीवन ॥ ठाकिजेतसेजीतुझेंचिद्भुवन ॥ जेथें जनआणिविजन ॥ दोन्हींहीनसती ॥ २१ ॥ अहोतेगणेशींजेप्रसन्नता ॥ तयेगणेशींचअसेवा ग्देवता ॥ जेणेंनसणेंहेलोकत्रयता ॥ साकारजाली ॥ २२ ॥ ह्मणोनिहेचिजगन्माता ॥ जेकींग णेशाचीगणेशता ॥ तुझियाहीगांवायेतां ॥ दावितसेवाट ॥ २३ ॥ ह्मणोनिगणेशासहवर्तमान ॥ करूनिवाग्देवतानमन ॥ पावलोंजीचिद्भुवन ॥ भुवनाधिपतितुझें ॥ २४ ॥ जेथेंनागरिकआणि नगरनाथु ॥ नसोनिनांदसीतुंसततु ॥ तेथेंयावयाजावयाचीमातु ॥ कांहींचिनाहीं ॥ २५ ॥ अहोतुझेभुवनाचीआठवण ॥ तेअठवणचितुझेंभुवन ॥ जियेअठवणींविसराचीखूण ॥ शिवत लीचिनव्हती ॥ २६ ॥ ह्मणोनिआलेनिगेलेनिवीण ॥ नपावोनपाविजेतुझेंचिद्भुवन ॥ ऐसीजेतु झीखूण ॥ नपावोनपावलों ॥ २७ ॥ तेजेंपावतीवेळ ॥ जेथेंस्पर्शेलानाहींचिकाळ ॥ ह्मणोनि कालत्रयातीतकेवळ ॥ फावलाचिहोसी ॥ २८ ॥ ऐसाजोनिजबोध ॥ जेथेंनाहींबोध्यबोधकभे द ॥ तोचितूंस्वतःसिद्ध ॥ विठ्ठलरूपे ॥ २९ ॥ प्रभूतुजरूपायावयाचीसिराणी ॥ तेगिवसली मजविठ्ठलपणीं ॥ जेथेंनामरूपाचीझणी ॥ दिठिलागो ॥ ३० ॥ नव्हेवर्णनाअवर्ण ॥ शुक्लकृष्ण तेविहीन ॥ शामसुंदरचिद्घन ॥ वर्णातीत ॥ ३१ ॥ अहोरूपाअरूपातीत ॥ नामाअनामाविव र्जित ॥ शामसुंदरअद्भुत ॥ टवकारलेंअसे ॥ ३२ ॥ मोडूनियांत्वंपदतत्पद ॥ उभाभक्तीविटेव रीसमपद ॥ पदभेदेंवीणसच्चिदानंद ॥ विलासरूपी ॥ ३३ ॥ सत्पदआणिचित्पद ॥ हे जेतुझेकरद्वंद्व ॥ जेणेंआकळिलाआनंद ॥ भक्तीचेनिवशें ॥ ३४ ॥ एवंसच्चिद्‌हेकरद्वंद ॥ भक्तीचेनिमिशेंआनंद ॥ करूनिएकत्रसच्चिदानंद ॥ दाविलीखूण ॥ ३५ ॥ तेथेंनिजदासा चीआवडीभली ॥ तेपीतांबरमिसेंकासवेढियली ॥ मगनिश्चयेंमेखलेचीबळकाविली ॥ उल्लंघूंचिनसके ॥ ३६ ॥ तेथेंनाभिदेशब्रह्मभुवन ॥ जेंकींजगाचेंजन्मस्थान ॥ सर्वेचि उदरजेंगहन ॥ जेथेंसांठवलेंहेंजग ॥ ३७ ॥ ह्मणोनिजन्मलेसातांबाहेरनपडे ॥ वसतसेउद राचेनिसुरवाडे ॥ एवंचिन्मात्राचीरेखानमोडे ॥ जालेनिजगे ॥ ३८ ॥ आतांतुझाजोकंठदेशु ॥ जेथेंसामावलास्वप्नअन्यथाभासु ॥ तोतूंवैकुंठाधीशु ॥ लीलाधारी ॥ ३९ ॥ तेलीलानव्हे रमाआपण ॥ जेणेशोभसीतूंरमारमण ॥ तुरंबिसीसुमनमाळागहन ॥ रमेचेनियोगें ॥ ४० ॥ आतांयावरीजोशिरोभागसांग ॥ जोकींउपनिषदांचाहीउपरभाग ॥ जेणेंदेखणेंनिहेंजग ॥ देखणेंचिअघवें ॥ ४१ ॥ नानातेदेखतीखूण ॥ कींतेंदेखणेंचिजेथींचेंश्रवण ॥ नातरीनिगमाचें चिअधिष्ठान ॥ श्वासोश्वासी ॥ ४२ ॥ नानात्वतेंचीखूण ॥ जोहाशब्दराशीचआपण ॥ हानिवाडूचिजाण ॥ नाहींशिरोभागींजियें ॥ ४३ ॥ श्रुतिः ॥ येनवापश्यतियेनवाशृणोतियेन वागंधान् जिघ्रतियेनवावाचंकरोतिइत्यादि ॥ आतांयाअवध्याचेंअवसान ॥ जेथेंलोपतसे अवसानखूण ॥ तोमंडितूचिआपणयाआपण ॥ चिन्मात्रमुकुटीं ॥ ४४ ॥ नानामुकुटनव्हेतेंचि द्रत्न ॥ जोअधउपरिभागेंवीण ॥ जोनित्योदयोदैदीप्यमान ॥ तेजःपुंज ॥ ४५ ॥ एवंहानिज शांतियमुनातीरीं ॥ वसऊनिस्वानंदाभिरामसत्तमपुरी ॥ बोधअर्जुनाकरी ॥ पेलिलीकृपा ॥ ४६ ॥ तोआत्मारामपूर्णकाम ॥ जोतापत्रयतत्पदविश्राम ॥ जोस्वानंदाभिराम ॥ श्रीकृष्ण राजु ॥ ४७ ॥ हेजेतुवांदाविलीखूण ॥ जेणेंमीगेलोंतयाशरण ॥ सागरींजेवींसैंधवघन ॥ आ ळिंमूंगेलें ॥ ४८ ॥ परीतयामिळणीयाचीमाझारी ॥ मींजाहलोंअसेंप्रेमाधिकारी ॥ जेणेंजीतुझी उजरी ॥ नसंडिमातें ॥ ४९ ॥ नानाउजरीनव्हेआनंदु ॥ जोकींपूर्णत्वेंपरमानंदु ॥ नित्यत्वनि

त्यानंदु ॥ आमुचीमाये ॥ ५० ॥ अहोतुजह्मणावेंमाये ॥ तरीबापुकायदुजाआहे ॥ आतांतुझे आवडीचीसोये ॥ बोलविंजेजी ॥ ५१ ॥ तेबोलणियाचीपहिलें ॥ नव्हताचिअहासीसंचलें ॥ आतांनित्यानंदबोले ॥ आवडसीनिका ॥ ५२ ॥ किंवाआवडीचेनिवैभवें ॥ पालटेजरीतुजबो भावें ॥ तरीश्रीकृष्णयेणेंनांवें ॥ बोभातअसेंजी ॥ ५३ ॥ जेवींयेकुचिजोस्वादु ॥ क्षीरह्मणावें अथवादुग्धु ॥ तेवींआह्मासीनित्यानंदु ॥ श्रीकृष्णतोचि ॥ ५४ ॥ आतांपरमगुरूपरात्पर गुरू ॥ तरीनवीकरोनिहाअवघाविस्तारू ॥ श्रीआदिनाथमूळगुरू ॥ नबोलतांचिअसे ॥ ५५ ॥ तेथोनिंजेनावेकश्रेणी ॥ तेदाविजेग्रंथावसानीं ॥ माझाअधिवासनिरंजनीं ॥ नित्यानंदीं ॥ ५६ ॥ प्रभुतुझेंनित्यानंदपण ॥ जेंकींद्दष्ट्यात्रद्रष्टेपण ॥ हेंद्वंद्वभागानयेोन ॥ नमितसेंतुज ॥ ५७ ॥ प्रभू आनंदातुटीनाहीं ॥ ह्मणोनिकेलियानवीणनमनजेंकांहीं ॥ आणितियेचिखूणेंकेलेंतेही ॥ करणीं नव्हे ॥ ५८ ॥ हेंसांगिजेऐसेंनव्हे ॥ किंवाजाणीजेहेंहीनफवे ॥ तरीनेणणेंचिअघवें ॥ ऐसेंहीनव्हे ॥ ५९ ॥ जाणणेंनव्हेपरीजाणितलें ॥ येथेंसहजचिनेणणेंपारुषलें ॥ बोलतांनयेहेंहीबोले ॥ बोलिजेतसें ॥ ६० ॥ एवंजाणिवेवीणजाणोंलाहे ॥ किंवानबोलणेंचिबोलिजेतआहे ॥ जरी यथार्थेंपाये ॥ वंदिजेतितुझे ॥ ६१ ॥ प्रभूअबाधितपणजेंतुझें ॥ तेथेंचिवंदनमिरवतसे माझे ॥ येथेंवंदनाचेनिव्याजे ॥ विभागचिनपडे ॥ ६२ ॥ तुझानिर्धारुजैंलाहिजे ॥ तैसा निर्धारुचिनुधविजे ॥ अनुभवुचिअनुभविजे ॥ अनुभवेंकरी ॥ ६३ ॥ अनुभवेंअनुभविला अनुभव ॥ येथेंकरणीचानव्हेचिउगव ॥ किंवाउगेपणाचाभाव ॥ तोहीनव्हेकीं ॥ ६४ ॥ एवंप्रत्ययरूपाजोतूं ॥ जेथेंनाहींप्रत्ययहेतू ॥ किंवाप्रत्ययासीअघातु ॥ हेंहीनव्हे ॥ ६५ ॥ ह्मणोनितुझेंनित्यत्वयें ॥ ऐक्यताद्वंद्वभागासीनये ॥ विरोनिगेलेंप्रमेये ॥ प्रमाणामाजी ॥ ६६ ॥ प्रमेयाचेनिप्रकाशें ॥ प्रमाणआलेंप्रमाणदशे ॥ तेणेंप्रमाणेंकैसें ॥ प्रमेयसाधे ॥ ६७ ॥ जरी प्रमेयअसाध्यजालें ॥ मगसहजचिप्रमात्ववायांगेलें ॥ तस्मात्प्रमेयप्रमाणातीतभलें ॥ स्व रूपतुझें ॥ ६८ ॥ तयातुजनित्यानंदाप्रति ॥ तद्रूपचिहेमाझीविनंती ॥ जीतुझीस्वरूपस्थिति ॥ लाधलीऐसी ॥ ६९ ॥ जेवींउदयअस्तेंवीण ॥ रवीनुगवतांचिउगवतअसेजाण ॥ तेवींबोधें वीणखूण ॥ लाधलीबोधाची ॥ ७० ॥ अहोहेंबोध्यबोधकपण ॥ बोधमात्रकींजाण ॥ गूळगो डीमिळोन ॥ गूळमात्रजेवीं ॥ ७१ तेवींजाणतयाजाणता ॥ जाणीवनयेचिहाता ॥ आतांयेथेंपू र्वापरता ॥ आणावीकैंची ॥ ७२ ॥ असोजाणावेंनाहींलागलें ॥ हेंतंवमियाजाणीतलें ॥ एवंतु झियेकृपेचेंजालें ॥ सार्थकप्रभू ॥ ७३ ॥ हेंहीजेथेंनाहींउरलें ॥ ऐसेंकांहींठसावलें ॥ एवंतुझिये कृपेचेंभलें ॥ अवसानफळ ॥ ७४ ॥ परीहेंजेंअवसानकांहीं ॥ मूळींचिसांपडलेंपाहीं ॥ ह्मणो नितुझीकृपेसीनाहीं ॥ अवसानदशा ॥ ७५ ॥ असोऐसेंतुझेपाये ॥ भाग्यजरीमीलाहें ॥ यावरी मजकांहींआहे ॥ करणीयआतां ॥ ७६ ॥ यावरीमाझेनिदातारे ॥ महाकृपेचेनिपडिभारें ॥ बो लिलेंपरिसकारे ॥ खूणएकी ॥ ७७ ॥ राजाराज्यपदपावला ॥ छत्रचामरेंसीविलासला ॥ प रीराजाज्ञेसिनाहींजाला ॥ विस्तारजगीं ॥ ७८ ॥ आज्ञाजैंथोटावली ॥ तैंराज्यपदवीहिणाव ली ॥ ह्मणोनिजगामाजीमोकळी ॥ वर्तलीपाहिजे ॥ ७९ ॥ तेवींचोजवलीयाआत्मखूण ॥ परी तेंचिसरळदृष्टिवीण ॥ सुखाचाफुंजजाण ॥ नुतरेदेखा ॥ ८० ॥ तेंआत्मदृष्टिसमोर ॥ कांहींन सावाहीर ॥ विरोधाचीकोर ॥ उलंघूनजावें ॥ ८१ ॥ किंवाआत्मकळेचेठायीं ॥ विरोधासीच जन्मनाहीं ॥ ह्मणोनितियेदृष्टीसीकांहीं ॥ अंतरावोचिनसे ॥ ८२ ॥ तोस्वात्मानुभवरावोउदे ला ॥ तैंअंतरायतस्कराचाठावोपुरिला ॥ ऐसेंनव्हताजाला ॥ प्रत्ययोचिहीनु ॥ ८३ ॥

अहोराज्यपदवीजोपावे ॥ तेणेंविरोधिचोजवावे ॥ नाहींतरीअसावें ॥ स्वाभाविकसुखें ॥ ८४ ॥ तियेचोजवेऐलिकडे ॥ जरीउगाचितोपहुडे ॥ तरीकाळांतरींघडे ॥ अंतरायत्यासी ॥ ८५ ॥ हें बहुकायबोलावें ॥ जाणीवेवरीनजावें ॥ जालेपणाचेनिनांवें ॥ कैवल्यहीनको ॥ ८६ ॥ मजए कासीप्रत्ययोजाला ॥ येरुअज्ञानेंअसेनाशिला ॥ हाजयाचाहीनउतरला ॥ अहंकारसापु ॥ ८७ ॥ बोलेंप्रश्नेचींउत्तरें ॥ कवळिलाआहेअहंकारअजगरें ॥ जयाचेंलाधलेपणाचेंवारें ॥ गेलेंचिनाहीं ॥ ८८ ॥ तयासीजाणावीअर्जुनि ॥ स्वसुखाचीसिराणी ॥ एवंसरळदृष्टिवांचोनि ॥ कृतकृत्यतानाहीं ॥ ८९ ॥ अहोसाध्यसाधननाहीं ॥ ऐसेंचिसाधीजेपाहीं ॥ परीसाधिलेंपणकांहीं ॥ येवोंचिनेदावें ॥ ९० ॥ तरीयेथेंजालेपणासीभेवोन ॥ येवोंनेदिजेजालेपण ॥ तरीहेहीनव्हेखूण ॥ अनुभवाचीकीं ॥ ९१ ॥ येवाटेव्याघ्रआहे ॥ तरीयेवाटेसीचनवजावें ॥ तरीकाळांतरेंपावे ॥ ग्रासावयाव्याघ्रु ॥ ९२ ॥ एवंत्याचाठावोचिपुसावा ॥ तरीचपाविजेसफलभावा ॥ एवंकेलेंनिचीनव्हावा ॥ सरलाधिकारु ॥९३॥ गुरूकृपाखड्ग घेऊनि ॥ संशयविरोधेंविदारूनि ॥ स्वात्मानुभावराज्यधानीं ॥ पहुडावेंसुखें ॥ ९४ ॥ नातरीआह्मीजालोंब्रह्मज्ञानी ॥ एकात्मताअवघीजनीं ॥ ह्मणोनियत्त्वावच्चकरणी ॥ संपाडुंलागे ॥९५॥ अथवाआह्मीब्रह्मज्ञानी ॥ येरविश्वअवघेंअज्ञानी ॥ ह्मणोनिजनाचाह्मणी ॥ स्पर्शहोईल ॥ ९६ ॥ आह्मीब्रह्मविद्ब्राह्मण ॥ येरचांडाळकींअवघेजन ॥ ऐसेंजयाचेंज्ञान ॥ डुंबतअसे ॥ ९७ ॥ एवंदोहींहीपरीजाण ॥ लाधलीनाहींखूण ॥ एवंसरळदृष्टिवीण ॥ नजोडेशांति ॥ ९८ ॥ नातरीलाधलियाअवसान ॥ विसर्जावेंकर्माचरण ॥ अहोयावाक्याचाअर्थजाण ॥ नकळेचितया ॥ ९९ ॥ कांजेकर्मासीसांडोंजातां ॥ तत्काळजालाकर्त्ता ॥ एवंआत्मखूणेसीनेणता ॥ मनोरथकरिती ॥ १०० ॥ अथवाज्ञानियासीविधिनिषेधनाहीं ॥ परीलोकसंग्रहार्थकरावेंतेंही ॥ याहीवाक्याचाअर्थुपाहीं ॥ रोचनामात्र ॥ १ ॥ अहोस्वतंत्रतालाधला ॥ विरोधजयाचामोडला ॥ जालेपणाचाउतरला ॥ फुंजुचिज्याचा ॥ २ ॥ तेणेंआपणेंवीणकांहीं ॥ लोकुचिदेखिलानाहीं ॥ तयासीयेव्हडेंवोझेंकाई ॥ लोकसंग्रहाचें ॥३॥ त्यासीकर्तव्यताउरलीनाहीं ॥ तेलोकत्रयेसीपाहीं ॥ आणियथाधिकारासीकांहीं ॥ उल्लंघूनसके ॥ ४ ॥ माझीदेखिलागेल ॥ तेणेंहाजनतरेल ॥ ऐसेंजेथेंथांबेल ॥ तेथेंसरळताकैंची ॥ ५ ॥ निजसुखाचेनिभावें ॥ अविहिताकडेनधांवे ॥ स्वार्थाचेनिनांवें ॥ कैवल्यहीनेघे ॥ ६ ॥ अगालोकत्रयालोकभावे ॥ सुखवाचकजेंजेंअघवें ॥ तेंयेणेंस्वभावें ॥ आपणापैलाहिजे ॥ ७ ॥ तेंअपरोक्षसुखएक ॥ जेथेंहारपलेतिन्हीलोक ॥ तोकायबाह्यसुख ॥ चुंबावयाधांवे ॥ ८॥ जोस्वसुखाचेनिपडिभरेंजाण॥ विषयींनव्हेनाउदासीन॥ असोआत्मसुखाहून॥ नचाखेचिकांहीं ॥९॥ अगालोहेपरिसजयाचेपदरीं ॥ तोकायहिंडेदारोदारीं ॥ तेवींस्वानंदसरोवरीं ॥ पहुडलाजो ॥ १० ॥ तोमृगजळींनिघोंधांवे ॥ कींगंधर्वनगरींसुखावे ॥ किंबहुनाविषयाचेनिनांवें ॥ कैवल्यहीनेघे ॥ ११ ॥ नातरीविषयाचेनिअभिलाषें ॥ जगचिआत्मत्वेंदेखे ॥ मगइतराचींधनदारादिकें ॥ आपुलींचिमानी ॥ १२ ॥ हेंतंवलाधलेपणाचेंचिन्ह ॥ सर्वथानघडेगाजाण ॥ एवंतयासीआत्मखूण ॥ लाधलीचिनाहीं ॥ १३ ॥ अंगाज्ञानीभक्तवीतराग ॥ तिहींचेंएकचिकींलिंग ॥ ऐसीसरळतासांग ॥ भोगिजेआपण ॥ १४ ॥ आणिपर्वतायेव्हडाविरोध ॥ येऊनठाकेमत्तवाद॥ तऱ्हींस्वात्मनिष्ठाशुद्ध ॥ झडपेनाचिजया ॥ १५ ॥ तोस्वात्मानुभवहुताशन ॥ अंतरासीकरीदहन ॥ एवंसरळदृष्टिचीखूण ॥ आतुडेजंव ॥ १६ ॥ तंवश्रवणमनननिजध्यासन ॥ येथेंनव्हावेंउदासीन ॥ मगलाधलियासरळखूण ॥ वरूंयेशांति ॥ १७ ॥ मगशांतिसेजेपहुडोन ॥ कीजे

स्वात्मरसआस्वादन ॥ जेवींआपुलारसजाण ॥ रसनाभोगी ॥ १८ ॥ आतांशांतिश्रियेनेंवरि
ला ॥ राजाराज्यपदींविलासला ॥ तेणेंविलासेंसीचालिला ॥ विहाळिसीजरी ॥ १९ ॥ तरी
स्वात्मरसैकवनवाटिके ॥ नावेकअसावेंतेणेंकौतुकें ॥ सुखाचेनिसुखें ॥ भोगिजेकांहीं ॥ २० ॥
मगअंतराचेंछेदन ॥ करूनिपावलोंशांतिसदन ॥ एखादेवेळेंहेंआठवण ॥ पावेजरी ॥ २१ ॥
तरीतेईयेवाटिकेकरितांविहरण ॥ अवघ्रजालेपणाचेंविस्मरण ॥ होऊनिआत्मरमण ॥ विला
सोंलागे ॥ २२ ॥ ह्मणसीतेवाटिकाकिंलक्षण ॥ जेथेंसमाधीपावेसमाधान ॥ जेकींशाखापल्लवें
वीण ॥ रसवल्लीवेल्हाळ ॥ २३ ॥ तरीजेंआरोपकेलेंनिवीण ॥ महासिद्धेंलाविलीसेजाण ॥
तोमहासिद्धह्मणसीकोण ॥ तरीश्रीज्ञानाधिराजु ॥ २४ ॥ अगाकलिकालेंआकलितांजन ॥
हातींघेऊनिज्ञानखड्गजाण ॥ अवतरलाआत्मापूर्ण ॥ ज्ञानेश्वरवेशें ॥ २५ ॥ अगाज्ञानाज्ञानवि
हीन ॥ निखळज्ञानमात्रसंपूर्ण ॥ ह्मणोनिज्ञानेश्वरऐसीखूण ॥ रूपाआली ॥ २६ ॥ तेणेंश्रीगीता
लयाचेंकपाट ॥ उघडूनिकेलीमोकळीवाट ॥ गीतेश्वरप्रगट ॥ दाखविलालोकां ॥ २७ ॥ तया
गीतेश्वराचेंदर्शन ॥ केल्याहोतसेकलिकालभग्न ॥ मगकरावयाअमृतपान ॥ वाटिकारचिली
॥ २८ ॥ जेथेंविनारोपणेंवीण ॥ शाखापल्लवविहीन ॥ विकाशलीसेजाण ॥ अमृतलता ॥ २९ ॥
अगाजेअमृतातेंजीववितें ॥ ह्मणोनिअनुभवामृतह्मणिजेतयातें ॥ ह्मणिजेलोकह्मणतीजयातें ॥
अमृतऐसें ॥ ३० ॥ तयाअमृतींजेंअमरपण ॥ तेंअवघेंकींअनुमान ॥ जेंप्रळयकाळींमरण ॥
अमृताचिपावे ॥ ३१ ॥ यालागींहेंअनुभवामृत ॥ ह्मणिजेआतांचिअमरअनुमानरहित ॥ हेंसे
वितीतेहोत ॥ अनुभवामृताचि ॥ ३२ ॥ येथेंसमाधीसमाधान ॥ जालियासरळतालाहिजे
जाण ॥ अंतरायाचीखूण ॥ हारपोनिजाये ॥ ३३ ॥ तेथेंकरावयाविहरण ॥ नावेकमार्गुकरा
वासोपान ॥ मीप्रवर्तलोंतुवांजाण ॥ मजमागेंयावें ॥ ३४ ॥ ऐसेंश्रीनित्यानंदआपण ॥ बो
लिलेप्रसन्नोन्मुखवचन ॥ मीतयांचेपायधरून ॥ रिघालोंजंवआंत ॥ ३५ ॥ तंवतेथेंनित्यानंदु
चिकोंदलादिसे ॥ जोमजमाजीभरलाअसे ॥ ह्मणोनिमीस्वविलासें ॥ लागलोंहिंडों ॥ ३६ ॥
तंवआपआपणाशींविसरलों ॥ निखळनित्यानंदींचिबुडालों ॥ अष्टौसत्वभावहेबोलों ॥ तरीते
गुणसंबंधिकीं ॥ ३७ ॥ एवंऐसीयेनित्यानंदीं ॥ सुरवाडलोंमीनिरवधी ॥ तेंचिहोऊनितयाची
वंदीं ॥ पाउलें आतां ॥ ३८ ॥ अहोआणीकएकअवधारावें ॥ आज्ञापिलेंमाझेनिदेवें ॥ जेंयेथेंचि
असोनिकरावें ॥ विवरणविहरणातें ॥ ३९ ॥ नानातोमाझेंमिसकरून ॥ आपणकरितसेविह
रण ॥ मीत्याचेपायींजाण ॥ जडलोंचिअसें ॥ ४० ॥ असोमजकरवींतोबोलवितसे ॥ जेणेंरमती
संतमानसें ॥ येथेंतुह्मांसीहीआज्ञापुसे ॥ संतवृंदांसी ॥ ४१ ॥ श्रीनित्यानंदपाउलें ॥ साष्टांगेंसी
मियांनमियलें ॥ तेणेंतुह्मांपासींधाडिलें ॥ पुसावयादोष ॥ ४२ ॥ तरीतुह्मीआणिनित्यानंदु ॥
हामजतंवनादिसेभेदु ॥ ह्मणोनितुमचेपद्मपादु ॥ वंदितसेंमी ॥ ४३ ॥ स्वामीयाअनुभवामृतीं
जाण ॥ कर्तव्यतरीसमाधीसमाधान ॥ अधिकारीह्मणालकोण ॥ तरीनिरोपिलामागें ॥ ४४ ॥
तथापिमागुताबोलेन ॥ अधिकारीयाचीखूण ॥ जेणेंनित्यानंदपूर्ण ॥ लाहताहोये ॥ ४५ ॥ अहो
कमाऊनिआश्रमधर्मअंगें ॥ व्हावेंइहस्वर्गभोगींविरागे ॥ नित्यानित्यवस्तुविवेकचांगे ॥ उत्पन्न
व्हावा ॥ ४६ ॥ मगनिर्वेदाचीखूण ॥ निकिअपैसिहोयजाण ॥ जगाचीअनित्यताजाणोन ॥ वै
राग्यशुद्ध ॥ ४७ ॥ जेणेंविषाचीमारकताआढळे ॥ तरीविषत्याज्यहेंबरवेंकळे ॥ जरीजगअनि
त्यहेंविवळे ॥ तरीशुद्धवैराग्य ॥ ४८ ॥ आतांजालियावैराग्यउत्पन्न ॥ आकळेशमदमादिसा
धन ॥ मगजावयासद्गुरूसीशरण ॥ योग्यतापावे ॥ ४९ ॥ अहोतनुमनधनत्यागेंसी ॥ जडोनि

जाईजेगुरुपादपद्मासी ॥ परीयेथेंविश्वासासी ॥ करावेंसाह्य ॥ ५० ॥ अहोपरदेवतोचिनिज गुरु ॥ येथेंयेवोंनेदावाभेदाचाहिरु ॥ वेदवाक्याच्याभीतरु ॥ गुरूचीआज्ञा ॥ ५१ ॥ वेदाचा शिरोभाग ॥ तेथेंविश्वासउपजावाचांग ॥ कांजेमूर्तिमंतसांग ॥ गुरूचीआज्ञा ॥ ५२ ॥ किंवा आपणासजेंश्रुतनाहीं ॥ तेंगुरुराजबोलतीकांहीं ॥ तेथेंविश्वासअसोंद्यावापाहीं ॥ जेंवेदार्थु चिहा ॥ ५३ ॥ अहोजेथींच्याश्वासें ॥ वेदुआलाअसेस्पष्टदशे ॥ तेंमूर्तिमंतचिकैसें ॥ सद्गुरु रूप ॥ ५४ ॥ ह्मणोनिवेदाचेंअधिष्ठान ॥ तेंसद्गुरूचेंरूपजाण ॥ यालागींवेदार्थपूर्ण ॥ सद्गुरु वाक्य ॥ ५५ ॥ एवंऐसेनिविश्वासेकरीं ॥ सद्गुरुआज्ञालाधलीजरी ॥ मगयेव्हडीभवपुरी ॥ ट वाळहोय ॥५६॥ पावलातापत्रयोपशमन ॥ वोलांडिलेंत्वंपदतत्पदशोधन ॥ अन्वयव्यतिरेकाची खूण ॥ हारपलीजेथें ॥ ५७ ॥ सांडिलेपूर्वपक्षआणिसिद्धांतें ॥ विवर्तपरिणामकेउतेतेथें ॥ ऐसाविवळलातोयेथें ॥ अधिकारीजाणावा ॥ ५८ ॥ किंबहुनास्वसंवेद्यस्वानुभवखूण ॥ तेयेथें पहावीउमाणोन ॥ उणीपडेतरीसंपूर्ण ॥ तत्काळहोय ॥ ५९ ॥ येथेंसंबंधुहाजाणिजेसु ॥ जोवेदशिरोभागडंद्यु ॥ जोवेदमंथूनिसारांशु ॥ काढिलाअसे ॥ ६० ॥ तेश्रुतियेथेंप्रमाण ॥ किंवहुनाविश्वात्मकाईशाचेंवचन ॥ तेंहेंअनुभवामृतहेखूण ॥ जाणोनिघेईं ॥ ६१ ॥ अहोहेंये चिग्रंथींपाहीं ॥ अवसानींबोलिलेंसेकांहीं ॥ जेंयाग्रंथाबाहेरनाहीं ॥ उपनिषदार्थु ॥ ६२ ह्मणो नमतांतरसांडून ॥ करावेंहेंअमृतपान ॥ मगहेंअमृतचिआपण ॥ होऊनिठाकिजे ॥ ६३ ॥ नात रीस्वात्मानुभूतिखूण ॥ आणिश्रीगुरूचेंवचन ॥ आतांईयेठायीजाण ॥ उमजोनिघ्यावें ॥ ६४ ॥ तेंयेथेंपाहिजेपडताळून ॥ चुकेतरीयेथेंजाण ॥ जेंअसेलकांहींउण ॥ तेंकरावेंपुरें ॥ ६५ ॥ कांजें अधिकारेंवीण ॥ उमजलेंनाहींगुरुवचन ॥ नातरीसद्गुरूचेंमहिमान ॥ वर्णितांशब्दरासीशिण ल्या ॥ ६६ ॥ नव्हतांसद्गुरुकृपापूर्ण ॥ नकळेयेथचेंगुह्यज्ञान ॥ तेथेंहाप्राकृतजन ॥ जाणेलका ई ॥ ६७ ॥ ऐसेसद्गुरुहीदुर्लभजाण ॥ नातरीअर्थवादेंभरलेंरान ॥ आतांयेथेंसमाधान ॥ कैसेंनि होये ॥ ६८ ॥ ह्मणोनियामृताजाण ॥ जेअसतीसंपन्न ॥ तयांचेंवचनपूर्ण ॥ निगमाचेंशिर ॥ ६९ ॥ असोशांतजनींस्वीकारावें ॥ परीअवधानसेवटान्यावें ॥ अवधानेंवीणनपवे ॥ येथील खूण ॥ ७० ॥ विचारावाआद्यंतग्रंथु ॥ धरावाविवेकाचाहातु ॥ जेणेंयेथीलतात्पर्यार्थु ॥ लाहि जेनिका ॥ ७१ ॥ आतांमीहेंनेणेंकांहीं ॥ याठेवाठेवीकाजकाई ॥ श्रीनित्यानंदपायीं ॥ निवांतजा लों ॥ ७२ ॥ तवतेणेंवाचाचेववीली ॥ तेअनुभवामृतपदेंधांडोली ॥ आपलेपाडेनव्हाळी ॥ ला गलोंघेवों ॥ ७३ ॥ अहोअमृतसिंधुभरलाआहे ॥ परीमाझीयेचाचुवेससमावेशहोय ॥ मीतितु कियाचेपात्रहोलाहे ॥ येरजैसेंतैसें ॥ ७४ ॥ असोमीआपुलीमतिअनुलक्षून ॥ पाहतुसेपाहेविव रून ॥ तेंबोलेनजरीसज्ञान ॥ अवधानदेती ॥ ७५ ॥ आतांघालूनिसज्जनांसीलोटांगण ॥ श्रीनि त्यानंदस्मरणकरून ॥ यथामतिविवरण ॥ आरंभुकेला ॥ ७६ ॥ नानायाग्रंथाचाडनाहीं ॥ प रीमनासीठेवावयाठाईं ॥ बोबडाबोलीकांहीं ॥ आदरिलेबोलों ॥ ७७ ॥ जेवींबाळाचेबोबडेबो ल ॥ मायबापासीहोतीनवल ॥ तेवींनावेकतोषिजेल ॥ सज्जनींतुह्मी ॥ ७८ ॥ आतांमूळग्रंथ मंगळाचरण ॥ श्लोकपंचकेंअसेजाण ॥ प्रस्तुततेश्लोकविवरण ॥ अवधाराहोजी ॥७९॥ लाधो ननित्यानंदखूण ॥ तेणेंआनंदेंनिरावसान ॥ अंतींशिवरूपचिकल्याण ॥ अवघेंजग ॥ १८० ॥
इतिश्रीअनुभवामृतविवरणे नित्यानंदसूतविरचिते मंगळाचरणं समाप्तम् ॥

रस्परतानाहीं ॥ विषयनव्हेसीनाविषयी ॥ आणितुजवीणतंवकाहीं ॥ रितेंनसें ॥ ९३ ॥ परंतु जोकीजेनिर्धारू ॥ तोतूंयाहूनिपरू ॥ निश्चयनसकेकरूं ॥ ह्मणोनपुढेंहीबोले ॥ ९४ ॥

**शिवशिवासद्गुरु ॥ तुजलागूढाकायकरु ॥**
**एकाहीनिर्धारुधरूं ॥ देतासीकां ॥ ३७ ॥**

बोलाचाविषयनव्हे ॥ आणिबोलतंवबोलिकाचिआहे ॥ येणेंआश्रियेंशिवशिवहें ॥ स्मरण केलें ॥ ९५ ॥ सद्गुरुगूढातुजला ॥ ह्मणिजेचिन्मात्रत्वेंचिसंचला ॥ निर्देशनजायकेला ॥ एकही तुज ॥ ९६ ॥ निर्धारनिर्धारितांजाय ॥ तंवअनिर्धारुचितोहोये ॥ पुढेंहीहेंचिआहे ॥ विशद कथन ॥ ९७ ॥

**नामेंरूपेंबहुवसें ॥ उभारूनिपाडिलींवोसें ॥**
**सत्तेचेनिआवेशें ॥ तोषलासीना ॥ ३८ ॥**

सत्तेचेनिआवेशें ॥ नामरूपताहीदिसे ॥ परीस्वरूपतेथेंनसंतोषे ॥ नव्हेनामरूपात्मक ॥९८॥ अथवासत्तेचेनिआवेशें ॥ कौतुकाचेनिमिशें ॥ वाउगीचिआभासे ॥ नामरूपता ॥ ९९ ॥ परी तेमनोरथचिपुरती ॥ तात्त्विकेंतिथिरिती ॥ जेवींगंधर्वनगरींपंक्ति ॥ ढवळारांची ॥ ३०० ॥ अहोसत्ताज्ञानेंसीअभिन्न ॥ तियेज्ञानींकायनुमटेभान ॥ परंतुआपुलीकळासांडून ॥ नव्हेचि नामरूपात्मक ॥ १ ॥ अरूपासीभाऊनरूप ॥ अनामासीनामाचेंमाप ॥ लाऊनस्वरूप ॥ मवावें केवीं ॥ २ ॥ यालागींनामरूपनघडे ॥ आणिघडलेंदिसेतरीरोकडें ॥ परीस्वरूपनमोडे ॥ आपु लीयेदशे ॥ ३ ॥ एवंसत्तेसीचिदावेश ॥ सुखत्वेंजोउल्हास ॥ तेणेंचिहाचिदाभास ॥ उभार लादिसे ॥ ४ ॥ परीतुसुधेंचिनामरूप ॥ तत्त्वतापहातांखपुष्प ॥ दृश्यत्वेंस्वरूप ॥ भंगलेंनाहीं ॥ ५ ॥ एवंआपलेनितोषें ॥ आपणचिविलासे ॥ परीदूसरीयेदशे ॥ नयेसीचि ॥ ६ ॥ आतांना मरूपात्मकह्मणावें ॥ किंत्यावेगळेंभावावें ॥ हेउगवितांनुगवे ॥ निर्द्धारासी ॥ ७ ॥ नामरूपादि आभास ॥ स्वरूपींनाहींनिःशेष ॥ आणिस्वरूपावेगळायास ॥ ठावहीनाहीं ॥ ८ ॥ ह्मणोननि र्धारुनसाहे ॥ ऐसेंबोलिलाआहे ॥ आणिपुढेंहीयेचिअभिप्रायें ॥ बोलतअसे ॥ ९ ॥

**जीउधेतलीयाउणे ॥ चालोंनेदेसीसाजणे ॥**
**भृत्युउरेस्वामीपणें ॥ तेंहीनव्हें ॥ ३९ ॥**

जीवपणाचेनित्रासें ॥ शिवत्वेंशिवभासे ॥ तरीनासलेंचिननाशे ॥ जीवत्वचिथितें ॥ ३१० ॥ ह्मणोनिशिवपणहीहेंनव्हे ॥ जेथेंजीवत्वचिदुणावे ॥ एवंशिवतोशिवनव्हे ॥ जीवाचेनिसंबंधें ॥ ११ ॥ एवंजीवपणासीदेऊनिबाध ॥ साधिजेशिवपणशुद्ध ॥ तरीवोडवेंअबद्ध ॥ प्रत्ययोऐसा ॥ १२ ॥ येथेंपूर्वापरताआटली ॥ अखंडताडुरावोनिगेली ॥ कल्पनेचीजाली ॥ सिराणीयेथें १३ अथवाजीवासीभाऊनिउणीव ॥ शिवासीदेऊनिगौरव ॥ येरीतीजीवशिवभाव ॥ चालवावें ॥ १४ ॥ तरीहेंहीचालोंनेदेसी ॥ याभेदासीदूषिसी ॥ आतांजीवचिशिवऐसी ॥ निष्ठाकरावी ॥ १५ ॥ तरीजीवधर्मशिवाच्याठाईं ॥ आरोपितीलकींपाहीं ॥ ह्मणोनितुजचिन्मात्रामाजींना हीं ॥ हेहीवार्त्ता ॥ १६ ॥ जीवचिउरेशिवपणें ॥ तरीहेंहीयेथेंवायाणें ॥ जीवचिनघडेजीवपणें ॥ माशिवत्वकैंचें ॥ १७ ॥ जीवाचेंसाक्षत्वजेथेंअसे ॥ तेंबोलिजेशिवत्वऐसें ॥ तरीस्वरूपआलेंचि

नाहींजीवदशे ॥ मासाक्षित्वकैंचें ॥ १८ ॥ चिन्मात्रजैसेंतैसें ॥ तेथेंशिवजीवभावकायिसे ॥ तस्मात्‌निर्धारनसोसे ॥ स्वरूपींकांहीं ॥ १९ ॥

**विशेषाचेनिनांवें ॥ आत्मत्वहीनासावें ॥**
**किंबहुनानव्हावें ॥ कोण्हीचयया ॥ ४० ॥**

आतांजीवशिवहेंकिंनिष्ठ ॥ येकुआत्माचिवरिष्ठ ॥ हेंहीह्मणतांनिकृष्ट ॥ आत्माचिदिसे ॥३२०॥ सोनयाचीसाली ॥ किसूनपरतीकेली ॥ तरीमुद्‌लासीचिआली ॥ नागवणजैसी ॥ २१ ॥ तैसें जीवशिवमागहेंगौण ॥ नाथिलेंचिआत्मत्वींभाऊन ॥ मगआत्मत्वींउत्तमपण ॥ निराळेंकैंचें ॥२२॥ जीवपणाचेनिभावें ॥ शिवत्वींगौणत्वपावे ॥ तरीआत्मत्वींसंभवे ॥ उत्तमताकैंची ॥ २३ ॥ सामान्याचेनिभावें ॥ तेंहीविशेषनव्हे ॥ तस्मात्‌आत्मत्वींनसंभवे ॥ निर्धारकोण्ही ॥ २४ ॥ नाना स्वरूपएकसमान ॥ तरीसामान्यविशेषतेंकोण ॥ एवंजैसेसामान्य ॥ तैसेंचिविशेष ॥ २५ ॥ एवंआत्मास्वतःसिद्ध ॥ याचासंबंधेंहोयबोध ॥ किंवाअनात्मवर्गासीबाध ॥ देऊनिसाधिजे ॥ २६ ॥ ऐसेंआत्मत्वनव्हें ॥ स्वरूपींदुसरेनसाहें ॥ माबोधूनतेंकाय ॥ स्वात्मत्वबोधु ॥ २७ ॥ पुढेंहीयेचिअभिप्रायें ॥ ग्रंथमुळींबोलिलेंआहे ॥ सांगेनजरीअवधानलाहे ॥ श्रोतयांचें ॥ २८ ॥

**रातिनुरेचिसूर्या ॥ नातरीलवणपाणिया ॥**
**नुरेजेवींचेइलिया ॥ निद्‌जैसी ॥ ४१ ॥**

रातीचेनिनाशें ॥ सूर्यशोभेंप्रकाशे ॥ ऐसेंतंवसूर्यासीनसे ॥ सूर्यत्वेंपाहीं ॥ २९ ॥ मुळींसूर्याच्यागांवीं ॥ रात्रीचाउदयोनाहीं ॥ मानिवारीलकाई ॥ मगसूर्यत्वपावे ॥ ३३० ॥ किंवाक्षारजळींलवण ॥ मिळालेंतरीउदकींक्षारपण ॥ ऐसेंनव्हेतेंआपण ॥ अर्थींचक्षार ॥ ३१ ॥ हाउदकाचाचिस्वभाव ॥ जेथेंलवणाचाचिअभाव ॥ त्याचेनिस्वभावेंक्षारभाव ॥ कैसेनिपावे ॥ ३२ ॥ किंवानिद्रेचेनिनिराकरणें ॥ जागृतिअसेजागणेपणें ॥ ऐसेंनव्हेतेंआपणे ॥ अर्थींचिआहे ॥ ३३॥ मुळींजागृतीचाअभाव ॥ तोनिद्रेनेंकेलाठाव ॥ हेंबोलणेंचिवाव ॥ बोलतांदिसे ॥ ३४ ॥ जेजागृतीचिविसावली ॥ निद्रारूपेंपरिणमली ॥ मगआपणउभारली ॥ आपणाचेनी ॥ ३५ ॥ तेवीं स्वात्मरूपासीकांहीं ॥ अन्यथाहोणेंनाहीं ॥ तेथेंदुजेनसंबंधेंकायी ॥ आत्मत्वपावे ॥ ३६ ॥ एवं सामान्यासबाध ॥ देऊनिनिवडिजेएकशुद्ध ॥ तरीतेंशुद्धताचिअबद्ध ॥ बोडवेपाहीं ॥ ३७ ॥ अगाअन्यथाभासाचीनिवृत्ति ॥ साधूनिआत्माआत्मस्थिती ॥ येईलहेवदंति ॥ अनुभवरहित ॥ ३८ ॥ आत्म्याचेनिप्रकाशें ॥ अन्यथाभासभासे ॥ तेणेंचिप्रकाशेंनासे ॥ अन्यथाभास ॥३९॥ किंबहुनाआत्मत्वाच्याठायीं ॥ अन्यथाभासुचिनाहीं ॥ जोदिसेकांहीं ॥ तोचिद्विलासु ॥ ३४० ॥ ह्मणोनआत्मत्वींकांहीं ॥ निषेधाभागचिनाहीं ॥ तेथेंविशेषतातेंकायी ॥ मिरवेयेथें ॥ ४१ ॥ आतांनाथिलेंचिनाशितां ॥ तोनाशनव्हेनानाशकर्ता ॥ उभयपक्षींवृथा ॥ होऊनिठाकी ॥ ४२ ॥ ह्मणोनयेणेंसंबंधें ॥ बोलिलेंपुढिलेनिपदें ॥ तेंचिआतांविशदें ॥ विवरूनपाहों ॥ ४३ ॥

**कापुराचेंथळिव ॥ नुरवीचिआगीचीबरव ॥**
**नुरेचिरूपनांव ॥ तैसेंयया ॥ ४२ ॥**

कापुराच्यापदार्थींजाण ॥ दहनींप्रवर्तेंहुताशन ॥ तैंअग्निसहितदहन ॥ होऊनिठाके ॥ ४४ ॥

नातरीकापुराचीथाळी ॥ तियेतेंजैंअग्निप्रज्वली ॥ तैंअग्नीसहितजाली ॥ बोळवणपैं ॥ ४५ ॥ दोंहींच्यामिळणी ॥ दोंहींसहीजालीआटणी ॥ कापुरातेंहरोनी ॥ अग्निहीआटे ॥ ४६ ॥ तेवीं आत्मयाचेनिबोधें ॥ हारलींनामरूपात्मकेंद्वंद्वें ॥ मगआत्मत्वींकेवींनांदे ॥ आत्मत्वविशेषु ॥४७॥ अगानामरूपाविहीन ॥ जेंअसणेंतेंनसोनिचिजाण ॥ तेविशेषनासामान्य ॥ चिन्मात्रवस्तु ॥४८॥ आत्माचिन्मात्रनिखळ ॥ येथेंनिवडावेभागशुद्धसवळ ॥ तैंहोऊनिठाकेकेवळ ॥ नामरूपात्म कताचि ॥ ४९ ॥ तरीआत्मत्वींनामरूपनाहीं ॥ तेथेंविशेषतातैंआतांकाई ॥ ह्मणोनिआत्मबोधें पाही ॥ आत्मत्वविशेषहीनघडे ॥ ३५० ॥ कांजेंविशेषसामान्यविहीन ॥ आत्मयानाहींअहंपण ॥ ह्मणोनसामान्यासवेंजाण ॥ विशेषताहीगेली ॥ ५१ ॥ एवंनामरूपाविहीन ॥ जयाचेंनसोनि चिअसणेंजाण ॥ आतांयेथेंवंदन ॥ घडेकेवीं ॥ ५२ ॥ जेथेंनिर्धारुचिनसाहे ॥ जेंकींनामरूपा त्मकनव्हे ॥ तेंवंदनासीहोलाहे ॥ वंद्यकैसें ॥ ५३ ॥ पुढेंऐसेंचिनिरूपण ॥ मूळवोवीचेंअसे जाण ॥ तेंहीआतांविवरून ॥ सांगिजेल ॥ ५४ ॥

**याच्याहातापायांपडे ॥ तरीवंद्यत्वेंपुढेंनमंडे ॥**
**नपडेचिहाभिडे ॥ भेदाचीये ॥ ४३ ॥**

नानाप्रकारेंयासी ॥ वंदावयाउद्देशी ॥ परीवंद्यनव्हेवंदनासी ॥ चिन्मात्रत्वें ॥ ५५ ॥ निख ळचिन्मात्रगुरुलिंग ॥ तेथेंकैंचेवंद्यवंदनभाग ॥ एकलेंचिअभंग ॥ सर्वदाअसे ॥ ५६ ॥ ह्मणोन दृष्टांतेंसहित ॥ पुढेंहीऐसेंचिबोलत ॥ ऐकावेंदत्तचित्त ॥ श्रोतेजनींपैं ॥ ५७ ॥

**आपणाप्रतिरवी ॥ उदोनकरीजेवीं ॥**
**हावंद्यनव्हेतेवीं ॥ वंदनासीपैं ॥ ४४ ॥**

सिद्धउदयजोभास्कर ॥ तेथेंकोणकोणउदेजेउदयकर ॥ किंवात्याचातोप्रकाशकर ॥ ऐसेंही नव्हे ॥ ५८ ॥ कांजेअस्तासीठावनाहीं ॥ तेथेंउदयतोआतांकायी ॥ ह्मणोनत्याचात्यासीपाहीं ॥ उदयनाअस्तु ॥ ५९ ॥ तेवींनिरंतरज्ञानघन ॥ एकाकीपरिपूर्ण ॥ आपणयाआपण ॥ नित्यप्राप्त ॥ ३६० ॥ वियोगुचिसंभवलानाहीं ॥ आतांवंदनेंकाजकायी ॥ किंबहुनाकांहीं ॥ विषयनव्हे ॥ ६१ ॥ तेंआत्मत्वींआत्मेंवीण ॥ अणूसीहीनाहींअणुपण ॥ येणेंवंद्यव्हावेंजाण ॥ कोणाप्रति ॥ ६२ ॥ आतांसुखाचेनिभरें ॥ किंचित्वंदावयास्फुरे ॥ तऱ्हींवंद्यत्वाचियेभरें ॥ उभानठाके ॥ ६३ ॥ जेवींपडशब्देंसीवाद ॥ करितांजोउठेभेद ॥ तोभेदचिनिर्द्वंद्व ॥ निमालाठायीं ॥ ६४ ॥ वंदिताहीनव्हेवंद्य ॥ जोआपलाआपणआद्य ॥ तेथेंवंद्यवंदकभेद ॥ उठेकेवीं ॥ ६५ ॥

**कांसमोरपणआपुलें ॥ नलाहिजेकांहींकेलें ॥**
**तैसेंवंद्यत्वघातलें ॥ हिरोनियेणें ॥ ४५ ॥**

आपुलीसन्मुखता ॥ आपणकोणिहलाहाता ॥ परीआत्माह्मणोंयेता ॥ वंद्यकोण्हा ॥ ६६ ॥

**आकाशाचाआरिसा ॥ नुठेप्रतिबिंबाचाठसा ॥**
**हावंद्यनव्हेतैसा ॥ नमस्कारासी ॥ ४६ ॥**

जऱ्हींआरिसाप्रतिभासक ॥ तऱ्हींआकाशनबिंबेदेख ॥ निरावेवसम्यक ॥ ह्मणोनियां ॥ ६७ ॥ आकाशाचेनिगुणेंजाण ॥ आरिसाउठेप्रतिभान ॥ ह्मणोनआपणाआपण ॥ भासकनव्हे ॥ ६८ ॥

आकाशेंजेथेंनसावें ॥ तेणेंतेथेंप्रतिबिंबावें ॥ आपलेस्वभावें ॥ स्वतःसिद्धअसे ॥ ६९ ॥ तेवीं आत्मानिरावेव ॥ नमस्कारुहासावेव ॥ सावेवींनिरावेव ॥ बिंबेलकाई ॥ ३७० ॥ आत्माएक पूर्ण ॥ तोनमनबुद्धिपरिच्छिन्न ॥ मानूनकीजेवंदन ॥ तरीतेंनघडे ॥ ७१ ॥ आत्मापूर्णअसतां ॥ वंद्यनव्हेनावंदिता ॥ ह्मणोनऐसेंचिआतां ॥ बोलिजेल ॥ ७२ ॥

**परीनव्हेतरीनव्हो ॥ हेवैखासेंकांघेवो ॥**
**परीवंदितयाहीठावो ॥ उरोंनेदी ॥ ४७ ॥**

आपणयाआपण ॥ वंद्यनव्हेहेंप्रमाण ॥ कासयाअघटमान ॥ मानावेंहें ॥ ७३ ॥ तऱ्हींवंद्य नव्हेहेंभलें ॥ परीवंदितेपणहीनेलें ॥ हेंएकेचिबोलें ॥ साधलेंअसें ॥ ७४ ॥ एकुचिएकलापूर्ण ॥ तोवंद्यनव्हेहेजाणवेखूण ॥ तैसाहाजेंवंदितेपण ॥ गेलेंचिअसें ॥ ७५ ॥ येविषयींदृष्टांत ॥ देऊ नियांप्रबोधित ॥ ऐकावेंदत्तचित्त ॥ होऊनियांपैं ॥ ७६ ॥

**अंगौनियेकुणाझोलु ॥ फेडिताचितरीतोबाहीरुलु ॥**
**कडुफिटेआंतुलु ॥ नफेडितांचि ॥ ४८ ॥**

एकपदरीजेंवसन ॥ केलेंअसेंपरिधान ॥ तेंटाकणेंपडेजेंजाण ॥ आंतलेकडे ॥ ७७ ॥ मगबा हेरीलकडउरला ॥ प्रमाणनयेचियाबोला ॥ नफेडितांचिफिटला ॥ आंतुलासवें ॥ ७८ ॥ तेवीं आपणयाआपण ॥ वंद्यनव्हेप्रगटखूण ॥ मगहासहजेंवंदितेपण ॥ नफेडितांचफिटे ॥ ७९ ॥ आतांहेंचिअनुसंधान ॥ प्रमुखअसेंनिरूपण ॥ निर्वातकरूनियांमन ॥ परिसावेंतें ॥ ३८० ॥

**नानाबिंबपणासरिसें ॥ घेऊनिप्रतिबिंबनासे ॥**
**नेलेंवंद्यत्वयेणेंतैसें ॥ वंदितेनसी ॥ ४९ ॥**

बिंबचिअसतांनिवांत ॥ तेथेंप्रतिबिंबकैसेंनउमटत ॥ तेवींआत्माआत्मत्वेंशांत ॥ तेथेंवंद्यवं दितेंकैंचें ॥ ८१ ॥ नातरीउपाधीचेनिअभावें ॥ प्रतिबिंबहीसामावें ॥ परीबिंबत्वासीहीसवें ॥ घेऊनियां ॥ ८२ ॥ ह्मणिजेप्रतिबिंबजरीनाहीं ॥ तरीबिंबनांवतेंकायी ॥ तेवींवंद्यवंदत्वपाहीं ॥ आत्मत्वींनसें ॥ ८३ ॥ भेदत्रयेविहीन ॥ वस्तुमात्रएकिसंपूर्ण ॥ तेथेंवंद्यआतांकोण ॥ आणिवं दिताकवणु ॥ ८४ ॥ अथवाप्रतिबिंबाचेनिमिशें ॥ बिंबहीसाभासभासे ॥ जैंप्रतिबिंबचिनासे ॥ तैंबिंबासीनसेंबिंबत्वजैसें ॥ ८५ ॥ तैसेंवंद्यचिजैंनाहीं ॥ तैंवंदितेपणतेंकायी ॥ एवंदोहींवीण कांहीं ॥ प्रत्ययोमात्र ॥ ८६ ॥ वंदितेंणेसिवंद्यनव्हें ॥ येथेंसाक्षत्वहीबुडोनठाये ॥ ऐसीकांहीं खूणलाहे ॥ त्याचीचिकळे ॥ ८७ ॥ ॥ आशंका ॥ ॥ नाहींवंद्यआणिवंदितें ॥ तरीगुरुकृपातें काययेथें ॥ उपायेंवीणरितें ॥ उपायहीहोती ॥ ८८ ॥ येअशंकेउत्तर ॥ बोलिलासेअनुकार ॥ तेंहीसंक्षेपाकार ॥ वर्णिजेल ॥ ८९ ॥

**नाहींरूपाचीजेथेंसोये ॥ तेथेंदृष्टीचेंकांहींचिनव्हे ॥**
**आह्मांफळलेहेपाये ॥ ऐसियादशा ॥ ५० ॥**

जंववरीबोध्यबोधु ॥ नांदेगुरुशिष्यभेदु ॥ तंववरीगुरुप्रसादु ॥ लाधलानाहीं ॥ ३९० ॥ ह्म णोनिरूपाचीसोयनाहीं ॥ मगदृष्टिदेखेलकायी ॥ ऐसीयेदशेच्याठायीं ॥ गुरुपदफळती ॥ ९१ ॥ किंबहुनाऐसें ॥ जेथेंगुरुशिष्यभेदनसे ॥ अह्मांऐसियेदशे ॥ गुरुपादफळलें ॥ ९२ ॥ देखतादेख

णेंगेलें ॥ देखणेंपणहीहारपलें ॥ वंदितांचिनाहींजालें ॥ वंद्यवंदकत्व ॥ ९३ ॥ वेद्यवेदकत्वहीन ॥ आत्माकेवळवेदनघन ॥ ऐसीचिकांहींखूण ॥ अनुभवाआली ॥ ९४ ॥ तोचिवंदनाप्रसंगु ॥ उरे चिवंद्यवंदनभागु ॥ पूर्वापरतेवीणअभंगु ॥ प्रत्ययोमात्र ॥ ९५ ॥ येविषयींदृष्टांत ॥ पुरस्करवच नउदित ॥ थोडेनकोडपुरत ॥ बहुतांचेंपैं ॥ ९६ ॥

**गुणातेलाचीयासोयरीका ॥ निर्वाहिलीदीपकळिका ॥**
**तेकांहोईलपुळिका ॥ कापुराचीया ॥ ५१ ॥**

वातितेलाचियासंबंधें ॥ दीपींदीपत्वनांदे ॥ योगेंसीचभेदें ॥ वसिजेजेथें ॥ ९७ ॥ कर्पूरदीप तैसानव्हे ॥ तोअग्नियोगातेंजैंपावे ॥ कर्पूरींअग्निसमावे ॥ कींअग्नींकर्पूर ॥ ९८ ॥

**तयादोहोंपरस्परें ॥ होयनाजंवमेल्हेरे ॥ तंवदोहींचेहीसरे ॥ सरिसेंचि ॥ ५२ ॥ तेवींदेखेनामीययातें ॥ तंवगेलेंवंद्यवंदिते ॥ चेइलीयाकांते ॥ स्वप्नींचेजेवीं ॥ ५३ ॥**

गुरुकृपानसतांपूर्ण ॥ बुद्धिवैभवेंसीब्रह्मज्ञान ॥ तेथेंअभेदवाचारंभण ॥ परीभेदुचिनांदे॥९९॥ गुरुकृपातैसीनव्हे ॥ येथेंवंदितांचिवंदनमालवे ॥ बोलिलायेणेंभावें ॥ दीपदृष्टांतें ॥ ४०० ॥ ते वींहासद्गुरुरावो ॥ केउताहेंजैंपाहो ॥ तैंसमूळउभयभावो ॥ बुडोनिगेला ॥ १ ॥ वंद्यनव्हेनावं दिते ॥ जेवींउद्बोधींस्वप्नस्थकांते ॥ नव्हतीचहेंनिरुतें ॥ ठाउवेजालें ॥ २ ॥ नातेउभयकांते ॥ नाहीं पणदेखततयातें ॥ हेंअवधेंरितें ॥ पडोनिठेलें ॥ ३ ॥ स्वप्नींचीकांतकामिणी ॥ आपणचिजाला दोन्ही ॥ प्रबोधींदोन्हीनहोनी ॥ आपणमात्र ॥ ४ ॥ नातेकामिणीनातोआपणकांत ॥ एकलाचि राहेटळटळीत ॥ तेवींवंद्यवंदित्वेंरहित ॥ प्रत्ययोमात्र ॥ ५ ॥

**किंबहुनाइयाभाखा ॥ द्वैताचाजेथेंउपखा ॥**
**फेडूनियांस्वसखा ॥ श्रीगुरुवंदिला ॥ ५४ ॥**

असोबहुहेंबोलणेंजाण ॥ फिटलेंद्वैताचेंनिरसन ॥ नाशिलेंनसतेंपण ॥ नसतयाचें ॥ ६ ॥ सा रूननसतयाचाउपखा ॥ अवघाश्रीगुरुचिस्वसखा ॥ दुसरियाचीभाखा ॥ ठायींचिनसे ॥ ७ ॥ असोद्वैतहोतेंतेंनिरासिलें ॥ हेंहीजेथेंखंडिलें ॥ द्वैतउपखाफेडिलायेणेंबोलें ॥ बोलिलेंअसे ॥ ८ ॥ आतांद्वैतनाअद्वैत ॥ स्वरूपमात्रचिस्वतंत्र ॥ स्वप्रत्ययेंचिहोत ॥ वंदनयेथिंचें ॥ ९ ॥ ह्मणोनिस खाआपणयाआपण ॥ ऐसेंहेंगुरुवंदन ॥ केलेंकेलेनवीण ॥ आइतेंअसें ॥ ४१० ॥

**याच्यासख्याचीनवायी ॥ अंगींएकपणारूपनाहीं ॥ आणिगु रुशिष्यदुवाळीही ॥ पवाडुकेला ॥ ५५ ॥ कैसाआपणयाआ पण ॥ दोंवीणसोइरेपण ॥ हायाहोनविलक्षण ॥ नाहींनानोहे॥५६॥**

नवलयाचेंसोयरेपण ॥ थितेंजेंअसेएकपण ॥ तेंनेघेआपण ॥ मादुजेंकेंचें ॥ ११ ॥ जेंनिर्देशव र्जित ॥ नामरूपाअतीत ॥ गणणेचाजेथ ॥ हातनचले ॥ १२ ॥ पदार्थुचिजैंनव्हे ॥ प्रत्ययोमात्र चिआहे ॥ ह्मणोनिएकपणाचीनसाहे ॥ गणनायेथें ॥ १३ ॥ गणनेचेप्रकाशक ॥ तेथेंगणनाको णेकरीदेख ॥ गणनेचेंमुख ॥ मुरडलेंजेथें ॥ १४ ॥ गणनायेथेंनघडे ॥ हेंनिर्धारिलेंऐसेंआवडे ॥

परीहानिर्धारुचिपडे ॥ अनिर्धारीं ॥ १५ ॥ असोऐसियैंनिखळपणीं ॥ उमटवीगुरुशिष्यवाणी ॥ दृश्यत्वानयोनी ॥ पाहणेंहीघडलें ॥ १६ ॥ यासीपाहिलेंहेंतंवजालें ॥ परीविलक्षणत्वनाहींआलें ॥ किंवाविलक्षणत्वपाहिलें ॥ तेंगेलेंआतां ॥ १७ ॥ हेंनव्हेंचिकांहीं ॥ तऱ्हींभासलीगुरुशिष्यताहीं ॥ आपलाबोधुकाई ॥ आपणादुजा ॥ १८ ॥ एवंस्वरूपप्रत्ययेवीण ॥ स्वरूपतंवनाहींविलक्षण ॥ किंवाहोतांहीप्रत्ययोजाण ॥ नवीननव्हे ॥ १९ ॥ बोधमात्रजेंकांहीं ॥ तेथेंबोध्यबोधकतादुजी नाहीं ॥ बोध्यबोधकही ॥ आपणचितें ॥ ४२० ॥ स्वरूपींचीस्वसंवेद्यखूण ॥ तेंचिहेंगुरुशिष्य पण ॥ येथेंभेदाचीनिपटून ॥ वार्ताहीनाहीं ॥ २१ ॥ ह्मणोनगुरुशिष्यताहीभासे ॥ स्वरूपएकस रिसें ॥ अस्तिक्यतेसीअनारिसें ॥ कल्पांतींनव्हे ॥ २२ ॥ चिन्मात्रवस्तूच्याठाईं ॥ हेकांहींअपू र्वेतानाहीं ॥ आपणनहोनकांहीं ॥ अवघेंचितें ॥ २३ ॥

**जगअघवेंपोटींमाये ॥ गगनायेव्हढेंहोऊनिठाये ॥**
**कींतेचिनिशिसाहे ॥ नाहींपणाचि ॥ ५७ ॥**

सूक्ष्मह्मणोंतरीथोराहूनिथोर ॥ जेथेंसांठवेहाजगदाकार ॥ आकाशहीसविस्तर ॥ वसेंजेथें ॥ २४ ॥ एवंथोरथोराहूनि ॥ येस्थितीतेंनसंडुनि ॥ तेंचिअसेनसोनि ॥ हेंहीघडे ॥ २५ ॥ अस तेंपणेंचिनाहींहोणें ॥ नसोनिचिजयाचेंअसणें ॥ जोआपलीयेपूर्णपणें ॥ आपणआथी ॥ २६ ॥ स्वरूपावेगळेंकांहीं ॥ कदाहीदुसरेंनाहीं ॥ किंबहुनानिर्देशुचिपाहीं ॥ असेनातेथें ॥ २७ ॥ ना हींपणाचीनिसी ॥ ह्मणजेनाहींपणासहीप्रकाशी ॥ असोतेंकोण्हेसीं ॥ संबंधनपवें ॥ २८ ॥ त्या चीयेसर्वज्ञपणें ॥ अवघेंहोईजेतेणें ॥ असणेंअथवानसणें ॥ तेंचिअवघें ॥ २९ ॥ नव्हेवेद्यनावेत्ता ॥ परीनढळेजेथींचीअस्तिक्यता ॥ प्रत्ययमात्रचितत्वता ॥ अबाधितवस्तु ॥ ४३० ॥ त्याप्रत्यया चेपवाडे ॥ कहींचविरुद्धनपडे ॥ ऐसेंकांहींपुढें ॥ बोलतुअसे ॥ ३१ ॥ आसणयापालटनाहीं ॥ परीनसणयासारिखेंपाहीं ॥ पुढेंहीयेचिविषयीं ॥ दृष्टांतेंसीओवी ॥ ३२ ॥

**कांपूर्णतेतरीआधारू ॥ सिंधुजैसादुर्भरू ॥**
**तैसाविरुद्धापाहुणेरू ॥ जयाच्याघरीं ॥ ५८ ॥**

पूर्णाहूनिपूर्ण ॥ सिंधुअसेआपण ॥ आणिनद्यादिसांठवण ॥ तेथेंचिहोय ॥ ३३ ॥ यालागीं दुर्भरतासीजाणावें ॥ आणिपूर्णतातरीअन्यथानव्हे ॥ एवंहेविरुद्धतातरीसामावे ॥ सिंधुचि माजीं ॥ ३४ ॥ तेवींअसोनिनाहींपणें ॥ किंअनेकत्वेंअसेजाणें ॥ येविरुद्धतेंसांठवणें ॥ पूर्णोचि माजीं ॥ ३५ ॥ कांजेअनेकताविलासतांही ॥ अव्ययत्वाभंगुनाहीं ॥ अनेकतेसीपाहीं ॥ स्वरूप मात्रएक ॥ ३६ ॥ जेंजेंभासेभासमान ॥ याहीठावनाहींवस्तुवीण ॥ तरीवस्तूचेंपूर्णपण ॥ खंड लेंकैसें ॥ ३७ ॥ किंवाजोजोविलासकांहीं ॥ प्रत्ययेवीणस्वतंत्रनाहीं ॥ एकानेकपाहीं ॥ प्रत्यय मात्र ॥ ३८ ॥ त्याप्रत्ययासीजरीनाहींहानी ॥ तरीएकानेकतेंयेथेंकाई ॥ आतांवाचारंभणचि जरीपाही ॥ तरीविरुद्धकायिसें ॥ ३९ ॥ ह्मणोनएकपणनमोडे ॥ आणिअनेकताहीघडे ॥ हेवि रुद्धपरीविरुद्धतानघडे ॥ चिन्मात्रत्वें ॥ ४४० ॥ एवंनावेकआकारभासे ॥ तोआतमत्वेंचिसमरसे ॥ पणेंअपूर्णदशे ॥ आत्मानये ॥ ४१ ॥ किंवाशिष्यआणिगुरुत्व ॥ एकेरूपींहेशोभत ॥ हेंविरुद्ध परीनमोडत ॥ एकपणज्याचें ॥ ४२ ॥ हेंचिआतांविशेषण ॥ रवीदृष्टांतेंकरून ॥ उपपादिलें जाण ॥ तेंहीऐक ॥ ४३ ॥

**तेजातमातेंकांहीं ॥ परस्परेंनिकेंनाहीं ॥**
**परीसूर्याच्याठाईं ॥ सूर्यचिअसे ॥ ५९ ॥**

तमतेजविरुद्धता ॥ सूर्यतंवनेणेंसर्वथा ॥ तोआपुलीयेप्रकाशता ॥ आपणचिअसे ॥ ४४ ॥ तेवींएकआणिअनेकता ॥ हेशब्दाचीविरोधता ॥ तरीशब्दासीनिर्धारिता ॥ शब्दचिनाहीं ॥४५॥ एकअनेकत्वासीआलें ॥ हेंतंवनघडेयेणेंचिबोलें ॥ आतांबोलतचिनिमालें ॥ बोलणेंयेथें ॥ ४६ ॥ नातरीअर्थेंशब्दप्रकाशिला ॥ मगअर्थअर्थत्वेंव्यक्तजाला ॥ एवंअर्थचिविलासला ॥ शब्दरूपें ॥४७॥ तोजोअर्थकांहीं ॥ प्रत्ययाचेप्रवाहीं ॥ आपणचिआपल्याठायीं ॥ विलासलाअसे ॥ ४८ ॥ शब्देंसीशब्दार्थ ॥ प्रत्ययींचविलासत ॥ जेवींदीपाबाहेरीनढळत ॥ दीपप्रभा ॥ ४९ ॥ अवकाशेंसी गगन ॥ वायूसीस्पंदन ॥ तेवींविश्वाभासजाण ॥ वस्तुचीप्रभा ॥ ४५० ॥ तोजोविश्वाभासु ॥ केवळनामरूपाचाआभासु ॥ त्यारूपाचाविलासु ॥ नाममात्रीं ॥ ५१ ॥ एवंहीविश्वभान ॥ केवळ वाचेचेंविडंबन ॥ वाचेचाअर्थजाण ॥ स्फुरणमात्र ॥ ५२ ॥ तेंजेंस्फुरणकांहीं ॥ केवळप्रत्ययमात्रचिपाहीं ॥ त्याप्रत्ययाच्याठाईं ॥ अवघेंचिमिथ्या ॥ ५३ ॥ ऐसीयेप्रत्ययसागरीं ॥ सागरत्वेंचि उठेलहरी ॥ हाबोलविरुद्धतेचीयेपरी ॥ परीप्रत्ययमात्र ॥ ५४ ॥ आतांएकपणजरीसंचलें ॥ तरीअनेकत्वकासयाह्मणितलें ॥ एकपणंनाहींभंगलें ॥ तरीकैंचेंआलेंअनेकत्व ॥ ५५ ॥ हेनिरुत्तराउत्तरी ॥ बोलिजेलतेंअवधारी ॥ गहनसोहपेपरी ॥ सांगितलेंजें ॥ ५६ ॥

**एकह्मणतांभेदे ॥ तेकींनानात्वेंनांदे ॥**
**विरुद्धेंआपणयाविरुद्धें ॥ होतीलकाई ॥ ६० ॥**

एकासीएकत्वजाणावें ॥ तेंजरीद्वैतत्वेंगणावें ॥ भेदबुद्धीचेनिभावें ॥ भेदतोइतुला ॥ ५७ ॥ येथेंजाणतेंदुजेंह्मणावें ॥ तरीज्ञप्तिमात्रचिअघवें ॥ वांचूनिअडळेरेअसेनव्हे ॥ अडळलेंकांहीं ॥ ५८ ॥ सत्यंज्ञानमनंतंब्रह्म ॥ पुरुषान्नपरंकिंचित्साकाष्ठासापरागतिः ॥ एकमेवाद्वितीयंब्रह्म ॥ नेहनानास्तिकिंचन ॥ इत्यादयःश्रुतयः ॥ एवंकालत्रयाच्याठायीं ॥ वस्तूसीविलक्षणतानाहीं ॥ एकाकीचपाहीं ॥ स्वसंवेद्यत्वेंअसे ॥ ५९ ॥ तेंएकएकत्वेंगणिजे ॥ अनेकतातेथेंचिनिपजे ॥ वांचूनियेथेंकैंचेंदुजें ॥ विरोधिआणावें ॥ ४६० ॥ विरुद्धासविरुद्धविरोधी ॥ हेतंवनघडेकधीं ॥ आणि अविरुद्धतेंविरोधभेदीं ॥ येवोंचनसके ॥ ६१ ॥ एवंस्वरूपींकांहीं ॥ विरुद्धार्थचिनाहीं ॥ आतां भेदपक्षपाहीं ॥ विरोधभासे ॥ ६२ ॥ तरीभेददृष्टीच्याठायीं ॥ भेदुचिसत्यपाहीं ॥ तेथेंविरोधतोकायी ॥ ऐक्यत्वेंवीण ॥ ६३ ॥ भेदातेंजाणें ॥ तोऐक्याचीवार्तानेणें ॥ आणिऐक्यातेंजाणे तेणें ॥ नेणिजेभेदु ॥ ६४ ॥ एवंविरोधजोकांहीं ॥ तोकोठेंचिकधींनाहीं ॥ भेदबुद्धिसहितपाहीं ॥ स्वरूपपूर्ण ॥ ६५ ॥ आतांमिथ्यारोपाच्याठायीं ॥ विरुद्धअविरुद्धतेंकायी ॥ यथार्थतंवपाहीं ॥ असेचिना ॥ ६६ ॥ एवंअनुभवेंवीण ॥ विरुद्धअविरुद्धवाचारंभण ॥ स्वरूपसर्वकाळपूर्ण ॥ तें अन्यथानव्हें ॥ ६७ ॥ तेंकाळत्रयींसमान ॥ ह्मणोनविरुद्धनस्पर्शेंजाण ॥ आपणयाआपण ॥ विरोधीनव्हे ॥ ६८ ॥

**ह्मणोनिशिष्यआणिगुरुनाथु ॥ यादोहींशब्दांचाअर्थु ॥ श्रीगुरुचिपरीहोतु ॥ दोहींठायीं ॥ ६१ ॥ कांसुवर्णआणिलेणें ॥ वसतेंएकेसुवर्णें ॥ वसतेंचंद्रचांदिणें ॥ चंद्रेंचिजेवीं ॥ ६२ ॥**

**नानाकापूरआणिपरिमळु ॥ कापूरचिकेवळु ॥ गोडीआणि गुळु ॥ गुळुचिजेवीं ॥ ६३ ॥**

जेणेंप्रत्ययेंगुरुत्व ॥ तेणेंचिप्रत्ययेंजरीशिष्यत्व ॥ तरीयेथेंउभयत्व ॥ कैंचेंआलें ॥ ६९ ॥ आतां प्रत्ययासीपूर्वापरता ॥ हेंतंवनसेविचारिता ॥ जेंदिसेगुरुशिष्यता ॥ तोप्रत्ययेचिअसे ॥ ४७० ॥ जयागुरुशिष्यत्वाअर्धीं ॥ जेणेंगुरुशिष्यत्वाचीसिद्धी ॥ तेंमुख्यगुरुत्वकधीं ॥ लोपलेंनाहीं ॥ ७१॥ तेंजेंप्रत्ययरूपसंचलें ॥ तेंचिगुरुशिष्यत्वचिविलासलें ॥ आपआपणियाजालें ॥ उभयाभासे ॥ ७२ ॥ आपआपणासीआवडे ॥ हेशोभेगुरुशिष्यपाडे ॥ परीठार्यींचेंनविघडे ॥ गुरुत्वयाचें ॥ ७३ ॥ अलंकाराचीयाकुसरी ॥ सुवर्णचिएकअवधारीं ॥ एवंसुवर्णअलंकारपरी ॥ सुवर्णचितें ॥ ७४ ॥ एकलेंनिसुवर्णें ॥ उभयत्वशोभेसीयेणें ॥ परीएकत्वचिनेणें ॥ अन्यथाहोऊं ॥ ७५ ॥ अथवाचंद्रचिचंद्रचांदिणें ॥ किंवाकर्पूरेंचिकर्पूरपरिमळेपणें ॥ किंगूळचिगूळगोडीपणें ॥ नांदतुअसे ॥ ७६ ॥ तेवींचिगुरुशिष्यपणेंगुरु ॥ नव्हेअन्यप्रकारु ॥ ऐसाहानिर्धारु ॥ केलेनवीणें ॥७७॥ पुढेंऐसाचिवचनीं ॥ भावार्थाचीखाणी ॥ उघडचिपरीउघडूनी ॥ सांगतुसे ॥ ७८ ॥

**तैसागुरुशिष्यमिसें ॥ हाचिएकुउल्हासे ॥ जऱ्हींकांहींदिसे ॥ दोनींपणे ॥ ६४ ॥ आरिसाआणीमुखीं ॥ मीदिसेहेउखी ॥ हेआपलीयेवोळखी ॥ जाणेंमुख ॥ ६५ ॥**

मुखप्रत्ययजोआपुला ॥ आपणेसीअसेसंचला ॥ आणितोचिजरीजाला ॥ आरिसावेद्य ॥७९॥ तरीआरिसामुखआहे ॥ ऐसातंवप्रत्ययोनोहे ॥ मुखेंआपलाठाये ॥ सोडिलानाहीं ॥ ४८० ॥ ह्मणोनमुखस्वठाईंचअसें ॥ आणिसुखप्रत्ययोमुखींचअसे ॥ हेंजैसेंद्वंद्वदशे ॥ आलेंचिनये ॥ ८१ ॥ कींमुखींमुखाचाप्रत्यय ॥ हेंद्वंद्वमिसेंद्वंद्वनव्हे ॥ तेवींगुरुशिष्यप्रत्यये ॥ प्रत्ययएकु ॥ ८२ ॥ मुखासीआपुलीवोळखी ॥ तेअभिन्नत्वेंचिअसेमुखीं ॥ ह्मणोनिद्वंद्वमिशेंहीनखी ॥ नलगेचिभेदाची ॥ ८३ ॥ तेवींगुरुत्वाचाप्रत्ययें ॥ जोगुरुत्वींचनांदतुआहे ॥ तेणेंआपुलाठाये ॥ सांडिलानाहीं ॥ ८४ ॥ असोगुरुशिष्यदिसेउभयें ॥ तरीप्रत्ययेउभयत्वानये ॥ किंवाआपलाआपणहोये ॥ स्वताबोधु ॥ ८५ ॥ हेदोन्हीऐसीजाणवती ॥ परीनमोडेएकात्मस्थिति ॥ येविषयींमागुती ॥ ऐसेंचिबोलें ॥ ८६ ॥

**पाहापांनिरंजनींनिदेला ॥ तोनिर्विवादुएकला ॥ परीचेताचेववितांजाला ॥ दोन्हींतोचि ॥ ६६ ॥ जेतोचिचेतातोचिचेववी ॥ तेवींहाचिबुझेहाचिबुझावी ॥ गुरुशिष्यत्वनांदवी ॥ ऐसेनहा ॥ ६७ ॥**

जनसंपर्कोह्ननिवाईला ॥ जोएकांतींएकुनिजेला ॥ त्यासीउठतांउठऊंआला ॥ आणीककोण ॥ ८७ ॥ आपुलेचिसुखपणें ॥ निद्राकेलीआपणें ॥ मगउठविलेंहीतेणें ॥ सुखेचित्यासीं ॥ ८८ ॥ तस्मात्जागाचिनिजेला ॥ तोचिप्रबोधकरिताझाला ॥ तेवींगुरुशिष्ययाबोला ॥ इतुकाचिसंधी ॥ ८९ ॥ आपलाआपणासीबोधु ॥ तोचिहागुरुशिष्यभेदु ॥ सुखेंचिसुखाचास्वादु ॥ घेइजेतअसे ॥ ४९० ॥ नाहींस्वरूपासीखंडण ॥ हेंअधींचअसेजाण ॥ सहजेंज्ञानाज्ञान ॥ तेथेंकैंचें ॥९१॥

ज्ञानाज्ञानविहीन ॥ निरंतरआनंदघन ॥ आपल्याठाईंआपण ॥ निवांतअसे ॥ ९२ ॥ मगइयेचि सुखनिद्रेचेनिभरें ॥ असतांस्वानंदाकारें ॥ तेणेंचिसुखेंस्फुरे ॥ चिदाकारविश्व ॥ ९३ ॥ तेंचिदृश्यद्रष्टेपण ॥ चिदाकारेंभासलेंस्वप्न ॥ परंतुसद्रूपतेकरून ॥ नतुटेचिसुख ॥ ९४ ॥ परीसुख दुःखप्रवाहीं ॥ सुखचिभासलेंदोंठाईं ॥ ह्मणोनसूखाचीचकांहीं ॥ सुखेंचिधरिजेचाड ॥ ९५ ॥ चाडनव्हेतेनिजआवडी ॥ सुखेंचघेइजेवाढी ॥ तैंविश्वरचनायेवढी ॥ बुडोनिजाय ॥ ९६ ॥ तैंतेणेंचिसुखेंसुखासी ॥ चेवविलेंयथार्थेंसी ॥ तोचियेगुरुशिष्यपणासी ॥ संधीजाला ॥ ९७ ॥ ह्मणोनिहाचिबुझेहाचिबुझावी ॥ ऐसीसूचिलीमूळओवी ॥ सुखेंचिसुखाचीचवी ॥ घेइजेजेव्हां ॥ ९८ ॥ हाजोसंधीकांहीं ॥ सुखाचाहेलावापाहीं ॥ मागुताठायींच्याठायीं ॥ निमोनिगेला॥९९॥ मगतोनिद्रेचाभोगजोकांहीं ॥ जागरींचसांपडलापाहीं ॥ निद्राजागरादोंहीं ॥ सरिसापाडु ॥ ५०० ॥ किंवानिद्रास्वप्नासहीत ॥ जागरूचिहाअसत ॥ पूर्वापरतायेथ ॥ देखिलीनाहीं ॥ १ ॥ परंतुसुखरूपतानतुटे ॥ ह्मणोनसुखचिसुखासीभेटे ॥ गुरुशिष्यपणेंनटे ॥ सुखचिसुखीं ॥ २ ॥ सुखरूपतानतुटोन ॥ सुखोपलब्धीचेनगुणेंजाण ॥ सामान्यैंविशेषण ॥ नहोनिहोये ॥ ३ ॥ एवं आपलेनसुखमिशें ॥ गुरुशिष्यताविलासे ॥ परीप्रत्ययएकचिअसे ॥ संचलेपणें ॥ ४ ॥ हेबोलेंचिकरीबोलतां ॥ बोलहीहारपेथिता ॥ यालागींसांगतां ॥ कुवाडेंदिसे ॥ ५ ॥ सांगतांसांगणें नोहे ॥ ऐसेंआपणापेंलाहे ॥ तरीकांहींहीनहोये ॥ सांगिजेऐसें ॥ ६ ॥

**दर्पणेंवीणडोळा ॥ आपलेभेटीचासोहळा ॥**
**भोगितांतरीलीळा ॥ सांगतोंहें ॥ ६८ ॥**

दर्पणींदेखिलाडोळा ॥ परीदर्पणेंनाहींदाविला ॥ दर्पणेंनवीणभोगिला ॥ आपलाभोगु ॥ ७ ॥ ह्मणिजेसंचलेपणअसोनी ॥ नयनुचिदाविलानयनीं ॥ मिशमात्रवांचूनी ॥ आरिसाकाये ॥ ८ ॥ तेणेंदर्पणेंसीनयन ॥ नयनेंचिदेखिलाजाण ॥ एवंनयनशोभेचेंकारण ॥ नयनुचिजाला ॥ ९ ॥ आरिसाजेंदेखिलें ॥ तेंअप्रयोजकवोडवलें ॥ ऐसेंजयाचोजवलें ॥ आपेंआप ॥ ५१० ॥ तेणेंदर्पणेंवीण ॥ नयनींदेखिलानयन ॥ तेंचिद्वंद्वदशेविहीन ॥ गुरुशिष्यपणहें ॥ ११ ॥ एवंगुरुशिष्याचेनिमिशें ॥ गुरुत्वचिउल्हासतसे ॥ येणेंचिविन्यासें ॥ पुढेंहीबोलें ॥ १२ ॥

**एवंद्वैतासीउमसो ॥ नेदूनिऐक्यासीविसकुसो ॥**
**सोइरीकेचाअतीसो ॥ पोखीतसे ॥ ६९ ॥**

ऐक्यताअन्यथानव्हे ॥ मगद्वैतकैंचेंसंभवे ॥ आणिगुरुशिष्यहाअन्वयें ॥ दाविलाऐसा ॥१३॥ पूर्वोक्तनिरूपणमिशें ॥ जेंकांहींअर्थिलेंअसे ॥ गुरुशिष्यऐसें ॥ जाणावेंपैं ॥ १४ ॥ परंतुपूर्वेआणिअपरता ॥ किंवात्याज्यआणिग्रहणता ॥ हेतंवविचारितां ॥ अघटमान ॥ १५ ॥

**निवृत्तिजयाचेंनांव ॥ निवृत्तिजयाचीबरव ॥ जयानिवृत्ति**
**चीराणीव ॥ निवृत्तिचि ॥ ७० ॥ वाचोनिप्रवृत्तिविरोधें ॥**
**कानिवृत्तीचेनिबोधें ॥ आणिजेतैसावादे ॥ निवृत्तिनोव्हे ॥ ७१ ॥**

वास्तव्यजेंनिवृत्तिपण ॥ तेणेंनिवृत्तिहेंअभिधान ॥ अनामींनामकारण ॥ जालेंनाहीं ॥ १६ ॥ येथेंनिवृत्तिहेंनामदिसे ॥ याचीहीनिवृत्तिअसे ॥ कांनिवृत्तिचिमाप्रवृत्तिदशे ॥ येयीलकैसें १७

तैसेंचिरूपाचेनिअभावें ॥ स्वशोभाशोभेतेंपावे ॥ आतांनिवृत्तिचेराणिवे ॥ निवृत्तिऐसें ॥ १८॥ ह्मणिजेस्वरूपाचीनिवृत्तिस्थिति ॥ अन्यथाहोवयाचीनिवृत्ति ॥ परीप्रवृत्तिसीनिवारिती ॥ निवृत्तिनव्हे ॥१९॥ किंवानिवर्त्यकांहींआहे ॥ त्याचेनिबोधेंनिवृत्त्यहोय ॥ ऐसाहानिवृत्तिनोहे ॥ वाचाळपणें ॥ ५२० ॥ येथेंप्रत्ययमात्रचिअसे ॥ परीप्रवृत्तिचेनिनाशे ॥ असेनिवृत्तिऐसें ॥ बोलोंनयेपैं ॥ २१ ॥

**आपणादेऊनिराती ॥ दिवसाआणीउन्नति ॥**
**प्रवृत्तिवारीनिवृत्ति ॥ नव्हेतैसा ॥ ७२ ॥**

रात्रिजेव्हांसरली ॥ तेव्हांदिवसाथोरीवआली ॥ परीनिवृत्तिजेसंचली ॥ तेऐसीनव्हे ॥२२॥ प्रवृत्तीसीवारिलें ॥ मगनिवृत्तिपणआलें ॥ ऐसेंनव्हेसंचलें ॥ आयितेंअसें ॥ २३ ॥

**वोपसरयाचेंबळ ॥ घेऊनिमिरवेकिळ ॥**
**तैसेंरत्ननव्हेनिखळ ॥ चक्रवर्त्तीहा ॥ ७३ ॥**

उपाधिसंबंधकीजे ॥ तैंरत्नशोभेआणिजे ॥ तैसेंनव्हेहेंजें ॥ निवृत्तिपणें ॥ २४ ॥ चक्रवर्त्तिमहामणी ॥ शोभेस्वप्रकाशेंकरूनी ॥ संबंधातेंझणी ॥ उपेक्षीहा ॥ २५ ॥ हानिखळनिवृत्तिरावो ॥ नधरीप्रवृत्तीचाभावो ॥ निवृत्तिपणेंचिस्वयमेवो ॥ विराजतसे ॥ २६ ॥ अहोनवलहेंराजेपण ॥ कोण्हींकनिष्ठनाहींनिपटून ॥ निखळविराजमान ॥ आपणचक्रवर्त्तीहा ॥ २७ ॥

**गगनहीसुवोनिपोटीं ॥ जैंचंद्राचीपघळेपुष्टी ॥ तैंचांदिणेंतेणेंउठी ॥ अंगजयाचें ॥ ७४ ॥ तैसेंनिवृत्तिपणासीकारण ॥ हाचि आपणयाआपण ॥ घ्यावयाफूलचिजालेंघ्राण ॥ आपुलीहति ॥ ७५ ॥**

चांदणेंचंद्रचिउटिला ॥ तैंगगनाचाहीग्रासजाला ॥ परीचांदिणेंनसंबंधला ॥ नव्हेचांदु॥२८॥ चांदिणेंआपणचिजाला ॥ तेणेंआपलीचशोभापावला ॥ एवंदुजाहोवोनिउजळिला ॥ नाहींचंद्रु ॥ २९ ॥ अहोचांदिणेंनिचंद्रउटिला ॥ तेणेंतोउजळजाला ॥ ऐसेंनव्हेतोभला ॥ आपणचिशुद्ध ॥ ५३० ॥ ऐसाहाआपणयाआपण ॥ निवृत्तीनेचिनिवृत्तिपण ॥ जेवींघ्राणसंबधेंवीण ॥ परिमळफुलीं ॥ ३१ ॥ तेथेंआपलाचिआपण ॥ फुलचिअसेघ्राण ॥ भोगत्याचाजाण ॥ त्यासीचअसे ३२ तेवींनसतांदुजासंबंधु ॥ अंगेंअंगनांदेबोधु ॥ निवृत्तिऐसावादु ॥ वस्तुचातीये ॥ ३३ ॥ तस्मात् संबंधेंवीण ॥ अकृत्रिमनिवृत्तिपण ॥ येविषयींअन ॥ दृष्टांतअसे ॥ ३४ ॥

**दिठीमुखाचीयेबरवें ॥ पाठीकडूनिपावे ॥ तैंआरिसेधांडोळावे ॥ लागतीकाई ॥ ७६ ॥ कींरातीहनगेलीया ॥ दिवसहनपातलीया ॥ कायसूर्यपणसूर्या ॥ होआवेंलागे ॥ ७७ ॥ ह्मणोनिबोध्यबोधोनि ॥ घेपेप्रमाणेंसाधूनि ॥ तैसानव्हेभरवसेनी ॥ गोसावीहा ॥ ७८ ॥**

आपलेंमुखसुंदर ॥ आपणजाणेंनिरंतर ॥ ह्मणोनजाणिवेसमोर ॥ जालेंसेमुख ॥ ३५ ॥ जाणीवपाठिसीजाली ॥ पुढेंमुखशोभादेखिली ॥ दर्पणेंवीणफावली ॥ मुखप्रतीति ॥ ३६ ॥ तेवीं संबंधेंवीण ॥ स्वताचिनिवृत्तिपण ॥ बोधककिंवासाध्यतेंजाण ॥ देखिलेंचिनाहीं ॥ ३७ ॥ प्राति

कूळाचात्यागजाला ॥ किंवाअनुकूळस्वीकारकेला ॥ इतुकानाहींलागला ॥ संबंधतेथें ॥ ३८ ॥ जेवींरात्रिनिराकारिली ॥ आणिदिवसाप्रवृत्तिजाली ॥ मगसूर्यासीआली ॥ प्रकाशमानता ३९ ऐसेंसूर्यत्वेनव्हें ॥ तोअसंबंधचिआहे ॥ तेवींनिवृत्तिपणेंजेंहें ॥ संबंधातीत ॥ ५४० ॥ बोधासी बोध्यजालें ॥ किंवाप्रमाणींसाधिले ॥ ऐसेंनव्हेसंचले ॥ अर्थीचअसे ॥ ४१ ॥ कांजेंबोधमात्रचि वस्तु ॥ दुसराकासयाहेतु ॥ कायदीपदर्शनींअपेक्षितु ॥ दुसरादीपु ॥ ४२ ॥ तोहास्वामीनिवृत्तिराज ॥ नाहींसंबंधाचेंव्याज ॥ सहजिचजोसहज ॥ विलासतसे ॥ ४३ ॥

**ऐसेंकरणीयावीण ॥ स्वयंभचिजेनिवृत्तिपण ॥**
**तयाचेश्रीचरण ॥ वंदिलेऐसे ॥ ७९ ॥**

एतावत्काळविवरिलें ॥ परीबोधमात्रचिसंचलें ॥ आह्मीचरणवंदिले ॥ ऐसेचियाचे ॥ ४४ ॥ नाहींरूपाचीसोय ॥ जाणीवजाणोंचिराहे ॥ ह्मणिजेवंदिलेपाय ॥ वंदितेनवीण ॥ ४५ ॥ आत्मा जोस्वतःसिद्ध ॥ निरंतरजोशुद्धबुद्ध ॥ नसुधाचिनित्यानंद ॥ परिपूर्णजो ॥ ४६ ॥ ज्याबोधरूपाच्याठाईं ॥ करणीउपजलीनाहीं ॥ जोअन्यथाकाळत्रयीं ॥ जालानाहीं ॥ ४७ ॥ त्याचाचविलासजाण ॥ अवघेंत्रिपुटीभान ॥ चिद्रूपत्वेंचिआपण ॥ विलासतसे ॥ ४८ ॥ येणेंचिविलासें पहातां ॥ जेयोगाचीतुरेचिवार्त्ता ॥ हेंहीजाणावयापुरता ॥ दुसराकैंचा ॥ ४९ ॥ ऐसीजेकांहीं खूण ॥ उमटलीअपणेचिकरून ॥ एवंआत्मत्वेंचरण ॥ वंदिलेऐसे ॥ ५५० ॥ इत्यादिहेंजाणितलें॥ परीबोधमात्रएकलें ॥ करणीभागासींनाहींआलें ॥ केवळत्वें ॥ ५१ ॥ ह्मणोनकेलीयावीण ॥ अकृत्रिमहेंवंदन ॥ दुजासंबंधजाण ॥ लागलानाहीं ॥ ५२ ॥

**आतांज्ञानदेवोह्मणे ॥ श्रीगुरुप्रणामेयेणें ॥**
**फेडिलीवाचाऋणें ॥ चौंहीवाचांची ॥ ८० ॥**

जेंहेंसद्गुरुवंदन ॥ जेंवंदनाचेंअवसान ॥ प्रत्ययमात्रजाण ॥ पूर्वापरतेवीण ॥ ५३ ॥ जोपूर्वभागदेखिला ॥ तोचिअपरत्वेंमांडला ॥ साध्यसाधनाजाला ॥ एकुचिरसु ॥ ५४ ॥ एवंप्रत्ययमात्रवस्तु ॥ तेंस्वप्रत्ययेंचिचढेहातु ॥ वंदनाचासंकेतु ॥ येथेंचिकेला ॥ ५५ ॥ हाहीकांहींजो दंशु ॥ होतागुरुचरणस्पर्शु ॥ त्यास्पर्शेंचिसावकाशु ॥ लाधतअसे ॥ ५६ ॥ आतांहेंजेंगुरुवंदन ॥ येणेंफेडिलीवाचाऋण ॥ त्याऋणाचेंलक्षण ॥ ऐसेंअसें ॥ ५७ ॥ स्वरूपप्राप्तीकारणें ॥ केलींश्रवणादिसाधनें ॥ परीराहिलींकुंठितपणें ॥ नपवोनिचियेथें ॥ ५८ ॥ त्यासाधनाच्या मार्गीं ॥ परादिकाजाल्याउपेगी ॥ परीआत्मप्राप्तीलागीं ॥ नव्हेचिउपयोगु ॥ ५९ ॥ जोपरादिकांचाप्रकाशक ॥ त्यासीपरादिकाहोतीभासक ॥ हेंतंवअसंभाविक ॥ सहजेंचिजालें ॥ ५६० ॥ तस्मात्प्रमाणिकरीसाधावें ॥ तेंतंवअसाध्यतरीअघवें ॥ सावलीवरीमवावें ॥ आपणाकेंवीं ॥ ६१ ॥ येथेंजोभ्रमजाला ॥ तोभ्रमरूपेंचिराहिला ॥ आपलानिश्चयोगेला ॥ दुऱ्हावोनी ॥ ६२ ॥ तेवींपरादिकांचीप्रवृत्ति ॥ नव्हेचियेथेंसरती ॥ आणिऋणीतंवहोती ॥ आराधकांच्या ॥ ६३ ॥ संमतिः ॥ श्रुतिविप्रतिपन्नातेयदास्थास्यतिनिश्चला ॥ समाधावचलाबुद्धिस्तदायोगमवाप्स्यसि ॥ १ ॥ यदातेमोहकलिलंबुद्धिर्व्यतितरिष्यति ॥ तदागंतासिनिर्वेदंश्रोतव्यस्यश्रुतस्यच ॥ २ ॥ सर्वंकर्माखिलंपार्थज्ञानेपरिसमाप्यते ॥ ३ ॥ ॥ इत्यादिभगवद्वचनानि ॥ आपणाकडेनपाहोन॥ नानासाधनेंकेलींजाण ॥ हेंतंवरीकडेंऋण ॥ वाचांचेंयया ॥ ६४ ॥ आपणाआपणचोजवावें ॥

मगवाचांसीउत्तीर्णव्हावें ॥ ह्मणोनसद्गुरूसीभावें ॥ आलोंजोंशरण ॥ ६५ ॥ तंवमजचिनाहीं ठावो ॥ निखळआत्माचिश्रीगुरुरावो ॥ गेलापूर्वापरभावो ॥ एकीचिहेळा ॥ ६६ ॥ प्रमाणची प्रमेयजालें ॥ साधनसाध्यमांडलें ॥ नेदूनिचिफेडिलें ॥ वाचांचेंऋण ॥ ६७ ॥ ह्मणोनिसद्गुरुप्र णामेंयेणें ॥ फेडिलींवाचाऋणें ॥ ज्ञानदेवोऐसेंह्मणे ॥ तेंहेंऐसें ॥ ६८ ॥ हेंज्ञानेश्वरेंचिपूर्ण ॥ कीजेलयथार्थावलोकन ॥ तरीकांहींएकविवरण ॥ कीजेलययाचें ॥ ६९ ॥ ज्ञानज्ञानींचकोंदा टलें ॥ ह्मणोनिज्ञानेश्वरऐसेंघडलें ॥ अनित्यातेंस्पर्शलें ॥ नाहींजेंकीं ॥ ५७० ॥ एवंचिन्मात्रशु द्धबुद्ध ॥ निखळजेंनित्यानंद ॥ तेंआत्मानिर्द्वंद्व ॥ लाधलेंजरी ॥ ७१ ॥ तरीहेंअमृतआरोगण ॥ कीजेलकरणीवीण ॥ वाक्याचेंविवरण ॥ अवाचकपणें ॥ ७२ ॥ केलेंसद्गुरुस्तवन ॥ दाविली अवसानखूण ॥ परीनव्हेंचिअवसान ॥ अनादिह्मणोनि ॥ ७३ ॥ पूर्वोक्तिवाचाऋण ॥ तेंवाचा संबंधेंकरून ॥ नफिटेहेंविशेषण ॥ पुढेंहीअसे ॥ ७४ ॥ तेंचिसविवरण ॥ अविद्येचेंविदारण ॥ एकचिमिशेंजाण ॥ बोलिलाअसे ॥ ७५ ॥ तेंनित्यानंदकृपाजीवन ॥ कीजेलआतांविवरण ॥ निखळअनुभवाचीखूण ॥ कीजेलप्रकट ॥ ७६ ॥ येथेंमाझेंमीपण ॥ नित्यानंदुचिहोऊन ॥ शिव कल्याण ॥ सर्वदांजालें ॥ ७७ ॥ हीअनुभवाचीगोठी ॥ नाहींयेथेंपोटपाठी ॥ आनंदाचीमिठी ॥ नसुटोनिचिवचनें ॥ ५७८ ॥ ॥ इतिश्रीअनुभवामृतविवरणेसद्गुरुस्तवनंनामद्वितीयप्रकरणं समाप्त ॥

---

## प्रकरण तृतीय.

ॐपरमात्मनेनमः ॥ आतांवाचाऋणाचीस्पष्टता ॥ अविद्येचीअयथार्थता ॥ ऐसेंजालानिरू पिता ॥ प्रकरणींयियें ॥ १ ॥ तेंअनुभवामृतींचीखूण ॥ श्रीनित्यानंदआपण ॥ करिताजालावि वरण ॥ माझेनिमिसें ॥ २ ॥

**ययाचेनिबोभाटें ॥ आत्मयाचीझोंपलोटे ॥**
**पूर्णतर्हींरूणनफिटे ॥ जेचेणेंचिनिदर्की ॥ १ ॥**

वाचासमंधींसाधनीं ॥ केलीनित्यानित्यकडसणी ॥ देहात्मबुद्धिखंडूनी ॥ निवडिलाआत्मा ॥ ३ ॥ ह्मणिजेआत्मयाचीझोंपलोटली ॥ परीनलोटेचियेहीबोली ॥ कोळशाचीनिवडिली ॥ काळिमाजैसी ॥ ४ ॥ देहोहंसांडिलें ॥ सर्वेचिआत्माहंहेंजडलें ॥ एवंदेहेंचीपदरींबांधलें ॥ अहंकारेंयेणें ॥ ५ ॥ ह्मणोनिवाचांचियाऋणा ॥ नव्हिजेपैंउत्तीर्णा ॥ अहंकारेंवाचाळपणा ॥ न संडीतीवाचा ॥ ६ ॥ स्वाभाविकजागृतता ॥ जंवनाहींआलीहाता ॥ घडीघडीजागतां ॥ जागृ तकायह्मणोंये ॥ ७ ॥ निद्राबांधोनिपदरीं ॥ जागाहीजालाजरी ॥ तेंजागृतीनिदसुरी ॥ निद्रा रूपें ॥ ८ ॥ निद्राचिजरीनाहीं ॥ तरीजागृतीतेंकायी ॥ आत्माकाळत्रयीं ॥ अबाधितअसे ॥ ९ ॥ त्यासीजागृतीजरीकल्पिली ॥ तरीनिद्राहीतेथेंजडली ॥ एवंअविद्यासाचमानिली ॥ तरीनिरा करणकैंचें ॥ १० ॥ अविद्याअविच्छिन्न ॥ मानिलेंजैंचैतन्य ॥ मगअविद्येचेंनिराकरण ॥ केलेंचि नव्हे ॥ ११ ॥ हाचिभावधरून ॥ पुढेंचालिलेंनिरूपण ॥ अविद्येसवेंनिराकरण ॥ वाचांचेंकेलें ॥ १२ ॥

**येह्वींपरादिकांचौघीं ॥ जीवमोक्षाचाउपेगीं ॥**
**अविद्येसवेंअंगीं ॥ वेंचतीकिर ॥ २ ॥**

यावाचापरादिकां ॥ असतीएकीअविद्यात्मका ॥ ह्मणोनिअविद्येचीगतीआइका ॥ यासीही होय ॥१३॥ जीवासीमोक्षकल्पिला ॥ ह्मणोनअविद्येचानाशदेखिला ॥ आणिवाचांचाहीजाला ॥ ऐसाचिवेचु ॥ १४ ॥ ह्मणोनअविद्येच्यामरणेंजाण ॥ राहोंनशकतीइयाआपण ॥ ऐसेंपुढेंनिरूपण ॥ दृष्टांतेंसी ॥ १५ ॥

**देहासवेंहातपाये ॥ जातीमनासवेंइंद्रियें ॥ कांसूर्यासवेंजाये ॥ किरणजाळ ॥ ३ ॥ नातरीनिद्रेचियेअवधी ॥ स्वप्नेंमरतीअर्धी ॥ तेवींअविद्येचियेसंबंधीं ॥ आटतीइया ॥ ४ ॥**

नातरीदेहाच्याप्रान्तीं ॥ आवेवजेवींनराहती ॥ होतांमनाचीनिवृत्ती ॥ इंद्रियस्तब्ध ॥ १६ ॥ नातरीजडाचेप्रांतीं ॥ आवेवजडासवेंआटतीं ॥ आणिमनाचियेसांगातीं ॥ इंद्रियेंहोतीं ॥ १७ ॥ कींरवीच्याअस्तीं ॥ किरणजाळजेवींआटती ॥ अथवानिद्रेचियानिवृत्ती ॥ स्वप्ननाशु ॥ १८ ॥ तेवींअविद्येचियासवें ॥ वाचाहीनराहतीजीवें ॥ वाचासहितपावे ॥ अविद्यानाशु ॥ १९ ॥ एवं अविद्येचेंअस्तिक्यपण ॥ तेंचिपरादिकांसीजीवन ॥ आणिअविद्येचेनिमरणेंजाण ॥ इयांमरती ॥ २० ॥ परीअविद्यामेलीचनमरे ॥ वाचाहीजितीतदाकारें ॥ पुढेंइयेचिमोहरें ॥ बोलतुअसे २१

**मृतेंलोहेंहोतीं ॥ तेंरसरूपेंजितीं ॥ जळोनिइंधनेंयेतीं ॥ वन्हिदशे ॥ ५ ॥**

लोहमारूनलोहभस्मकेलें ॥ परीरसरूपेंलोहचिजालें ॥ तेवींजेंनाशिलें ॥ तेंअविद्यात्मक॥२२॥ किंवाइंधनोपाधिजाळितां ॥ नपडेचिकींठावरिता ॥ अंगारदशेसीमागुता ॥ उपाधिचउरे॥२३॥ जाळितांइंधनसमृद्धि ॥ ननिवडेवन्हिनिरोपाधि ॥ तेवींनिरसितांअविद्याअधीं ॥ उपाधिच जडे ॥ २४ ॥ तेवींनिरशनाचेनिमिसें ॥ आपणचिअविद्याउल्हासे ॥ येणेंचिअन्वयेंऐसें ॥ पुढें हीबोले ॥ २५ ॥

**लवणअंगेंविरे ॥ परीस्वादेंजळींउरे ॥ निद्मरोनिजागरें ॥ जियिजेनिदे ॥ ६ ॥ तेवींअविद्येसवें ॥ चौघीवेंचतीजिवें ॥ तत्त्वज्ञानाचेनिनांवें ॥ उठतीचिया ॥ ७ ॥ हातत्त्वज्ञानदिवा ॥ मरोनिइहींलावावा ॥ तरीहाहीसिणलेवा ॥ बोधरूपेंचि ॥ ८ ॥**

चिन्मात्रैकचिद्घन ॥ दृश्यात्रदशाहीन ॥ नित्यानंदकल्याण ॥ निरंतरजें ॥ २६ ॥ तेंअन्यथा कैसेंजालें ॥ माअविद्याअविच्छिन्नराहिलें ॥ आणिजीवत्वपावलें ॥ कैसेंतेंपां ॥ २७ ॥ मगअ विद्येसीखंडून ॥ जाहलेंपातत्त्वज्ञान ॥ वाचांसहीअवसान ॥ अविद्येसवें ॥ २८ ॥ येरीतीवाचा निवर्तऊन ॥ जाहलेंतत्त्वज्ञान ॥ परीबोध्यबोधकतेकरून ॥ वाचांचीचप्रवृत्ति ॥ २९ ॥ जेवींलव णअंगेंविरालें ॥ परिस्वादरूपेंजळींराहिलें ॥ किंवानिद्राजाऊनआतलें ॥ स्वप्नचिनिद्रा ॥ ३० ॥ जागृताच्यापरी ॥ कीजेस्वप्नीचीभरोवरी ॥ परीनिद्राअसोअंतरीं ॥ तेणेंस्वप्नदेखे ॥ ३१ ॥ तेवींस्वरूपींइयेकांहीं ॥ पूर्वापरभागनाहीं ॥ आणिबोध्यबोधकताप्रवाहीं ॥ बोधजैनांदे ॥ ३२ ॥ बोध्यबोधकत्वेंबोधु ॥ याचेंचिनांवभेदु ॥ येथेंवाचांचासंबंधु ॥ तुटलाचिनाहीं ॥ ३३ ॥ ह्मणो नपरादिकांसीमारून ॥ जाहलेंजैंतत्त्वज्ञान ॥ तोंसिणलेवाह्मणिजेपुष्टिजाण ॥ परादिकांसीचि

॥ ३४ ॥ ॥ संमतिः ॥ ॥ नकर्मणामनारंभान्नैष्कर्म्यंपुरुषोश्नुते ॥ नचसन्यसनादेवसिद्धिंसमधिगच्छति ॥ ॥ १ ॥ इति भगवद्वचनम् ॥ ॥ पुढेंऐसाचिवचनीं ॥ हाचिभावधरूनी ॥ बोलिलासेशब्दश्रेणी ॥ ओवीमिसें ॥ ३५ ॥

**येऊनिस्वप्नमेळवी ॥ गेलियाआपणपांदावी ॥ दोन्हीदिठीनांदवी ॥ निदजैसी ॥ ९ ॥ जितीअविद्याऐसी ॥ अन्यथाबोधातेंगिवसी ॥ तेंचियथाबोधेंसी ॥ निमालीउठी ॥ १० ॥**

निद्रायोगेंस्वप्न ॥ तेंचिगेलियाजागेपण ॥ तरीजागृतीमुळेंमागुतीस्वप्न ॥ ठेविलेंचआहे ॥३६॥ किंवास्वप्नआणिजागेपण ॥ यासीएकनिद्राचिकारण ॥ निद्राचिनाहींतरीजाण ॥ दोन्हीमृषा ॥ ३७ ॥ नातरीनिदजागृतीसव्याली ॥ तऱ्हींआपणचिपुष्टजाली ॥ आणिस्वप्नदावितेकाळीं ॥ निद्रेचाचलेशु ॥ ३८ ॥ ह्मणोनअसतांस्वप्नाचीजोडी ॥ गेलियाआपणचिहोयउघडी ॥ एवंउभयतांपरवडी ॥ निद्रेचीचिकीं ॥ ३९ ॥ तेवींजोअन्यथाबोधु ॥ तोअविद्येचाचिसंबंधु ॥ आणिअविद्यानासींयथाबोधु ॥ तोअविद्यात्मकचि ॥ ४० ॥ बोधेंअन्यथाव्हावें ॥ मगयथार्थत्वासीयावें ॥ मोतींफोडूनसांदावें ॥ कींतैसेंचभलें ॥ ४१ ॥

**परीजितीनामेली ॥ अविद्याहेजाकली ॥**
**बंधमोक्षींघाली ॥ बांधोनियां ॥ ११ ॥**

आत्माजोशुद्धबुद्ध ॥ तेथेंअविद्याहेचिविरुद्ध ॥ जितीमेलीअबद्ध ॥ शुद्धातेंकरी ॥ ४२ ॥ ह्मणोनिबंधआणिमोक्ष ॥ तेथेंचिहेदक्ष ॥ आत्माजोअपरोक्ष ॥ तेथेंहेकैंची ॥ ४३ ॥ जिताबंधातेंदावी ॥ मेलियामोक्षेंसीनांदवी ॥ तरीआत्मत्वींहेपदवी ॥ नाथिलीनये ॥ ४४ ॥ बंधमोक्षहेंशब्दद्वंद्व ॥ परीबंधचिएकविध ॥ आत्मयासीसंबंध ॥ नाहींयांचा ॥ ४५ ॥

**मोक्षुचिबंधुहोये ॥ तरीमोक्षशब्दकांसाहे ॥**
**अज्ञानाघरींत्राये ॥ वाउगीयांची ॥ १२ ॥**

आशंका ॥ ॥ मोक्षचबंधहोता ॥ तरीमोक्षशब्दकांघडता ॥ बंधचिकांनह्मणिजेता ॥ बंधासीपैं ॥ ४६ ॥ ह्मणोनयाचेंउत्तर ॥ येथेंचिअसेपरिकर ॥ जेंअज्ञानाघरींविढार ॥ दोन्हींचेंअसे ॥ ४७ ॥ अज्ञानाच्याघरीं ॥ मोक्षाचीवार्ताजरी ॥ तोमोक्षकोणेपरी ॥ होईलसाच ॥ ४८ ॥ मुळींजेंअज्ञान ॥ तेंमोक्षासीकेवींकारण ॥ आणिबंधयाचेंनिर्गुणेंजाण ॥ तेंहीअनुमानचि ॥ ४९ ॥ ह्मणोनबंधचिनाहीं ॥ तेथेंमोक्षतोकायी ॥ आतांयियेच्याविषयीं ॥ दृष्टांतबोले ॥ ५० ॥

**वागुलाचेनिमरणें ॥ तोषावेंकींबाळपणें ॥ येरातोनाहींमाकोणें ॥ मृत्युमानावा ॥ १३ ॥ घटाचेंनाहींपण ॥ फुटलियाचीनागवण ॥ मानितअसेतेंजाण ॥ ह्मणोंयेकीं ॥ १४ ॥ ह्मणोनबंधचितंववावो ॥ मामोक्षाकेप्रसवो ॥ परीमरोनिकेलाठावो ॥ अविद्यातया ॥ १५ ॥**

नसतांचबागुलबाळाप्रती ॥ दाऊनिनिमालाबाळाह्मणती ॥ येथेंहर्षआणिक्षती ॥ बाळासी

चसाजे ॥ ५१ ॥ येरांबागुलचिनाहीं ॥ माहर्षविषादतोकायी ॥ तेवींबंधचिनदिसेकांहीं ॥ मामोक्षहीकैंचा ॥ ५२ ॥ किंवाघटाचाअसंभव ॥ तेथेंफुटणेंपणाचाधरिजेभाव ॥ तेशाहणे किंवावाव ॥ संभावितपणें ॥ ५३ ॥ किंवाघटाचाअभावजाला ॥ तोअभावपदार्थत्वेंकल्पिला ॥ कल्पूनमगभंगला ॥ ऐसेंचमानी ॥ ५४ ॥ तयाचीहानीमानिली ॥ तैंसंभावितताचिगेली ॥ तेवींबंधमानूनिकेली ॥ मोक्षसंस्था ॥ ५५ ॥ तंवबंधुचिनाहीं ॥ तेथेंमोक्षतोकवणकायी ॥ परी नवलहेंनवाई ॥ अविद्येची ॥ ५६ ॥ अविद्येचाभावधरून ॥ मगकीजेनिराकरण ॥ आणिनिरा करणींमोक्षपण ॥ मोक्षासीयेपैं ॥ ५७ ॥ तरीस्वरूपींअविद्याभाऊन ॥ करूंजाइजेनिराकरण ॥ तंवनिराकरणींअवसान ॥ अविद्येसीनव्हे ॥ ५८ ॥ अविद्येचेंजेंमरण ॥ तेंअविद्यकचिजाण ॥ ह्मणोनिमोक्षपण ॥ सत्यत्वेंनसे ॥ ५९ ॥ अविद्यानिमालीननिमे ॥ ह्मणोनमोक्षहीबंधउपमें ॥ तरीमरणेंवांचूनिशमे ॥ तरीबंधचिवाव ॥ ६० ॥ जरीबंधचिअसेवाव ॥ तरींमोक्षासीकैंचाठाव॥ ऐसाअभिप्राव ॥ ग्रंथींचायिये ॥ ६१ ॥ आतांअविद्याह्मणिजेअज्ञान ॥ तोनाशकीजेज्ञानेंकरून ॥ तरीज्ञानचिअज्ञान ॥ होऊनिठाके ॥ ६२ ॥ अज्ञानासीनाशितां ॥ ननाशेतेंसर्वथा ॥ येऊनिबैसे माथां ॥ ज्ञानाचिये ॥ ६३ ॥ मगज्ञानचिअज्ञान ॥ ह्मणोनमोक्षचिबंधजाण ॥ कींज्ञानाचिस्वतां बंधन ॥ रूपहोये ॥ ६४ ॥

**आणिज्ञानबंधुऐसें ॥ शिवसूत्राचेनिमिशें ॥ ह्मणितलेंअसें ॥ सदाशिवें ॥ १६ ॥ आणिवैकुंठींचेनिहीसुजाणें ॥ ज्ञानपा सींसत्वगुणें ॥ बांधिजेहेंबोलणें ॥ बहुकेलें ॥ १७ ॥**

ज्ञानचिबंधऐसें ॥ शिवसूत्रींमहेशें ॥ येणेंचिभावेंऐसें ॥ बोलियेलें ॥ ६५ ॥ आणिवैकुंठरम णरमापती ॥ गीताशास्त्रींबोलिलेअसती ॥ तेंहीआतांयथोक्ती ॥ सांगेनऐका ॥ ६६ ॥ ॥ संमतिः ॥ सर्वभूतेषुयेनैकंभावमव्ययमीक्ष्यते ॥ अविभक्तंविभक्तेषुतज्ज्ञानंविद्धिसात्त्विकम् ॥ १ ॥ सत्वा त्संजायतेज्ञानं ॥ इत्यादिभगवद्वचनं ॥ तरीगुणैकज्ञान ॥ तेंबंधरूपचिजाण ॥ येविषयींवचन ॥ आणीकऐका ॥ ६७ ॥ ॥ संमतिः ॥ ॥ सत्त्वंसुखेसंजयतिरजःकर्मणिभारत ॥ अथवा ॥ गुणे भ्यश्चपरंवेत्ति मद्भावंसोधिगच्छति ॥ ॥ एवंसंबंधिकजेंज्ञान ॥ तेंतंवगुणात्मकजाण ॥ चिन्मा त्रएकलेंपूर्ण ॥ तेथेंसंबंधकैंचा ॥ ६८ ॥ जाणणेंहोऊनजाणिजे ॥ किंवानेणयासीनिराकरिजे ॥ हेठेवाठेवीसहजें ॥ नाहींतेथें ॥ ६९ ॥ नसतयाचासंबंधु ॥ तोचिज्ञानासीज्ञानबंधु ॥ पुढेंहीप्र बंधु ॥ येणेंचिभावें ॥ ७० ॥

**परीशिवेकाश्रीवल्लभे ॥ बोलिलेंयेणेंचिलोभें ॥ मानुतेंहेलाभें ॥ नोबोलतांही ॥ १८ ॥**

संबंधोपार्जितज्ञान ॥ तेंज्ञानचिहोयअज्ञान ॥ सदाशिवआणिनारायण ॥ बोलिलेऐसें ॥ ७१ ॥ परीयेहींहेंबोलिलें ॥ ह्मणोनआह्मींमानिलें ॥ ऐसेंनव्हेहेंभलें ॥ नबोलतांचिअसे ॥ ७२ ॥ याचें हीवचनप्रमाण ॥ आणिअनुभवहीऐसाचिजाण ॥ जेंसंबंधिकज्ञान ॥ अज्ञानतेंचि ॥ ७३ ॥ वास्त वार्थअनुभव ॥ तोनव्हेवचनोद्भव ॥ अनुभवेंचिराणीव ॥ अनुभवाये ॥ ७४ ॥ अहोहाअनुभवा मृताख्यग्रंथ ॥ नव्हेप्रमाणांतराचीमात ॥ प्रमेयप्रमाणातीत ॥ अनुभवमात्र ॥ ७५ ॥ ह्मणोन निखळज्ञानचिअसतां ॥ कासयाज्ञानींज्ञानता ॥ पुढेंहीबोलता ॥ ऐसेंचिजाला ॥ ७६ ॥

**जेंआत्मज्ञाननिखळ ॥ तेंहीघेज्ञानाचेंबळ ॥**
**तैंसूर्यचितीसबळ ॥ तैसेंनोहे ॥ १९ ॥**

आत्मज्ञानह्मणिजेआइतेंज्ञान ॥ निखळतेंचिअसेपरिपूर्ण ॥ तेंघेऊनिज्ञानपण ॥ ज्ञानत्वाकांये ॥ ७७ ॥ तेंअन्यथाकहींचिनाहीं ॥ मातेंपावणेंआतांकायी ॥ किंवाप्रतिबद्धककहीं ॥ असेल त्यासी ॥ ७८ ॥ तेथेंस्वज्ञानेंबळेंघेयिंजे ॥ मगरोधकअसेलतेंवारिजे ॥ तरीप्रातःकाळचितिजे ॥ सूर्येजेवीं ॥ ७९ ॥ सूर्याचियासंबंधीं ॥ रात्रिचीअसावीअधीं ॥ मगतियेचीनिरुद्धि ॥ मानावी तेणें ॥ ८० ॥ मगरात्रीचेंनिराकारण ॥ करूनसूर्यीसूर्यपण ॥ मिरवेतेवींज्ञानपण ॥ ज्ञानासीन सावें ॥ ८१ ॥

**ज्ञानेंश्लाघ्यतुआहे ॥ तेंज्ञानपणधाडिलेंवायें ॥**
**दीपावांचूनिदिवालाहे ॥ तैंअंगभुललाचिकीं ॥ २० ॥**

निरंतरजेंचिद्रूप ॥ तेंचिआपलेंस्वरूप ॥ कालत्रयींविक्षेप ॥ नव्हेत्यासी ॥ ८२ ॥ जेंनिरंतरज्ञा नघन ॥ ज्ञानाज्ञानभावविहीन ॥ तेंज्ञानत्वघेऊन ॥ श्लाघेलकांहीं ॥ ८३ ॥ आपणासीमानूनखं डण ॥ साचमानावेंअज्ञान ॥ मगअज्ञानमिसेंजाण ॥ श्लाघ्यतुज्ञानीं ॥ ८४ ॥ एवंज्ञानेंश्लाघावें ॥ तरीजाणतचिनेणहोये ॥ येविषयींबरवें ॥ निदर्शनदेतों ॥ ८५ ॥ जेवींदीपलाविलाजेणें ॥ त्यासी प्रकाशिलेंदीपेंतेणें ॥ हेंवचनेंप्रमाणें ॥ नव्हेतीजैसीं ॥ ८६ ॥ दीपअसतांनसतां ॥ आपणचिदी पाचानियंता ॥ ऐसीसिद्धप्रकाशता ॥ भुललाकीं ॥ ८७ ॥ आपणचिआपणापें ॥ केवींअंधारीं हारपे ॥ मगदीपाचेनिपडपें ॥ श्लाघावेंतेणें ॥ ८८ ॥ आपलेनिसिद्धज्ञानें ॥ मानिलींज्ञानाज्ञानें ॥ मगनिषेधआणिपावणें ॥ ऐसेंहोये ॥ ८९ ॥ तेंजेवींपावणेंनव्हे ॥ पुढेंहीयाअभिप्रायें ॥ संकेतबो लिलाआहे ॥ ओवियेसी ॥ ९० ॥

**आपणचिआपणापासीं ॥ नेणतांदेशोदेशीं ॥ आपणापेंगि वसी ॥ हेंकीरुहोय ॥ २१ ॥ परीबहुताकांदिया ॥ आप णापेंआठवलिया ॥ ह्मणेमीयया ॥ कैसारिझों ॥ २२ ॥**

आपणआपणापासीं ॥ असोनियांउमगीदेशोदेशीं ॥ हिंडणेंहेकायसी ॥ प्रमाणबुद्धी ॥ ९१ ॥ मगहिंडतांतयासी ॥ स्मरेआपणासी ॥ लाजिलात्यासुखासी ॥ सुखहेंह्मणतां ॥ ९२ ॥ तेणेंसुखें सुखावे ॥ तरीहिंडणियासारिखेंचिहोये ॥ तेवींअज्ञानाचेनिअभिप्रायें ॥ ज्ञानासगरिमा ॥ ९३ ॥ येऱ्हवींज्ञानमात्रजेंकांहीं ॥ तेथेंज्ञानाज्ञानदोन्हींनाहीं ॥ जेंकाळत्रयाच्याठायीं ॥ अन्यथानोहे ॥ ९४ ॥ आपुलेज्ञातृत्वेंकरून ॥ साधेअज्ञानींअज्ञानपण ॥ तेथेंकार्यकारणतानसोन ॥ निखळज्ञा नचि ॥ ९५ ॥ तेथेंअज्ञानासीनिषेधून ॥ पाविजेतेंज्ञातेपण ॥ बद्धताज्ञानींजाण ॥ ज्ञानाचेनिहें ९६

**तैसाज्ञानरूपआत्मा ॥ ज्ञानेंचिआपलीप्रमा ॥**
**करितुसेंसोहंमा ॥ ऐसाबंधु ॥ २३ ॥**

आत्माकेवळज्ञानरूप ॥ यासीकहींचिनसेविक्षेप ॥ तेणेंचिज्ञानेंसंकल्प ॥ आपलाकरी ॥ ९७ ॥ ह्मणेतोचिमीआत्माराम ॥ हेंज्ञानचिपरीदिसेभ्रम ॥ बद्धऐसेंनाम ॥ यासीचहोय ॥ ९८ ॥ तोआ त्मत्वानाहींमुकला ॥ परीनावेकविसरोनतोखला ॥ तोखोनश्लाघोंलागला ॥ आत्मत्वेंतेणें ९९

तेणेंतोषेंकरीजाण ॥ मानिजेजरीमुक्तपण ॥ तरीपहिलेंयासीबंधन ॥ कैंचेंहोतें ॥ १००॥ आदिअ वसानेंवीण ॥ काळत्रयींअनवच्छिन्न ॥ तेथेंनाथिलेंमुक्तत्वमानून ॥ रिझणेंनघडे ॥ १ ॥ पाहतां आत्मभावो ॥ बद्धासीचनाहींठावो ॥ आतांमोक्षचिवावो ॥ सहजचिजाला ॥ २ ॥ मोक्षमोक्ष त्वामुकला ॥ ह्मणोनमोक्षचिबंधघडला ॥ परीनव्हेचिसांचुला ॥ बंधआणिमोक्ष ॥ ३ ॥ एवंसा चनव्हेमोक्षबंधन ॥ तरीएतत्संबंधीज्ञानअज्ञान ॥ हेंकायप्रमाण ॥ होईलतेथें ॥ ४ ॥ संमतिः ॥ बद्धोमुक्तइतिव्याख्यागुणतोमेनवस्तुतः ॥ गुणस्यमायामूलत्वान्नमेमोक्षोनबंधनं ॥ १ ॥ ॥ इति भागवते ॥ ॥

**जेंज्ञानचिस्वयेंबुडे ॥ ह्मणोनिभारीनावडे ॥**
**ज्ञानेंमोक्षुघडे ॥ तेंनिमालेनि ॥ २४ ॥**

अज्ञानेंमोक्षभाविला ॥ तोमोक्षचिजेथेंनाथिला ॥ तेथेंज्ञानभावबुडाला ॥ मोक्षस्थजोकीं ॥५॥ ह्मणोनज्ञानचिस्वयेंबुडें ॥ तेथेंभारीकैसेनआवडे ॥ ह्मणिजेअहंभावेंपडे ॥ भावातीतपैं ॥ ६ ॥ ह्म णोनिज्ञानींज्ञानता ॥ हाभारज्ञानींनिमविता ॥ आतांनिमालेनिज्ञानेंमोक्षता ॥ तोमोक्षहीनघडे ॥ ७ ॥ संबंधेंज्ञानींज्ञानपण ॥ तेंज्ञानचिपरीअज्ञान ॥ आणिनिमालेंजेंज्ञान ॥ तेंहीहेंचह्मणोनि॥८॥ आतांतरीज्ञानींज्ञानतानघडे ॥ तरींचमोक्षमोक्षत्वआवडे ॥ नातरीपहातांआपणाकडे ॥ मोक्षतो कायी ॥९॥ एवंमोक्षआणिबंधु ॥ तोएकचिसंबंधु ॥ येथेंअविद्येचाबाधु॥ केलाचिनव्हे॥ ११०॥

**ह्मणोनिपरादिकावाचा ॥ तोशृंगारुचौअंगांचा ॥**
**एवंअविद्याजीवाचा ॥ जीवत्वत्यागी ॥ २५ ॥**

एवंअविद्येच्याप्रसंगीं ॥ परादिवाचाचौघी ॥ शृंगारलियाअंगीं ॥ अविद्येचिया ॥ ११ ॥ जी वाचेंदेहचतुष्टय ॥ तेंअविद्येच्याअंगींहोय ॥ परादिकांचेठाय ॥ राहतेंतेंचि ॥ १२ ॥ नाथिलेंजी वत्वघेऊन ॥ अविद्यामिरवेआपण ॥ आणिजीवत्वाचात्यागहीजाण ॥ अविद्याहोये ॥ १३ ॥ त्या अविद्येचेंनिरसन ॥ हेंचिमुख्यअविद्यैकपण ॥ आतांपरादिकांकैसेन ॥ येथूनसुटती ॥ १४ ॥ त स्मात्अन्यथाबोधासनिराकरून ॥ बोधींमिरवेबोधकपण ॥ आतांअन्यथाबोधनसतांजाण ॥ बो धचिबंधु ॥ १५ ॥ मुळींबोध्यबोधकविहीन ॥ बोधरूपआत्माचपूर्ण ॥ ह्मणोनअन्यथाजाण ॥ क धींचनघडे ॥ १६ ॥ आतांबोध्याचेंबोधकपण ॥ आणिअन्यथाभावाचेंनिराकरण ॥ बोधजंवबो धकत्वजाण ॥ तंववरीचहेंपैं ॥ ॥ १७ ॥ एवंअजडींजडपण ॥ नाथिलेंचिउपपादून ॥ केलेंजेंखं डण ॥ तेंबोधरूपेंचिजड ॥ १८ ॥

**अंगाचेनिइंधनेंउदासु ॥ उठोनिज्ञानाग्निप्रवेशु ॥**
**करीतेथेंभस्मलेशु ॥ बोधाचाउरे ॥ २६ ॥**

देहींइयासदेहत्वजडपण ॥ तेंचिअंगाचेंइंधन ॥ तेथेंज्ञानाग्निलाऊन॥ देहबुद्धिजाळिजे॥१९॥ अंगींचेंअंगींचजाण ॥ अजडींचभासलेंजडपण ॥ तेंचिअंगाचेंइंधन ॥ जाळिजेबोधें ॥ १२० ॥ तेथें जळालेंआणिजाळितेपण ॥ उरेजंववरीजाण ॥ तेंचिबोधींबोधकपण ॥ भस्मत्वेंउरें ॥ २१ ॥ एवं खंडलेपणआवडे ॥ तंववरीखंडलेंचिनखंडे ॥ येविषयींपुढें ॥ बोलतअसे ॥ २२ ॥

**जळींजळावेगळू ॥ कापूरनदिसेअवडळू ॥**
**परीहोऊनिपरिमळू ॥ उरेजेवीं ॥ २७ ॥**

कापुरजळींमिळाला ॥ तोवेगळेपणामुकला ॥ परीजळाचेअंगींराहिला ॥ परिमळहोऊनि ॥ २३ ॥ तेवींपृथक्भावासीनिरसूनि ॥ पृथकतेसीकेलीहानी ॥ परीबोधींबोधरूपहोऊनि ॥ पृथकताचिअसे ॥ २४ ॥

**अंगींलाविलियाविभूती ॥ तेंपरमाणुहीझडती ॥ परीपांडुरत्वें कांति ॥ राहेजैसी ॥ २८ ॥ नावोहळलाअंगींजैसें ॥ पाणी पाणिपणेंनसे ॥ तऱ्हींवोल्हासाचेनिमिसें ॥ आथीचतें ॥ २९ ॥ नातरी माध्यान्हकाळीं ॥ छायानदिसेवेगळी ॥ असेपायां तळीं ॥ रिगोनियां ॥ ३० ॥ तैसेंग्रासूनिदुसरें ॥ स्वस्वरूपीं स्वरूपाकारें ॥ आपुलेपणेउरे ॥ बोधुजोका ॥ ३१ ॥**

इत्यादिदृष्टांतेंऐसें ॥ निरसलेंचिननिरसे ॥ ऐक्यभावेंतसें ॥ ऐक्यचिनव्हे ॥ २५ ॥ दुसरया चेनिअभिभवें ॥ जैंबोधकत्वपावें ॥ तैंबोधयेणेंनांवें ॥ वायांचिशब्दु ॥ २६ ॥ निखळचिआत्मा राम ॥ तेथेंकैंचाअन्यआगम ॥ मगआपापदेखिजेहाश्रम ॥ वायांचिवाढे ॥ २७ ॥ अविद्याकोठू नकलपावी ॥ मगतेजीवभावासउठवी ॥ आतांनसतीनांदवी ॥ तरीनिरसेकेवीं ॥ २८ ॥ नाहींतें चिनाशितां ॥ नाशनघडेसर्वथा ॥ जाणतचिनेणता ॥ होऊनठाके ॥ २९ ॥ जोजाणतुनेणुजाण ॥ तोजाणनव्हेनाअज्ञान ॥ हेअनुभवाचीखूण ॥ अनारिसीअसे ॥ १३० ॥ असोअविद्यानिरशना माजीं ॥ अविद्याहोतसेसाजी ॥ परादिकासहजी ॥ तेथेंचअसती ॥ ३१ ॥ ह्मणोनयेहीलक्षणेंक रून ॥ नव्हेचिपरादिकांचीसोडवण ॥ बोधरूपेंशेषऋण ॥ उरेचिल्यांचें ॥ ३२ ॥

**तेंरुणशेषवाचाईया ॥ नफेडवेचिमरोनियां ॥ तेंपायांपडोनिमियां ॥ सोडविलें ॥ ३२ ॥**

वाचांचेनिमरणेंजाण ॥ नफिटेवाचाऋण ॥ जेंजालेंआत्मसाधन ॥ वाचासंबंधें ॥ ३३ ॥ तेंच वाचांचेंऋण ॥ मेलियाहीनफिटेजाण ॥ मगसद्गुरूसीशरण ॥ गेलोंजेव्हां ॥ ३४ ॥ तैंवाचांचाउ गवनदिसे ॥ तेथेंसहजेंमरणहीनाशे ॥ जन्ममृत्यूचेंपिसें ॥ फिटलेंतेव्हां ॥ ३५ ॥ जाऊनसद्गुरु शींशरण ॥ जाहलोंवाचाऋणउत्तीर्ण ॥ हाहीभावजेथेंजाण ॥ नुरेचिकांहीं ॥ ३६ ॥ येऱ्हवींहें जैंवाचाऋण ॥ तेंनफिटेवाचाअसोन ॥ मगजाणीवेचेंअंगरिघोन ॥ मारिल्यावाचा ॥ ३७ ॥ तंवमेलियाचिनमरती ॥ मगउत्तीर्णेतेचीकैंचीगती ॥ यालागींश्रीगुरूप्रती ॥ शरणगेलों ॥ ३८ ॥ तंवश्रीगुरुप्रणामेंवीण ॥ अन्यश्रमतोशाब्दिकजाण ॥ वाचायेणेंगुणेंकरून ॥ नपवतीतेथें ॥ ३९ ॥ आत्मानुसंधानेंवीण ॥ श्रमतोवाचांचेंऋण ॥ मगशब्दब्रह्मज्ञान ॥ निष्णातजालें ॥ १४० ॥ तेणेंवा चासंबंधातीत ॥ जाहलेंऐसेंजाणवत ॥ अतद्व्यावृत्तियुक्त ॥ स्थळभागखंडे ॥ ४१ ॥ तऱ्हींअनु भवाचीखूण ॥ नलाधेगुरुदयेवीण ॥ तेंचिउरलेंशेषऋण ॥ वाचांचेंइया ॥ ४२ ॥ अगाखंडलादि सेस्थूलभाग ॥ परीसंदेहाचेंसूक्ष्मलिंग ॥ आहेतोंवरीसांग ॥ प्रपंचुचिजडे ॥ ४३ ॥ जेवींवटबी जाच्याठायीं ॥ वटुचिभरलासेपाहीं ॥ तेवींहेंऋणशेषउतरलेंनाहीं ॥ तंवनपविजेसुख ॥ ४४ ॥ मगभक्तिज्ञानवैराग्ययुक्त ॥ जालोंसद्गुरूचाशरणागत ॥ मगऋणशेषआणिऋणायित ॥ खंडलें अघवें ॥ ४५ ॥ एवंसद्गुरुप्रणामेंवीण ॥ नव्हिजेगाऋणोत्तीर्ण ॥ ज्ञानाज्ञानदुथडीजाण ॥ नचु केकदा ॥ ४६ ॥

**ह्मणोनिपरापश्यंती ॥ मध्यमाहनभारती ॥**
**यानिस्तरलियालागती ॥ ज्ञानींअज्ञानींचि ॥ ३३ ॥**

जंववरीज्ञानाज्ञानभेदु ॥ तंववाचांसिसंबंधु ॥ जोजोदेखिजेबाधु ॥ तोबोधरूपेंसरिसाचउठी ॥ ४७ ॥ ह्मणोनपरादिवाचांचासंबंधु ॥ तंववरीकैंचाशुद्धबोधु ॥ याचेसंबंधींभेदु ॥ बोधींचउठे ॥ ४८ ॥ जैंवाचामनांअगोचर ॥ तेथैंनपवेवाग्व्यवहार ॥ इयावाचांचीथार ॥ ज्ञानींअज्ञानींचि ॥ ४९ ॥ नाथिलेनअज्ञानसंबंध ॥ ज्ञानचिअज्ञानत्वेंनांदे ॥ अन्यथाअज्ञानचिनुसुधें ॥ कैंचेंअसेपां ॥१५०॥ येऱ्हवींज्ञानआणिअज्ञान ॥ नसोनएकलेंनिखळचिद्घन ॥ पूर्वापरतेवीण ॥ आइतें असे ॥ ५१ ॥ तेंआइतेसद्गुरुचरण ॥ तेआइतेचिजाइजेशरण ॥ ऐसीकांहींखूण ॥ सांपडेआइती ॥ ५२ ॥ मगआइतेनप्रसादें ॥ असिजेआपणयाचेनिअविरोधें ॥ बोलिलाविनोदें ॥ हाठावऱ्हीं ॥ ५३ ॥ तात्पर्यार्थऐसा ॥ नपडावेंवचनवळसा ॥ एकसद्गुरूचिसरिसा ॥ वोळगावा ॥ ५४ ॥ सद्गुरूसीयेतांशरण ॥ हारपेशरणआलेपण ॥ सहजेंसमाधान ॥ आपेआप ॥ ५५ ॥ आतांसद्गुरुकृपानंतरे ॥ ज्ञानअभेदेंवावरे ॥ पुढेंयेचिमोहरें ॥ प्रकरणअसे ॥ ५६ ॥ तेंअनुभवाचीखूण ॥ अनुभवामृतींअसेजाण ॥ नित्यानंदींशरण ॥ गेलियालाधे ॥ ५७ ॥ आणिज्ञानाज्ञानअसंभव ॥ निखळज्ञानमात्रज्ञानदेव ॥ नित्यानंदेंहेंबरव ॥ तेथेंचिवर्ते ॥ ५८ ॥ कांजेंनसोनिविषयसंबंध ॥ अंगेंअंगचिआनंद ॥ किंबहुनाचिदानंद ॥ यासीचह्मणिजे ॥ ५९ ॥ त्याचिन्मात्राहानीनाहीं ॥ ह्मणोननित्यानंदुचिहोपाहीं ॥ कांजेंसंबंधीकधींकांहीं ॥ उपजलाचनाहीं ॥ १६० ॥ तोचसर्वकाळकल्याण ॥ सदाशिवशांतसमान ॥ श्रीनित्यानंदचरण ॥ वंदिलियाहोये ॥ ६१ ॥ एवंहेंप्रकरण ॥ वाचांचेंऋणोत्तीर्ण ॥ होईजेऐसीखूण ॥ सांगितलीयेथें ॥ ६२ ॥ पुढेंसिद्धाचेनिरायें ॥ निरूपणाचेप्रवाहें ॥ जेंमौनमुद्रेनेंआहे ॥ बोलिलेंकीं ॥ ६३ ॥ तेंअनुभवामृताचीचवी ॥ चाखावीजीवाचियेजीवीं ॥ नानाजीवांपैलीकडीलठेवी ॥ आपलीअसेजे ॥ ६४ ॥ तेंअवधानाचेनिव्याजें ॥ काहाड्डनहातींघेईजे ॥ नातरीउच्छृंखलपणमाझें ॥ क्षमाकीजोजी ॥ ६५ ॥ कांजेतुह्मीअनुभवाचीमूर्ति ॥ तेथेंबोलणेंहेगावढींमती ॥ आतांक्षमाकिजोजीसंतीं ॥ निजदासामातें ॥ १६६ ॥ ॥ इतिश्रीअनुभवामृतविवरणेनित्यानंदसूतविरचितेवाचारुणोत्तीर्णंनामतृतीयप्रकरणं समाप्तम् ॥

---

## प्रकरण चतुर्थ.

ॐपरमात्मनेनमः ॥ नित्यानंदकृपाजीवन ॥ केलेंपूर्वोक्तविवरण ॥ जेथेंवाचाऋणोत्तीर्ण ॥ समाप्तजालें ॥ १ ॥ आतांवाचासंबंधेंवीण ॥ निखळजोप्रत्ययचिपूर्ण ॥ जेथेंज्ञेयआणिज्ञातेपण ॥ निःशेषनाहीं ॥ २ ॥ हेअनुभवाचीखूण ॥ अनुभवामृतींअसेजाण ॥ तेचिपैविवरण ॥ स्वताचिविवरे ॥ ३ ॥ सद्गुरूसीगेलियाशरण ॥ अभावाआलेंअज्ञान ॥ आतांनिखळभेदेंवीण ॥ ज्ञानमात्रचिअसे ॥ ४ ॥ ऐसेंचिअसेविषद ॥ अनुभवामृतींचेंमूळपद ॥ ज्ञानाज्ञानभेद ॥ जेथेंनसे ॥५॥

**आतांअज्ञानाचेनिमारे ॥ ज्ञानअभेदेंवावरें ॥**
**निद्साधूनिजागरें ॥ नांदिजेजेवीं ॥ १ ॥**

निखळज्ञानमात्रसाचार ॥ तेथेंनघडेअनसंचार ॥ हाविचारह्मणिजेमार ॥ अज्ञानाचा ॥ ६ ॥

द्रष्टाअसेलोपेंवीण ॥ तरीकोठेंअसेंअज्ञान ॥ पूर्वापरताविहीन ॥ ज्ञानमात्रसंचलें ॥ ७ ॥ स्वरूपींअज्ञानाचासंभव ॥ समूळहेंचिजेथेंवाव ॥ ज्ञानअभेदस्वभाव ॥ सहजेंचिअसें ॥ ८ ॥ अज्ञानऐसेंजेंस्फुरण ॥ तेंनिखळस्फुरद्रूपज्ञान ॥ तरीअज्ञानसाधलेंजाण ॥ ज्ञानेंचिकरूनी ॥ ९ ॥ साधलें ज्ञानेंअज्ञान ॥ तरीअज्ञानशब्दासीआलेंव्यर्थपण ॥ ज्ञानअभेदुहाजाण ॥ आइताअसे ॥ १० ॥ जेवींजागरेंनिदसाधिली ॥ ह्मणिजेनिद्रेचीजागृतीचिजाली ॥ मगनिद्राजागृतीहेंद्वंदबोली ॥ हरपोनिजाय ॥ ११ ॥ निखळलाधेजागेपण ॥ मगजागेंहोआवेंनलगेजाण ॥ निद्रेचेंपडण ॥ सहजचिचुकलें ॥ १२ ॥ अज्ञाननकरितांअसेबाध ॥ तोचिहाज्ञानभेद ॥ पुढेंऐसेंचिविशद ॥ बोलतुअसे ॥ १३ ॥

**कांदर्पणाचानिगाला ॥ ऐक्यबोधुपहिला ॥**
**मुखभोगीआपुला ॥ आपणचि ॥ २ ॥**

कांदपर्णाचेनिसंबंधें ॥ मुखवंतामुखबोधे ॥ तैंअभेदुचिपरिभेदे ॥ गिवसिलाजाये ॥ १४ ॥ मुखऐक्यतानतुटोन ॥ उमटेदृश्यद्रष्टृत्वभान ॥ तेवींज्ञानींज्ञानत्वघेऊन ॥ ज्ञानाज्ञानभेद ॥ १५ ॥ तोदर्पणचिजैंविसर्जिला ॥ मगमुखभासमुखींचिनिमाला ॥ जेणेंदर्पणुद्योतिला ॥ दर्पणत्वें ॥१६॥ तेवींज्ञानींनसेज्ञानभावो ॥ तैंअज्ञानाचाअभावो ॥ मगसिद्धचिस्वभावो ॥ अभेदेंवर्ते ॥ १७ ॥ नसोनिज्ञानाज्ञान ॥ निखळजेंचिन्मात्रघन ॥ तेंचितेंभेदेंवीण ॥ स्वभावेंअसें ॥ १८ ॥ एवंअज्ञानासीआत्यंतिकबाध ॥ मगसहजाचिज्ञानअभेद ॥ चिन्मात्रचिनिर्द्वंद्व ॥ विलासतअसे ॥ १९ ॥ दर्पणावलोकनेंवीण ॥ मुखप्रत्ययोजोअर्धींचिजाण ॥ दर्पणत्यागेंकरून ॥ ठसावेतोचि ॥ २० ॥ तेवींमुळींचिजेंचिन्मात्रखूण ॥ तेणेंचिरूपाआलेंअज्ञान ॥ तोचिआभासउपरमताजाण ॥ स्वस्वरूपभोग ॥ २१ ॥

**ज्ञानजियातियापरी ॥ जगींआत्मैक्यकरी ॥**
**तैंसुरियाखोचेसुरी ॥ तैसेंजालें ॥ ३ ॥**

जैसेंतैसेंज्ञातृत्वपण ॥ असोनिब्रह्मैक्यबोधुहोयजाण ॥ येथेंनिरसेजऱ्हींअज्ञान ॥ तऱ्हींज्ञेयज्ञातृत्वभेदुकें ॥२२॥ ह्मणोनिज्ञानजयातयापरी ॥ ज्ञेयभोगाह्ननिअसेदूरी ॥ आतांज्ञानज्ञेयभेदुजरी ॥ तरीअभेदुकैसा ॥ २३ ॥ जगआत्माऐक्यपण ॥ येथेंहीसाक्षित्वेंवेगळेंज्ञान ॥ एवंहरलेंजऱ्हींअज्ञान ॥ तऱ्हींज्ञानींज्ञानपणहाचिभेदु ॥ २४ ॥ ज्ञानेंअभेदेंअसिजे ॥ तरीआत्माहेंकोणेंजाणिजे ॥ असोआपणासीचिजाणतांदुजें ॥ आपणचिअसे ॥ २५ ॥ ज्ञानींनसेज्ञातेपण ॥ तरीज्ञानऐसेंह्मणे कोण ॥ एवंज्ञानज्ञेयभेदुजाण ॥ ज्ञानींअसे ॥ २६ ॥ ज्ञानअसेज्ञेयेंवीण ॥ तरीज्ञानतेंकिंलक्षण ॥ तस्मात्ज्ञेयज्ञातेपण ॥ भेदुचिअसे ॥ २७ ॥ एवंओवीचेंपूर्वार्ध ॥ पूर्वपक्षकेलासिद्ध ॥ जेजऱ्हीं अज्ञानासीजालाबाध ॥ तऱ्हींज्ञानींज्ञानत्वभेदुचिअसे ॥ २८ ॥ येआशंकेनिवारण ॥ करीउत्तराधेंकरून ॥ जेसुरीसीसुरीनेंजाण ॥ खोचिजेकेवीं ॥ २९ ॥ ह्मणिजेहेंऐसें ॥ आत्माचिन्मात्रअसे ॥ आपेआपभागकैसे ॥ पडतीतेथें ॥ ३० ॥ अर्धींविरेज्ञातेपण ॥ तरीचहोयआत्मज्ञान ॥ आतांआत्माजरीज्ञानघन ॥ तऱ्हींज्ञानशून्यपैं ॥ ३१ ॥ आत्मत्वींउरेज्ञातें ॥ हेंबोलणेंपरीरितें ॥ सुरीनेंजेवींसुरीतें ॥ खोचितांनफवे ॥ ३२ ॥ आत्मत्वींआत्मज्ञान ॥ हेंज्ञानजाल्यावीण ॥ एवंयेथेंजाणणें जाण ॥ घडलेंचिनाहीं ॥ ३३ ॥ ह्मणोनिसुरीतेंसुरीनखोची ॥ उक्तिअसेमुळींची ॥ तेवींज्ञानासीज्ञानाची ॥ जाणीवनघडे ॥ ३४ ॥ आत्माकेवळज्ञानघन ॥ येथेंजाणीवनिवडेआन ॥ हेंकेवळव

ल्गन ॥ अनुभवेंवीण ॥ ३५ ॥ अभावाआलेंअज्ञान ॥ आणिउरेंज्ञातेपण ॥ तरीअनुभवाचीखूण॥ लाधलीनाहीं ॥ ३६ ॥ तस्मात्‌अज्ञाननिपटूनवावो ॥ तेथेंज्ञातृत्वाचाहीअभावो ॥ हाधरूनिअभि प्रावो ॥ पुढेंहीबोले ॥ ३७ ॥

**लावीआंतुठाऊनिकोपट ॥ तोसाधीआपणियासकट ॥**
**कांबांधलयाचोरट ॥ मोटेमार्जी ॥ ४ ॥**

घरामाजींठाऊनि ॥ जैंघरासीलाविजेअग्नि ॥ तोघरासीजाळोनि ॥ आपणहीनुरे ॥ ३८ ॥ किंवाचोरटेंभ्याले ॥ तेमोटेमाजींलपाले ॥ तेणेंआपणियासांपडविलें ॥ मोटेसहित ॥ ३९ ॥ तेवींअज्ञानाचाभावो ॥ तोज्ञातृत्वाचाअभिप्रावो ॥ तेंचिअज्ञानजालेंवावो ॥ तरीज्ञातेपणकैंचें ॥ ४० ॥ ज्ञानेंअज्ञाननाशिलें ॥ म्हणिजेआपणचिशांतजालें ॥ येथेंसहजचिनिमाले ॥ ज्ञानभेद ॥ ४१ ॥ संबंधिकज्ञानभावो ॥ अज्ञानासीहाचिठावो ॥ आतांसंबंधुचिजरीवावो ॥ तरीज्ञान भावोतोहीनसे ॥ ४२ ॥ तस्मात्‌अभावाआलेंअज्ञान ॥ आणिज्ञानींउरलेंज्ञानपण ॥ हेंचिविरुद्ध वचन ॥ नघडेयेथें ॥ ४३ ॥

**आगिपोतासाचेनिमिशें ॥ आपणपेंजाळिजेजैसें ॥**
**ज्ञानाअज्ञाननाशें ॥ तैसेंजालें ॥ ५ ॥**

जेवींकांकापुरातेंजाळूनि ॥ अग्नित्वेंनुरेचिअग्नि ॥ तेवींअज्ञाननासूनि ॥ ज्ञानहीनुरे ॥ ४४ ॥ ज्ञानींचनाहींज्ञानपण ॥ मगकैंचेंअसावेंअज्ञान ॥ हेअनुभवाचीखूण ॥ जाणोनिघेइजे ॥ ४५ ॥

**अज्ञानाचाटेका ॥ नसतांहीज्ञानअधिका ॥**
**फांकेजंवउपखा ॥ आपुलापडे ॥ ६ ॥**

आशंका ॥ अज्ञानासीजैंखंडण ॥ तैंअधिकचिज्ञानींज्ञानपण ॥ आणिम्हणतसाअज्ञानासीनि रसुन ॥ ज्ञानहीनुरे ॥ ४६ ॥ ज्ञानासीअधिकपण ॥ तरीचहोयअज्ञाननिरशन ॥ तरीज्ञानींज्ञान पण ॥ कैसेंनुरे ॥ ४७ ॥ येआशंकेसीखंडण ॥ केलेंउत्तरार्धेंकरून ॥ जेंज्ञानआधिक्यजाण ॥ नि वांतज्ञानें ॥ ४८ ॥ ज्ञानाचेंशुद्धत्वजाणिजे ॥ जैंआपणेंचिउपरमापाविजे ॥ एवंज्ञानेंचिशम विजे ॥ ज्ञातेपणासी ॥ ४९ ॥ एवंज्ञानमात्रअसोन ॥ हरेविशेषसामान्य ॥ पुढेंयेविषयींजाण ॥ ओवीअसे ॥ ५० ॥

**दशाहीतेनिमालिया ॥ येणेंजेंउवाया ॥**
**तेंकेवळनाशावया ॥ दीपाचेपरी ॥ ७ ॥**

दीपप्रांतींचाप्रकाश ॥ तोदीपाशींचहोयनाश ॥ तेवींज्ञानाचाविशेष ॥ ज्ञानचिशमवी ॥५१॥ संबंधेंवीणज्ञान ॥ तेंचिजाणावेंदशाहीन ॥ पूर्वापरतेनवीण ॥ निश्चळजेंकीं ॥ ५२ ॥ हेंहीदशा हीनपण ॥ ज्ञानेंचिप्रकाशिलेंजाण ॥ प्रकाशूनआपण ॥ शांतजालें ॥ ५३ ॥ निखळजेंस्फुरण ॥ तेंज्ञाननव्हेनाअज्ञान ॥ म्हणोनियथार्थेंउपपन्न ॥ तोचिउपरमु ॥ ५४ ॥

**उठणेंकींपडणें ॥ कुचभराकोणजाणे ॥**
**फांकणेंकींसुकणें ॥ जाउळाचें ॥ ८ ॥**

कुचाचेंपक्कदशेयेणें ॥ तेंचितयाचेंपडणें ॥ किंफाकणेंआणिसुकणें ॥ जाउळाचेंएक ॥ ५५ ॥

आताजाउळह्मणिजेआयिका ॥ जेकींजाईचीकुसुमकळिका ॥ तेफांकलियादेखा ॥ सुकणेंचिघ डलें ॥ ५६ ॥ अथवावोसरलियाभरयौवन ॥ कुचींकेलेंस्थानचलन ॥ ह्मणोनिउठतांचिपतन ॥ पावलेंजैसें ॥५७॥ अथवाकुचभारहोतांगहन ॥ तेचिवेळेत्याचेंव्युत्थान ॥ व्युत्थानतेंचिपतन ॥ जाणिजेतयाचें ॥ ५८ ॥ एवंपतनपूर्वीलअसन्नकाळ ॥ तेंचिव्युत्थानाचीवेळ ॥ आणिव्युत्थान तेंचिप्रांजळ ॥ पतनजयाचें ॥ ५९ ॥ तेवींउमटेजेंस्फुरणखूण ॥ तेंचिस्फुरणाचेंकींअवसान ॥ त दर्थीनिदर्शन ॥ आणीकहीदेतों ॥ ६० ॥

**तरंगांचेंरूपायेणें ॥ तयाचिनावनिमणें ॥ कांविजूचेउदैजणें ॥**
**तोचिअस्तु ॥ ९ ॥ तैसेंपिऊनिअज्ञान ॥ तंववरीवाढेज्ञान ॥**
**जंवआपुलेंनिधन ॥ निःशेषसाधे ॥ १० ॥**

ज्ञानाच्यानिश्चयीं ॥ अज्ञानासीठावचिनाहीं ॥ चिन्मात्रेंवीणकांहीं ॥ असेंनादुजें ॥ ६१ ॥ अज्ञा नाचाभावो ॥ तोकेवळज्ञानप्रवाहो ॥ तोभावचिजालावावो ॥ आत्मनिर्धारें ॥ ६२ ॥ एवंज्ञाना चाउत्कर्ष ॥ करीज्ञातेपणासीहरास ॥ तेचिसंधीसनाश ॥ अज्ञानाचा ॥ ६३ ॥ ज्ञानाचाविलास ॥ नामरूपाचाआभास ॥ त्यानामरूपाचासमावेश ॥ ज्ञानमात्रींहोये ॥ ६४ ॥ जेवींमातृकांचावि काश ॥ ॐकारेंकेलाप्रकाश ॥ तेवींअज्ञानाचाग्रास ॥ ज्ञानेंजाला ॥ ६५ ॥ मगज्ञानींज्ञानपण ॥ तैसाधीआपलेंनिधन ॥ उद्भवअवसान ॥ तरंगाचेंएक ॥ ६६ ॥ किंवाएकचिस्फुरण ॥ उदयआ णिअवसान ॥ विजूच्याअंगींजाण ॥ तैसेंचिहेंपैं ॥ ६७ ॥

**जैसेंकल्पांतींभरतें ॥ स्थळाजळादोहींतें ॥**
**बुडविलियाआरौतें ॥ राहोंचिनेणें ॥ ११ ॥**

स्थळजळविशेष ॥ कल्पांतजळींनुरेभास ॥ एवंजळाचाउत्कर्ष ॥ जळचिनाशी ॥ ६८ ॥ स्थ ळजळएकजालें ॥ तेथेंस्थळनाहींउरलें ॥ आणिजळहीविसरलें ॥ जळत्वासीयेवों ॥ ६९ ॥ तेवीं ज्ञानाचेनिपूर्णपणेंजाण ॥ नुरेज्ञानआणिअज्ञान ॥ हेअनुभवाचीखूण ॥ अनुभवैकगम्य ॥ ७० ॥

**कींविश्वाहीवेगळ ॥ वाढेजैंसूर्यमंडळ ॥**
**तैंतेजतमनिखळ ॥ तेंचिहोये ॥ १२ ॥**

अत्यंतिकतेजसंपन्न ॥ जैंसूर्यहोयआपण ॥ तैंचराचराचीखूण ॥ मोडोनिगेली ॥ ७१ ॥ तैंतम तेजस्वभावें ॥ नुरेचिहेंअघवें ॥ तेजहीतेजभावें ॥ नुरेचितेथें ॥ ७२ ॥ कींविश्वोपाधिविहीन ॥ केवळतेजचिपरिपूर्ण ॥ तेवींज्ञानाज्ञानेंवीण ॥ ज्ञानमात्रजें ॥ ७३ ॥

**नानानिद्रमारूनि ॥ आपणापैंहिरोनि ॥ जागणेंठाकेहोऊनि ॥**
**जागणेंचि ॥ १३ ॥ तैसेंअज्ञानआटोनिया ॥ ज्ञानयेतेंउवाया ॥**
**ज्ञानाज्ञानगिळूनिया ॥ ज्ञानचिहोये ॥ १४ ॥**

निद्रेचीवाटमोडे ॥ तैंजागणेंहेंहीनघडे ॥ मगजागणयाचेंपाडें ॥ जागणेंचि ॥ ७४ ॥ निखळ चिजागृतीसीजाण ॥ नाहींनिद्राजागेपण ॥ तेवींनसोनिज्ञानाज्ञान ॥ ज्ञानचिजें ॥ ७५ ॥ पहातां अज्ञानाचामासला ॥ तंवज्ञानार्णवचिउचंबळला ॥ अज्ञानहागेला ॥ बोलुचिवाया ॥ ७६ ॥ अ ज्ञानअंगेंविरालें ॥ परीज्ञानेंनाहींस्पर्शिलें ॥ आइतेंचिसंचलें ॥ एकलेंज्ञान ॥ ७७ ॥ नसतांअज्ञा

नभाग ॥ ज्ञानज्ञानत्वेंनमिरवीअंग ॥ चिन्मात्रचिनिःसंग ॥ नसोनिअसे ॥ ७८ ॥ नसोनिअसे कैसें ॥ हेंनसांगोनिसांगतुसे ॥ ओवीचेनिमिसें ॥ दृष्टांतेंसी ॥ ७९ ॥

**तेंव्हेळींपुनीवाभरे ॥ नाअवंसासरे ॥**
**तेचंद्रींचिउरे ॥ सतरावीजैसी ॥ १५ ॥**

ज्ञाननव्हेनाअज्ञान ॥ दृज्ञात्रदशाहीन ॥ संबंधातेंनस्पर्शोन ॥ ठायींचिअसे ॥ ८० ॥ जेवींचं द्रींचीसतरावी ॥ पौर्णिमेनव्हेनवी ॥ नाअमावस्यामाल्हवी ॥ चंद्रींचिअसे ॥ ८१ ॥ संबंधातेंन पवे ॥ परीआपणपेंनाभिभवे ॥ हेंआणीकानेणवे ॥ वस्तुत्वेंचि ॥ ८२ ॥ ज्ञानह्मणिजेतरीजाणिजे कायी ॥ अज्ञानह्मणोंतरीनेणणेंनाहीं ॥ एवंज्ञानाज्ञानादोहीं ॥ सिवतलेंनव्हेजें ॥ ८३ ॥ ज्ञानींजे ज्ञानता ॥ अज्ञानींजेणेंअनास्तिक्यता ॥ पूर्वपक्षाआणिसिद्धांता ॥ नयेजेंवस्तु ॥ ८४ ॥ तेंकोण्हा सारिखेंनव्हें ॥ आणीकासंबंधेंनेणवें ॥ जेथेंकांहींचिनसंभवें ॥ नास्वातंत्रहीनसें ॥ ८५ ॥ ऐसें चिन्मात्रघन ॥ असेजेंसंबंधेंवीण ॥ पुढेंहीविशेषण ॥ याचेंचिबोलें ॥ ८६ ॥

**कांतेजांतरेंनाटोपे ॥ कोण्हेंतमेनसिंपे ॥ तेंउपमेचेंजाउपें ॥**
**सूर्यचिहोय ॥ १६ ॥ ह्मणोनिज्ञानेंउजळे ॥ कांअज्ञानेंरुळे ॥**
**तैसेंनव्हेनिर्वाळें ॥ ज्ञानमात्रजें ॥ १७ ॥**

अन्यतेजेंतेजसुहोये ॥ कींकोण्हेतमेंमाल्हवे ॥ उपमेतेंनपवे ॥ तोसूर्यचिएकु ॥ ८७ ॥ संबांधे कैंतेजें ॥ सूर्यजैंविराजे ॥ तैंअंधारेंझांकिजे ॥ ऐसेंहीहोय ॥ ८८ ॥ सूर्याच्याअखंडत्वास्तव ॥ नसेतमासीतमत्व ॥ तेथेंसूर्यप्रकाशाबाधत्व ॥ तमाचेंनिकें ॥ ८९ ॥ एवंदिनरातिचाअसंभव ॥ तमतेजाचाअभाव ॥ सूर्येंचिस्वयमेव ॥ संबंधेंवीण ॥ ९० ॥ तेवींस्वताजैंचिन्मात्रकांहीं ॥ तेथें ज्ञानाचीअपेक्षानाहीं ॥ किंवाअज्ञानेंनलोपेकहीं ॥ बोधमात्रजें ॥ ९१ ॥ संमतिः ॥ स्वबोधेना न्यबोधेच्छाबोधरूपतयात्मनः ॥ नदीपस्यान्यदीपेच्छायथास्वात्मप्रकाशने ॥ १ ॥ इतिब्रह्मगी तायां ॥ तेवींनिघळचिन्मात्रघन ॥ आपेआपउपमाहीन ॥ जेंज्ञानाचेंहीज्ञान ॥ अज्ञानप णअज्ञानाजेणें ॥ ९२ ॥ परीज्ञानआणिअज्ञान ॥ जेथेंनाहींनिपटून ॥ आणिउमटोंनशकेतयावीण ॥ आणीकतेथें ॥ ९३ ॥ तरीतेंलपवीनाउमटवी ॥ संकोचवीनावाढवी ॥ अंगेंअंगपदवी ॥ पदविहीन ॥ ९४ ॥ तेंअन्यथाकधींचिनव्हे ॥ तैंअज्ञानकेवींसंभवे ॥ आतांअज्ञानाचेनिअभावें ॥ ज्ञानतेंकवण ॥ ९५ ॥ परीज्ञानींज्ञानत्वनाहीं ॥ हेंज्ञानेंचिपडेठाईं ॥ एवंआगमअपायादोहीं ॥ शिवतलेंनव्हेजें ॥ ९६ ॥ यालागींनिर्वाळलेंचिन्मात्रघन ॥ एकाकीभेदहीन ॥ आहेनाहींपण ॥ जेथेंनाहीं ॥ ९७ ॥

**परीज्ञानमात्रेंनिखळे ॥ तेंचिकींतयाकळे ॥**
**कायिदेखिजेबुबुळें ॥ बुबुळाजेवीं ॥ १८ ॥**

आशंका ॥ निखळचिन्मात्राच्याठायीं ॥ ज्ञेयभागदुसरानाहीं ॥ हेंपडिलेंठायीं ॥ पूर्वोक्तेंनि रूपणें ॥ ९८ ॥ परंतुआपणचिआपणयाजाणत ॥ यासीकदानसेविपरीत ॥ ह्मणोनिएकींचिउ मटत ॥ ज्ञेयज्ञातृत्वें ॥ ९९ ॥ तरीहानव्हेकायभेदु ॥ कैसेनघडलाज्ञानअभेदु ॥ हेंआशंकास्पदु ॥ जालेंअसें ॥ १०० ॥ पूर्वपक्षाचेंतात्पर्यार्थ ॥ जेंविजातीयस्वजातीयभेद ॥ निरसोनिपरीनिरसा वाभेद ॥ स्वगतपूर्वपक्षेयेणें ॥ १ ॥ एवंभावपूर्वार्धाचा ॥ आतांपरिहारउत्तरार्धियाचा ॥ अव

धानश्रोतयांचा ॥ देखोनिबोले ॥ २ ॥ जेवींदेखणेंबुबुळनचुके ॥ परीआपणयातेंनदेखे ॥ देखणें मात्रनिकें ॥ ह्मणोनियां ॥ ३ ॥ देखणेंपदार्थनव्हे ॥ ह्मणोनिआपेआपणयानदेखवे ॥ बुबुळयेणें नांवें ॥ देखणीदृष्टी ॥ ४ ॥ तेवींचिन्मात्राच्याठायीं ॥ धर्मुधर्मित्वनाहीं ॥ आपणाआपणकहीं ॥ जाणेंनानेणें ॥ ५ ॥ गोडियेगूळनचुके ॥ तऱ्हींतोचित्यातेंनचाखे ॥ तेवींज्ञानमात्रनिकें ॥ जाणि वेवीण ॥ ६ ॥

**आकाशआपणयारिघे ॥ कायीआगिआपणयालागे ॥ आपलामाथावोळघे ॥ आपणकोण्ही ॥ १९ ॥ दिठीआपणयादेखे ॥ स्वादुआपणयाचाखे ॥ नादआपुलेंआइके ॥ नादपण ॥ २० ॥ सूर्येसूर्यासीविवळे ॥ काफळआपणयाफळे ॥ परिमळुपरिमळे ॥ घेपतुअसे ॥ २१ ॥ तैसेंआपणयाआपण ॥ जाणतेंनव्हेंजाण ॥ ह्मणौनिज्ञानपणेंवीण ॥ ज्ञानमात्रजें ॥ २२ ॥ आणिज्ञानऐसीसोये ॥ ज्ञानपणेंचिजरीसाहे ॥ तरीअज्ञानहेंनोहे ॥ ज्ञानपणेंचि ॥ २३ ॥**

आकाशाचापैसी ॥ वस्तिनघडेआकाशासी ॥ ऐसियाभेदासी ॥ आकाशनये ॥ ७ ॥ किंवा अग्निचेंनिउष्णपणें ॥ अग्निसीनघडेपाळणें ॥ उष्णतामात्रचितेणें ॥ असिजेह्मणोनियां ॥ ८ ॥ किंवास्वमाथाआरोहण ॥ नघडेआपेआपण ॥ किंवादिठिचेदिठीजाण ॥ दृश्यनव्हे ॥ ९ ॥ किंवा स्वादुस्वादाचाविषय ॥ किंवानादुनादाश्राव्यहोय ॥ किंसूर्यासीचसूर्य ॥ प्रकाश्यप्रकाशक११० किंवाआपलेंफळआपण ॥ हेंफळींनघडेजाण ॥ किंवाग्राह्यग्राह्यकतेवीण ॥ परिमळुपरिमळीं ॥ ११ ॥ तैसेंज्ञानमात्रेंआइतें ॥ तेंजाणोनिहोयजाणतें ॥ ऐसीयाभेदातें ॥ नस्वीकारिजे ॥ १२ ॥ ह्मणोनिज्ञानपणेंवीण ॥ ज्ञानमात्रचितेंजेंसंपूर्ण ॥ जरीयेथेंअसेज्ञानपण ॥ तरीभेदहीघडे ॥ १३ ॥ तस्मात्याज्ञानमात्राच्याठायीं ॥ ज्ञानाज्ञानभागनाहीं ॥ ज्ञानींज्ञानत्वअसेंपाहीं ॥ तरीतेंचिअज्ञान ॥ १४ ॥ आतांज्ञाननव्हेंनाअज्ञान ॥ ऐसेंकोण्हीएकज्ञान ॥ असणयानसणयावीण ॥ असेजेंकीं १५

**जैसेंतेजजेंआहे ॥ तेंअंधारेंकीरनोहे ॥**
**मातेजतऱ्हींहोये ॥ तेजासीकाई ॥ २४ ॥**

प्रकाशींअंधारनस्पर्शे ॥ तरीप्रकाशकपणतेंकाइसें ॥ तेवींअज्ञानजरीनसे ॥ तरीज्ञानींज्ञान त्वहीनाहीं ॥ १६ ॥ निखळचिजेंज्ञान ॥ असेज्ञानपणेंवीण ॥ आपुलेंअसतेपण ॥ ग्रासूनिअसें १७

**तैसेंअसणेंआणिनसणें ॥ हेंनाहींजयाहोणें ॥**
**आतांमिथ्याऐसेंयेणें ॥ बोलेंगमे ॥ २५ ॥**

पूर्वार्धाचाअर्थ ॥ आलापूर्वपदाआंत ॥ आतांपूर्वपक्षार्थ ॥ उत्तरार्धपद ॥ १८॥ आतांस्वतः सिद्धजेंआहे ॥ तेंअसणेंकांनसाहे ॥ तस्मात्येणेंअभिप्रायें ॥ अभावदिसे ॥ १९ ॥ ऐसापूर्वपक्ष केला ॥ येणेंशून्यवादसूचिला ॥ स्वतंत्रत्वेंदेखिला ॥ प्रपंचुचिसत्य ॥ १२० ॥ एकज्ञानएकअज्ञा न ॥ एककर्ताएककर्मजाण ॥ जेंरचलेंआहेभान ॥ समविषमत्वें ॥ २१ ॥ हेंघडींअसेंघडींनसें ॥

येथेंनित्यत्वेंकोण्हीचनसे ॥ एवंउत्तरार्धेंऐसें ॥ असेंसूचिलें ॥ २२ ॥ आतांशून्यवादखंडण ॥ होयऐसेंनिरूपण ॥ कीजैलजेणेंप्रकटेखूण ॥ अनुभवाची ॥ २३ ॥

**तरीकांहींनाहींसर्वथा ॥ ऐसीजरीवेवस्था ॥**
**तरीनाहींहेंप्रथा ॥ कवणासीपां ॥ २६ ॥**

ज्ञानाज्ञाननाहीं ॥ हेंजेणेंपडेठाईं ॥ तरीशून्यतेंपाहीं ॥ कोठेंअसेंपैं ॥ २४ ॥ नाहींपणजेणेंदेखिलें ॥ तेंतंवनाहींजालें ॥ आतांशून्ययेणेंबोलें ॥ शून्यचिनघडे ॥ २५ ॥ शून्यजरीअसतें ॥ तरी शून्यवादुचिकोणकरिते ॥ एवंयाशून्यातें ॥ वादीचिखंडी ॥ २६ ॥ प्रपंचींसत्यताअसेजे ॥ तियेसीतियेणेंचितंवनेणिजे ॥ तस्मात्प्रपंचासीद्योतिजे ॥ नित्यएकें ॥ २७ ॥ एकजेंचिन्मात्रघन ॥ स्वविलासेंविलासमान ॥ प्रपंचींप्रपंचपण ॥ असेजेथें ॥२८॥ तेंज्ञाननव्हेनाअज्ञान ॥ ऐसेंजेंस्फुरद्रूपजाण ॥ त्यास्वरूपासीशून्यपण ॥ कैसेनिआलें ॥ २९ ॥ एवंयेचिविषयींचेंनिरूपण ॥ पुढेंबहुप्रकारेंजाण ॥ असेतेंहीविवरण ॥ करूनपाहों ॥ १३० ॥

**शून्यसिद्धांतबोधु ॥ कोण्हीसत्ताहोयसिद्धु ॥**
**नसतांहाअपवादु ॥ वस्तूसीजो ॥ २७ ॥**

वस्तुसनातनसिद्धनसता ॥ तरीशून्यहेनसतीवार्ता ॥ हेकैसेनिआतां ॥ रूपायेती ॥ ३१ ॥ सत्ताजरीशून्यअसे ॥ तरीशून्यहेकोणप्रकाशे ॥ एवंआर्थेंवीणवायसें ॥ बोलणेंचिजालें ॥ ३२ ॥ वस्तुजरीस्वतासिद्ध ॥ तरीचशून्यसिद्धांतबोध ॥ एवंशून्यवाद ॥ शून्यातेंचिखंडी ॥ ३३ ॥

**माल्हवितांदिवे ॥ माल्हवितेंजरीमाल्हवें ॥**
**तरीदीपुनाहींहेंफावें ॥ कोणासीपां ॥ २८ ॥**

दीपुज्याचेनिसिद्धिगेला ॥ तेणेंचिदीपुमालविला ॥ तरीलावितांदिठाजाला ॥ कांमाल्हवितांमालवे ॥ ३४ ॥ दीपाचेनिअभावें ॥ माल्हवितेंजरीमालवें ॥ तरीमाल्हविलेंजाणावें ॥ कोणेंपहा ॥ ३५ ॥ एवंलावलियामाल्हविलियावीण ॥ निरुपाधिकजेंपुरुषपण ॥ त्यासीनाहींअवसान ॥ कोण्हियेकाळीं ॥ ३६ ॥

**कींनिदेचेनिआलेपणें ॥ निदेलेंतेंजायप्राणें ॥ तरीनिदभलीहेकोणें ॥ कोणासीपां ॥ २९ ॥ घटुघटपणेंभासे ॥ तद्भंगेंभंगुआभासे ॥ सर्वथानाहींतेंनसे ॥ कोणेंह्मणावें ॥ ३० ॥ ह्मणोनिकांहींनाहींपण ॥ देखतांनाहींनोहेआपण ॥ नोह्वनिअसणेंनयावीण ॥ असणेंजें ॥ ३१ ॥**

मागेंदीपदृष्टांतेंकरून ॥ तैसेंचिनिद्रेचेनिदर्शन ॥ निद्रिस्तहोयगतप्राण ॥ निद्रेचेनिजरी ॥ ३७ ॥ तरीनिद्रेचेंनिवांतपण ॥ कोणेंभोगिजेजाण ॥ आणिनिद्रेनेंकोण ॥ निद्रिस्तुहोये ॥३८॥ जेणेंपैंजागेपणें ॥ निजणेंआणिजागेंहोणें ॥ तेंनसेतरीनिद्राभोगणें ॥ कोणासीघडे॥ ३९ ॥ किंवा जेणेंघटासीघटपण ॥ तेणेंचिघटभंगुरूपायेजाण ॥ तेंकारणचिनसेतरीकैसेन ॥ निर्वाहयाचा ॥ १४० ॥ घटभावेंघटभासे ॥ भंगेंभंगुआभासे ॥ पृथ्वीचिनसतांहेंकैसें ॥ घडोंसकेपैं ॥ ४१ ॥ अथवाघटभावोजेणेंदेखिला ॥ तेणेंअभावहीबोळखिला ॥ तोचिनाहींतरीगमला ॥ कोणासी

अर्थु ॥ ४२ ॥ तैसेंआपुलेनिप्रकाशें ॥ प्रकाशमानताचिनआभासे ॥ ज्ञानअज्ञानहेंऐसें ॥ हरपे जेथें ॥ ४३ ॥ जेथेंहरपेज्ञानअज्ञान ॥ तेंतंवहरपोनेणेंजाण ॥ जेणेंज्ञानीज्ञानपण ॥ अज्ञानीअज्ञानत्व ॥ ४४ ॥ अज्ञानीअज्ञानत्वजेणें ॥ अतएवअज्ञानवावोअज्ञानपणें ॥ आतांज्ञानमात्रचिमा कोणे ॥ ज्ञानत्वायावें ॥ ४५ ॥ तेंविषयनव्हेकोण्हाचें ॥ अथवाविषयींनव्हेतेंसाचें ॥ ह्मणोनि असेनाहींपणाचें ॥ वोझेंनवाहे ॥ ४६ ॥ श्रुतिः ॥ नतदश्नातिकिंचननतदश्नातिकिंचनेति ॥ ॥ यालागींनाहींपणजेणेंभासे ॥ तेंनाहींपणाकेवींगवसे ॥ असणेनवीणअसे ॥ असेंबोलिला ॥४७॥ किंवायेथेंनाहींविषयींविषयपण ॥ ह्मणोनिसर्वकाळसनातन ॥ पुढेंहीऐसीचिखूण ॥ सांगितली असे ॥ ४८ ॥

**परीआणीकाकाआपणीया ॥ नपुरेविषोहोआवया ॥**
**ह्मणोनिअसावया ॥ कारणकीं ॥ ३२ ॥**

पालटेवीणअसतुचिअसे ॥ परीविषयींविषयत्वनसे ॥ आपणाआपणकैसें ॥ विषयीव्हावें ॥ ४९ ॥ आपुलेंमुखआपण ॥ असिजेजेवींहुताशनेंजाण ॥ तेवींधर्मुधर्मित्वपण ॥ नाहींजेथें ॥ १५० ॥ तेवींचिन्मात्रचिजेंजाण ॥ जेंसनातनविक्षेपविहीन ॥ नित्यानंदनिरंजन ॥ स्वरूप मात्रजें ॥ ५१ ॥ तेंकेवींआपणयाकडे ॥ विषयीव्हावयापवाडे ॥ आणिजयाचेनिसुरवाडे ॥ दुजेंहीनाहीं ॥ ५२ ॥ मांदुजयाचेनिविषयित्वें ॥ आपणालागेविषयव्हावें ॥ तरीतेंकांहींचिन संभवे ॥ स्वरूपींइये ॥ ५३ ॥ जेथेंविषयीविषयपण ॥ तेंआगमापायीजाण ॥ हेंनाहींयालागींस नातन ॥ असेंतेंचिअसे ॥ ५४ ॥ अस्तिक्यत्वासीनटळे ॥ आणिनिर्देशितांनाडळे ॥ ग्राह्यग्राहक तेवेगळें ॥ स्वरूपमात्रजें ॥ ५५ ॥ ह्मणोनविषयविषयित्वविहीन ॥ जेंकींचिन्मात्रघन ॥ तेंनाहीं निपटून ॥ कैसेनघडे ॥ ५६ ॥ जेथेंविषयींविषयत्वनसें ॥ तेंअसणेंकैसेंअसें ॥ दृष्टांतेंसीऐसें ॥ बोलिजेतपुढां ॥ ५७ ॥

**जोनिरंजनींनिदेला ॥ तोआणीकींनाहींदेखिला ॥ आपुला हीनिमाला ॥ अठऊतया ॥ ३३ ॥ परीजीवेंनाहींनोहे ॥ तैसें शुद्धअसणेंआहे ॥ हेंबोलणेंनसाहे ॥ असेनाहिचें ॥ ३४ ॥**

सहजचिवनींएकांतु ॥ तेथेंजोनिद्राकरितु ॥ तयाचासाक्षभूतु ॥ असेनाकोण्ही ॥ ५८ ॥ अथवाआपणाआपणआठवे ॥ तेंहीतेथेंमाल्हवें ॥ परीतयाचाअभावनव्हे ॥ असतुचिअसे ॥५९॥ तेवींआहेनाहींपणें ॥ वांचूनिजेंशुद्धअसणें ॥ आहेनाहींपणासीजेणें ॥ आणिलेंरूपा ॥ १६० ॥ तेंबोलाअर्धींचिअसे ॥ आतांबोलींबोलवेंतेंकैसें ॥ नबोलवेंतरींनसें ॥ ऐसेंजेंनव्हे ॥ ६१ ॥

**दिठीआपणयामुरडे ॥ तेंदिठिपणहीमोडे ॥ परीनाहींनोहेफू डे ॥ तेंजाणेचितें ॥ ३५ ॥ कांकाळाराहेकाळवंखा ॥ तोआप णानाआणीकां ॥ नचोजवेतऱ्हींअसिका ॥ हामीबाणें ॥३६॥ तैसेंअसणेंकांनसणें ॥ हेंकांहींचिमानुसवाणे ॥ नसोनिअ सणें ॥ ठायेठावो ॥ ३७ ॥**

दृष्टीदेखणीअन्यथानव्हे ॥ परीआपणासीतंवनदेखवे ॥ तरीदृष्टीचिमाल्हवे ॥ ह्मणोंयेकाई

॥ ६२ ॥ तेंमुरडोनियांमागें ॥ आपणापाहोंलागे ॥ तेंपहावयाजोगें ॥ काहींचनाहीं ॥ ६३ ॥ परीदेखणेंचितिचेंरूप ॥ तेथेंतंवनव्हेविक्षेप ॥ तेंजाणेहेंसंज्ञास्वरूप ॥ देखणयाचें ॥ ६४ ॥ किंवाअर्धीचिपुरुषकाळा ॥ मगअंधारींउभाठाकला ॥ तोआणीकानाआपणयाला ॥ दिसेना जेव्हां ॥ ६५ ॥ परीतोआहेतेचेनिप्रत्ययें ॥ अभावातेंजेवींनपवे ॥ तेवींस्वरूपनाटोपेभावें ॥ परीनाहींनव्हेतो ॥ ६६ ॥ असणेंकिंवानसणें ॥ हेंकांहींचिमानुसवाणे ॥ ह्मणिजेउसासेउल्लेख घेणें ॥ हेंघडेस्वरूपीं ॥ ६७ ॥ स्वरूपसर्वदासरिसें ॥ परीअसणेंनसणेंनुसासें ॥ नसोनिचि असें ॥ ठायेठावो ॥ ६८ ॥ आपुलेनीचिप्रत्ययें ॥ प्रमेयत्वासीजेंनये ॥ नसोनिचिआहे ॥ तेंहें ऐसें ॥ ६९ ॥

**निर्मळपणींआपुला ॥ आकाशाचासंचुविराला ॥**
**तोस्वयेंअसेपुढीला ॥ काहींनाकीं ॥ ३८ ॥**

अन्यभूतसंबंधुनसतां ॥ आकाशाचासंचुवृथा ॥ निरावेवत्वेंपहातां ॥ आकाशकिमात्मक ॥१७०॥ स्वतांस्वभावआकाशाचा ॥ निरावेवत्वेंसाचा ॥ यालागींनव्हेदृष्टीचा ॥ विषयकोण्हां ॥ ७१ ॥ परीस्वतातेंनाहींनव्हे ॥ तेंजेवींनसोनिचिआहे ॥ तेचिविषयींविषयत्वनसंभवे ॥ स्वरू पींजऱ्हीं ॥ ७२ ॥ तऱ्हींअभावानाहींआला ॥ जेणेंअभावरूपाआणिला ॥ भावोभावासिवतला ॥ नव्हेजोअर्थु ॥ ७३ ॥ अथवाजेथींचेशुद्धपणीं ॥ विरालीआकाशादिश्रेणी ॥ तेंनाहींकैसेनि ॥ ह्मणोंयेआतां ॥ ७४ ॥ स्वरूपसर्वकाळपूर्ण ॥ ह्मणोनिनव्हेज्ञानअज्ञान ॥ तेंस्वरूपींशून्यपण ॥ कैसेनिआलें ॥ ७५ ॥

**कांअंगिकींनिर्मळपणीं ॥ हारतलियापोखरणी ॥**
**हेंआणीकावाचूनिपाणी ॥ सगळेंचिआहे ॥ ३९ ॥**

आटलियापोखरणी ॥ जऱ्हींदेखोनलाहिजेतद्गतपाणी ॥ परीतेंआपलेपणीं ॥ नाटतांअसें ॥ ७६ ॥ तेंविहिरीमधेंजऱ्हींनदिसे ॥ तऱ्हींजिरालेठाईंचिअसें ॥ तेवींभाव्यभावकमिसें ॥ देखि जेनातें ॥ ७७ ॥

**आपणाभागुतैसें ॥ असणेंचिजेंअसे ॥**
**असेंनाहींहेंअसे ॥ सांडूनियां ॥ ४० ॥**

स्वरूपासीदुसरेंकांहीं ॥ हेंस्वरूपींतोसंभवलेंनाहीं ॥ किंवास्वतंत्रेंपाहीं ॥ असोंनसके॥७८॥ ह्मणोनिस्वरूपमात्रचिआहे ॥ तेंकोण्हाचाभागुनव्हे ॥ तेंअस्तिक्यत्वेंपाहें ॥ आपुलेनिचिअसे ॥ ७९ ॥ स्वप्रकाशेंप्रकाशमान ॥ नाहींअप्रकाशातेंप्रकाशून ॥ आपुलेंचिअसणेंजाण ॥ असति यामूळ ॥१८०॥ परीअसणयाचिसेंनाहीं ॥ ऐसेंअसेजेंकांहीं ॥ तेंह्मणोयेईलकायी ॥ नाहींऐसें ॥८१

**निद्रेचेंनाहीपण ॥ निमालियाहीजागेपण ॥**
**असिजेकांनेण ॥ कोण्हीहोऊनिजैसें ॥ ४१ ॥**

निद्रानिरासींजाण ॥ किंचित्‌जागृतीचेंभान ॥ एवंनिद्राजागेपण ॥ दोहींचाद्रष्टा ॥ ८२ ॥ तोक्षणुलोटला ॥ निद्रेचानाशुसरला ॥ जागृतीचाहीबुडाला ॥ आठऊतेव्हां ॥ ८३ ॥ मगजागे पणजऱ्हींनेणें ॥ तऱ्हींअसिजेनिखळजागेपणें ॥ तेवींअसणयावीण ॥ असणेंजेंकीं ॥ ८४ ॥ ज्ञाना ज्ञानविहीन ॥ असेदृश्यमात्रद्रष्टेपण ॥ हेठाईंचीनिजखूण ॥ सांडिलीनाहीं ॥ ८५ ॥

**कांभूमींकुंभठेविजे ॥ तैंसकुंभताअपजे ॥ तोनेलयाह्मणिजे ॥ तेणेंवीण ॥ ४२ ॥ परीहेदोन्हींभाग ॥ नसिवतीभूमिचेंअंग ॥ तेव्हेळींभूमीतैसेंचांग ॥ चोखजेंअसे ॥ ४३ ॥**

भूमीवरीकुंभठेविजे ॥ तेणेंसकुंभभूमीबोलिजे ॥ तोकाढिलियाह्मणिजे ॥ निकुंभऐसें ॥ ८६ ॥ कुंभज्ञानाज्ञानविहीन ॥ असेदृश्यात्रद्रष्टेपण ॥ हेठायींचीनिजखूण ॥ सांडिलीनाहीं ॥ ८७ ॥ तरीपृथ्वीच्याठायीं ॥ कुंभासकुंभत्वचिनाहीं ॥ आतांसकुंभतातेकायी ॥ येईलतेणें ॥ ८८ ॥ कुंभ हेंवाचारंभण ॥ येथेंभूमीनसंडीभूमिपण ॥ सकुंभतेनिकुंभतेवीण ॥ भूमिमात्रचिपैं ॥ ८९ ॥ किंवादेखिजेकुंभात्यागु ॥ तऱ्हींभूमीसीनघडेवियोगु ॥ एवंआपणयाभागु ॥ भूमीचिअसेपैं ॥१९० तस्मात्कुंभाचेअर्थीनाथीवीण ॥ केवळभूमीचिअसेजाण ॥ तेवींनसोनिज्ञानाज्ञान ॥ ज्ञानमात्रजें ॥ ९१ ॥ जेंजाणतांजाणिवेतेंनये ॥ ह्मणोनिनसाहेज्ञानसोये ॥ आतांज्ञानचिज्ञाननव्हे ॥ मगअज्ञानतेंकिमात्मक ॥ ९२ ॥ चिन्मात्रत्वेंजयावीण ॥ नसतीज्ञानआणिअज्ञान ॥ ह्मणोनिअसतेपणेंवीण ॥ असेजेंसिद्ध ॥ ९३ ॥ एवंशब्दैकभावो ॥ याचाचियेथेंअभावो ॥ परीआत्माचिवावो ॥ ऐसेंनव्हे ॥ ९४ ॥ ज्ञानआणिअज्ञान ॥ हेंकेवळवाचारंभण ॥ आत्माआत्मत्वेंपूर्ण ॥ संचलाअसे ॥ ९५ ॥ उक्तंच ॥ अतःसर्वविकाराश्चवाचाकेवलमास्तिकाः ॥ अस्तीत्यारभ्यचेन्नामधेयमात्रंहि तत्सदा ॥ ॥ इतिसूतसंहितायां ॥ ॥ ह्मणोनिआत्मासच्चिदानंदु ॥ परीनसाहेसच्चिदानंदशब्दु ॥ वादेंनिर्विवादु ॥ लाहिजेकाई ॥९६॥ यालागींशब्दाचेनिरर्थकपण ॥ वांचूनिआत्माआत्मत्वें पूर्ण ॥ ज्ञाननव्हेनाअज्ञान ॥ चिन्मात्रह्मणोनि ॥ ९७ ॥ ज्ञाननव्हेनाअज्ञान ॥ ऐसाआत्मापूर्णज्ञानघन ॥ तेंआत्मत्वचिशून्य ॥ हाअबद्धतर्कु ॥९८॥ अभेदेंज्ञानमात्रचिपूर्ण ॥ हेअनुभवाचीखूण ॥ तेथेंकुतर्कहाजाण ॥ कैसेनिरिघेल ॥ ९९ ॥ एवंआत्माएकनिर्द्वंद्व ॥ तोचिहाज्ञानअभेद ॥ बोलोनियांशून्यवाद ॥ खंडितायेथें ॥ २०० ॥ आतांभेदुतोशब्दवाद ॥ येऱ्हवींआत्मासच्चिदानंदशुद्ध ॥ ऐसेंनिरूपणअगाध ॥ बोलतीलपुढें ॥ १ ॥ स्वताज्ञानमात्रनिरावेव ॥ तेंचिनिखळज्ञानदेव ॥ अनुभवाचीठेव ॥ उभविलीतेंहिं ॥ २ ॥ तेथेंप्रतिपाद्यजोआनंद ॥ तोचिनिखळनित्यानंद ॥ तेणेंचिहेंविषद ॥ विवरणमिरवे ॥ ३ ॥ जेवींसाडेपन्हरेयाचीखोटी ॥ माजींअसतीकटककुंडलादिकोटी ॥ नभोगिजेतरीयेकुटि ॥ खोटीचअसे ॥ ४ ॥ तेपरवडीजरीभोगिजे ॥ तेथेंचिसकळलाहिजे ॥ तेंविलासेंआस्वादिजे ॥ येथिंचास्वादु ॥ ५ ॥ तोस्वादुचिनित्यानंदु ॥ तोचिसकळकल्याणकंदु ॥ अनुभवुचिविषदु ॥ विवरणरूपें ॥ ६ ॥ नानाहेअमृतवल्ली ॥ नित्यानंदवसंतेंरुपशली ॥ तेणेंसुरवाडेफळाआली ॥ विवरणरूपें ॥७॥ तेंफळश्रद्धास्वीकारिजे ॥ तद्रूपतातेथिंचीलाहिजे ॥ ग्राह्यग्राहकतेचेंवोझें ॥ उतरूनिजाये ॥८॥ आतांसज्जनींकृपाकीजे ॥ नित्यानंदेंअवलोकिजे ॥ तेअवलोकनचिमियांभूजिजे ॥ अनुभवामृतरूपें ॥९॥ आतांअसोहाप्रसंग ॥ पुढेंप्रस्तावोअसेचांग ॥ सच्चिदानंदसुभग ॥ वाखाणिजेल ॥२१०॥ तेअनुभवामृतींचीखूण ॥ जैंस्वरूपसर्वदाकल्याण ॥ शिवशांतसमान ॥ निरावसान ॥ ११ ॥ तेनिरावसानींअवसान ॥ तोतेथिंचाकल्लोळजाण ॥ सुखचिआपुलेंसुखपण ॥ भोगितअसे ॥ १२ ॥ इतिश्रीअनुभवामृतविवरणेज्ञानअभेदंनामचतुर्थ प्रकरणंसमाप्तं ॥

---

# प्रकरण पंचम.

ॐनमःपरमात्मने ॥ जयजयजीशुद्धा ॥ नित्यानंदानिर्विवादा ॥ कल्याणरूपानिर्द्वंद्वा ॥ चिन्मात्राजी ॥ १ ॥ प्रमेयप्रमाणातीता ॥ जीतूंअव्ययाअव्यक्ता ॥ स्वसंवेद्यासदोदिता ॥ स्वसाक्षित्वेंतूं ॥ २ ॥ तुजसाक्षसाक्षित्वनाहीं ॥ ऐसेंचिसाक्षित्वजेंकांहीं ॥ तयातुझ्यापाईं ॥ रिघालोंशरण ॥ ३ ॥ नमोडेजीतुझीसुखखूण ॥ ह्मणोनितेचिशरण्यतेचिशरण ॥ ऐसेनितूंगुरु शिष्यपण ॥ शोभविसीदेवा ॥ ४ ॥ तूंसर्वथानव्हेसीविलक्षण ॥ नमोडेतुझेंस्वसंवेद्यपण ॥ ऐसेनितुजगुरुशिष्यपण ॥ शोभतेंदेवा ॥ ५ ॥ तूंव्याप्यव्यापकविहीन ॥ आपेआपव्यापकुजाण॥ ऐसेनितुजगुरुशिष्यपण ॥ शोभतेंदेवा ॥ ६ ॥ तुझेंअविनाशजेंद्रष्टेपण ॥ तेंलोपातेंनपवेजी जाण ॥ तेंचिगुरुशिष्यत्वाचीखूण ॥ त्वद्रूपींदेवा ॥ ७ ॥ तस्मात्किंचित्भेदनसोन ॥ मीतुझ्या पाईंशरण ॥ हेहीनमोडेखूण ॥ सर्वथास्वामी ॥ ८ ॥ आतांमजशरणागताचीविनंति ॥ अवधा रावीजीश्रीमूर्ति ॥ हेजेतुझीवचनोक्ति ॥ ज्ञानेश्वररूपें ॥ ९ ॥ तेंचिजेंनिखळज्ञानामृत ॥ जेंकीं अमृततेंहीजीववित ॥ परीशब्दाचीयेथ ॥ नवाहेवाट ॥ १० ॥ ह्मणोनिशब्दाचीनखीनलगत ॥ विलासिलेंसेंअनुभवामृत ॥ तेंमियाआस्वादिजेत ॥ आहेस्वामी ॥ ११ ॥ तयारसरूपासीतूं रस ॥ होऊनिमजकीजेसुरस ॥ यालातुझीवास ॥ पाहातुसेस्वामी ॥ १२ ॥ तेंसुरसमियाआ स्वादावें ॥ सुरसउद्गारातेंप्रसवावें ॥ हेंतुंवाचिअवघेंहोआवें ॥ आहेमीजऱ्हीं ॥ १३ ॥ जैसा मुखचंद्रजोआपुला ॥ जोअर्धीचिआहेसंचला ॥ तऱ्हींदर्पणदाताजाला ॥ मुखमुखासी ॥ १४ ॥ तैसेंसुखभोगावेंसुखेंचिकरून ॥ यासीतुंवाचिव्हावेंजीदर्पण ॥ तेथेंबिंबावेंहीतुवांचिजाण ॥ माझीयाकृपा ॥ १५ ॥ मगमजतुजअवलोकितां ॥ सहजचिमाझीनुरेअवलोकनता ॥ ऐसेंनिविव रणपंथुचालता ॥ करावास्वामी ॥ १६ ॥ इयेविनवणीसरिसे ॥ निजानंदेंचित्तउल्हासे ॥ आ तांग्रंथप्रसंगींऐसें ॥ निरूपणअसे ॥ १७ ॥ पूर्वप्रसंगींनिरूपण ॥ जेंज्ञानाज्ञानहीन ॥ निखळज्ञान मात्रचिजाण ॥ अभेदेंअसे ॥ १८ ॥ ज्ञानआणिअज्ञान ॥ हेंकेवळवाचारंभण ॥ तेंचिनसेयेरूपीं पूर्ण ॥ सच्चिदानंदजो ॥ १९ ॥ आत्मास्वतासच्चिदानंदु ॥ यासीकारणनव्हेचिशब्दु ॥ आइता अगाधु ॥ शब्दातीत ॥ २० ॥ सच्चिदानंदआयितेंपूर्ण ॥ येथेंनसेत्रिविधलक्षण ॥ आतांत्रिविध ताजेशब्दींचिजाण ॥ नांदतअसे ॥ २१ ॥ ऐसेंविशदनिरूपण ॥ जेअनुभवामृतींचीखूण ॥ तेआ तांप्रगटकरीन ॥ अवधारिजोजी ॥ २२ ॥ आशंका॥आत्माएकुसुबुद्ध ॥ ज्ञानाज्ञानाह्नीअगाध॥ तेंस्वरूपमात्रींत्रिविधत्रिवाद ॥ सच्चिदानंदहें ॥ २३ ॥ तरीकिमात्मकहेभेद ॥ कासयासच्चिदा नंदवाद ॥ तरीयेचिविषईंअतिशुद्ध ॥ निरूपणअसे ॥ २४ ॥

**सत्ताप्रकाशसुख ॥ यातिहींतिहींउणेलेख ॥**
**जेवींविखपणेंचिविख ॥ विखानाहीं ॥ १ ॥**

स्वरूपकदानव्हेअन्यथा ॥ हेचिजाणावीयेथेंसत्ता ॥ जीयेवीणतत्वता ॥ अणुमात्रहीनाहीं ॥ २५ ॥ येथेंअन्यथातेंकायनव्हे ॥ तरीदृश्यात्रजेंद्रष्टेंआहे ॥ प्रकाशएेशीहोये ॥ येथेंचिखूण॥२६॥ तयाअन्यथाहोणेंनाहीं ॥ यालागींसत्तातेहेचिपाही ॥ आणिप्रकाशजोतोही ॥ यासीचह्मणिजे ॥ २७ ॥ आतांप्रकाशरूपापालटुनसे ॥ तोआपुलेप्रचितिचेसौरसे ॥ ह्मणोनिआनंदरूपऐसें ॥ हेंचिमिरवे ॥ २८ ॥ आपणआपणानावडे ॥ हेंकदाकाळींनघडे ॥ तरीआवडीकैसीजडे ॥ जडा

चीधरिजे ॥ २९ ॥ यालागींप्रकाशघन ॥ येणेंचिसुखेंसुखीआपण ॥ हेंअस्तिक्यतेवांचून ॥ कदा नघडे ॥ ३० ॥ आतांप्रकाशज्ञानघन ॥ जेंसकळाचेंअधिष्ठान ॥ ह्मणोनिसुखरूपहेंचिपूर्ण ॥ एवं सच्चिदानंदस्वरूपमात्र ॥ ३१ ॥ ह्मणोनिसत्ताप्रकाशसुख ॥ तिहींशब्दींअर्थएक ॥ शब्दमिसेंत्रिधालेख ॥ तेवृथाचिजाले ॥ ३२ ॥ निरंतरजेंचिद्रूप ॥ तेथेंनसंचरेविक्षेप ॥ स्वभावेंसुखरूप ॥ यालागींअसे ॥ ३३ ॥ आतांसत्ताप्रकाशसुखजेंहें ॥ यांतअन्यथाकाहींचनव्हे ॥ परीअपरिच्छेदत्वेंनसाहे ॥ गणनायेथें ॥ ३४ ॥ ह्मणोनिहेस्वाभाविक ॥ परीत्रिभावींनकीजेलेख ॥ सच्चिन्मात्रसुख ॥ नसोनिचिअसे ॥ ३५ ॥ जेवींविषपणेंचिविषअसे ॥ परीविषपणविषींनस्पर्शे ॥ आतां स्पर्शेतरीनाशे ॥ आपणचिथितें ॥ ३६ ॥ यालागींविषत्वेंचिविषअसोनी ॥ विषनाहींविषपणीं ॥ तेवींसत्तादिभागनसोनी ॥ सच्चिदानंदु ॥३७॥ एकुचिअर्थत्रिविध ॥ हाचियेथेंविरोध ॥ भेदअसतातरीसंवाद ॥ कधींचिनसता ॥ ३८ ॥ ह्मणोनित्रिविधभागनाहीं ॥ हेंचिपाडिलेंठायीं ॥ येथेंशब्दाचाकांहीं ॥ उपयोगुचिनसे ॥ ३९ ॥ सच्चिदानंदप्रवाहीं ॥ स्वरूपतात्रिभागझालेनाहीं ॥ आतांशब्दींजेंदिसेकांहीं ॥ तेंवृथाजाणावें ॥ ४० ॥

**कांतिकाठिण्यकनक ॥ तिन्हीमिळोनीकनकएक ॥**
**द्रावगोडीपीयुख ॥ पीयुखचिजेवीं ॥ २ ॥**

त्रिलिंगींएकसुवर्ण ॥ तेवींचिद्रावगोडीशुभ्रवर्ण ॥ अर्थाचेंएकपणंजाण ॥ त्रिलिंगहीनपैं ॥४१॥ दुग्धींउमटतीतिन्हीभाव ॥ हादेखतियाचास्वभाव ॥ परीदुग्धींसमूळवाव ॥ भागत्रय ॥ ४२ ॥ पात्रेंएकचिअसीजे ॥ तयाबहुगुणीऐसेंबोलिजे ॥ परीपात्रेंतेणेंनव्हिजे ॥ बहुधाजेवीं ॥ ४३ ॥ तेवींस्वरूपमात्रचिएकपूर्ण ॥ सत्ताप्रकाशआनंदघन ॥ परीअर्थैक्यतिन्हीहीन ॥ प्रत्ययमात्र ॥ ४४ ॥ प्रत्ययेंचित्रिधाचित्र ॥ तऱ्हींएकलाप्रत्ययमात्र ॥ स्वतःसिद्धपवित्र ॥ सच्चिदानंदु॥४५॥ अविनाशिमात्रज्ञान ॥ असंबंधिआनंदघन ॥ येथेंजेंत्रिविधपण ॥ कल्पिजेजरी ॥ ४६ ॥ येऱ्हवीं स्वरूपपूर्ण ॥ सर्वथात्रिलिंगहीन ॥ भेदाभेदविहीन ॥ संचलेंअसे ॥ ४७ ॥

**उजाळदतिमार्दव ॥ यातिहींतिहींउणिव ॥ हेंदेखिजेसावेव ॥**
**कापुरीं एकें ॥ ३ ॥ अंगेकीरउजाळ ॥ कींउजाळतोचिमवाळ ॥**
**कींदोन्हीनापरिमळ ॥ मात्रजें ॥ ४ ॥ ऐसेंएकेकापुरपणीं ॥**
**तिन्हीइयेतिन्हीउणी ॥ इयापरीआटणी ॥ सत्तादिकाची ॥ ५ ॥**

मृदुताशुभ्रतापरिमळ ॥ परीकापूरमात्रकेवळ ॥ यालागींसकळ ॥ भागचिवृथा ॥ ४८ ॥ यांतुएकुमुख्यकरावा ॥ दोंधिंचाउपाधिदेखावा ॥ तरीविचारितायाभावा ॥ विचारूचिमुरडे ॥ ४९ ॥ उजळताकायआळली ॥ तेंमवाळदशेआली ॥ किंवापरिमळींसंभवली ॥ आणीकें दोघें ॥ ५० ॥ हेंतोंकांहींयेथेंनसे ॥ प्रत्ययमात्रकापूरचिअसे ॥ भेदुतोशब्दींदिसे ॥ वांचूनिकापूरएकु ॥ ५१ ॥ ठाईंचेचिएकपणीं ॥ असेत्रिभागाचीआटणी ॥ तेथेंप्रकाशिजेइहींचिन्हीं ॥ कापुराकेवीं ॥ ५२ ॥ तेवींप्रत्ययाचेनिकौतुकें ॥ आवडतीहेसत्तादिकें ॥ परीप्रत्ययाचीजनके ॥ नव्हेतिहेपैं ॥ ५३ ॥ येथेंप्रत्ययहोऊनुपरे ॥ तंवजालाचिप्रत्ययोविरे ॥ येथेंसत्तात्वेंनस्फुरे ॥ सत्तात्वयासी ॥ ५४ ॥ किंवाचिदत्वेंचिन्मात्र ॥ कींआनंदवीआनंदचित्र ॥ हेंनसेएकतंत्र ॥ स्वरूपमात्रीं ॥ ५५ ॥ आनंदाचेनिपैसे ॥ आनंदत्वयेथनसे ॥ तेथेंसत्ताप्रकाशत्वकैसें ॥ सत्ता प्रकाशासी ॥ ५६ ॥

**येऱ्हवींसच्चिदानंदभेदें ॥ चाललींतिन्हींपदें ॥**
**परीतिन्हींउणीआनंदें ॥ केलींयेणें ॥ ६ ॥**

आनंदातीतआनंदु ॥ जेणेंप्रत्ययेंआत्मासच्चिदानंदु ॥ त्रिभेदाचाजेथेंबाधु ॥ नकरितांचि असे ॥ ५७ तयाआनंदाचेसुरवाडे ॥ त्रिपदत्वेंशब्दवावडे ॥ परीशब्दापवाडे ॥ भेदवेनावस्तु ॥ ५८ ॥ ह्मणोनिशब्दुचिनघडे ॥ वांचोनिसच्चिदानंदचोखडें ॥ तेंआपुलियेपडिपाडे ॥ असतचि असे ॥ ५९ ॥ जेणेंप्रत्ययेंसच्चिदानंदसंकेतु ॥ तेथेंचिहाशब्दसामावतु ॥ शब्दत्वेंनमिरवतु ॥ शब्दतेथें ॥ ६० ॥ ह्मणोनित्याआनंदाचेठायीं ॥ त्रिपदत्वेंत्रिपदनाहीं ॥ यालागींउणीकेलीपाहीं॥ आनंदेंतेणें ॥ ६१ ॥ आतांबोलतांहीत्रिविधप्रवाहे ॥ त्रिविधताचिलोपोनिजाये ॥ पुढेंयेचिअभिप्रायें ॥ बोलतुअसे ॥ ६२ ॥

**सत्ताचिकींप्रकाशु ॥ प्रकाशुचिसताउल्हासु ॥**
**हेंननिवडेंमिष्ठांशु ॥ अमृतींजेवीं ॥ ७ ॥**

आतांसत्ताहेह्मणावी ॥ तरीचिद्रूपहेअघवी ॥ ह्मणोनिप्रकाशचिसर्वभावीं ॥ सर्वदाअसे ॥ ६३ ॥ जेंसर्वसाक्षीसर्वदाअसे ॥ सत्तात्वतंवतेचिऐसें ॥ निगदलेंवेदपुरुषें ॥ अनादिआहे ॥६४॥ ह्मणोनिसत्ताआणिप्रकाशु ॥ हाएकुचिइस्यंशु ॥ द्रावत्वआणिरसु ॥ एकलेंजळ ॥ ६५॥ सर्वही जेणेंप्रकाशे ॥ तेसत्ताकींप्रकाशऐसें ॥ असेवेगळालेजेणेंअसे ॥ ह्मणावेकायी ॥ ६६ ॥ जेवींअमृतआणिमिष्ठांशु ॥ हाकेवळवाग्विलासु ॥ एकेस्वीकारीउभयांसु ॥ उभयत्वनाहीं ॥ ६७ ॥ तेवींएकलेनिप्रत्ययें ॥ उभारिलींजेपदत्रयें ॥ तरीप्रत्ययमात्रींनये ॥ त्रिधाभेदु ॥ ६८ ॥ यादोहींचाअभेदु ॥ तोचियेथेंआनंदु ॥ ह्मणोनिसच्चिदानंदु ॥ त्रिविधातेंरहित ॥ ६९ ॥ अनुवादें नव्हेभेदु ॥ आत्माएकुलासच्चिदानंदु ॥ येचिविषयींग्रंथविशदु ॥ चालिलापुढें ॥ ७० ॥

**शुक्लपक्षींचेसोळा ॥ दिसेदिसवाढतीकळा ॥**
**परीचंद्रमात्रसगळा ॥ चंद्रींजेवीं ॥ ८ ॥**

तिथींचेनिप्रवाहें ॥ चंद्रकळावाढलीदिसेहे ॥ परीसोळाठायींनव्हे ॥ चंद्रमात्र ॥ ७१ ॥ चंद्र होयप्रभाहीन ॥ मगतिथीहोऊनिकारण ॥ कीजेचंद्रकळापूर्ण ॥ हेंतंवनघडे ॥ ७२ ॥ कळींवाढलादिसे ॥ परीचंद्रचंद्रींअसे ॥ येथेंअनुमानेंचिभ्रंशे ॥ वांचूनिचंद्रयथातथ्य ॥ ७३ ॥ रवीसमीपताजंवजंवपावे ॥ तंवतंवहीनप्रभेऐसेंभावे ॥ परीहेजनदृष्टिचोजवे ॥ वांचूनिचंद्रसगळा ॥ ७४ ॥ तेवींत्रिपदजेणेंविलासे ॥ तेंतंवनयेत्रिपददशे ॥ किंवात्रिपदाचेनिप्रत्ययवशें ॥ त्रिविधतेंहानी ॥ ७५ ॥ शब्दाअधींजोआहे ॥ शब्दांतींतोचिप्रत्ययोहोये ॥ आतांशब्दींदिसतीभागत्रये ॥ तेचिवृथा ॥ ७६ ॥

**थेंबींपडतांउदक ॥ थेंबाधरूंयेलेख ॥ परीपडल्याठाइंउदक ॥ वांचूनिआहे ॥ ९ ॥ तैसेंअसताचियाव्यावृत्ति ॥ सद्ह्मणो आलेश्रुति ॥ जडाचियासमाप्ति ॥ चिद्रूपऐसें ॥ १० ॥ दुःखाचेनिसर्वनाशें ॥ उरलेंसुखऐसें ॥ निगदलेंनिःस्वासें ॥ प्रभु**

**चेनि ॥ ११ ॥ ऐसींसदादिप्रतियोगियें ॥ असदादितिन्हीयें ॥ लोटितांजालींत्रायें ॥ सत्तादिकां ॥ १२ ॥ एवंसच्चिदानंदु ॥ आत्माहाऐसाशब्दु ॥ अन्यव्यावृत्तिसिद्धु ॥ वाचकनव्हे ॥ १३ ॥**

उदकथेंबींव्यावर्षलें ॥ तेथेंथेंबदिसतीवेगळाले ॥ परीउगमींउदकएकलें ॥ तेंचिअवसानीं एक ॥ ७७ ॥ थेंबासीआदिअवसान ॥ उदकएकलेंचिपूर्ण ॥ थेंबींदिसेवेगळालेपण ॥ तेंचिवृथा ॥ ७८ ॥ तेवींआत्मासच्चिदानंद ॥ परीशब्दींदिसेत्रिधाभेद ॥ तोशब्दुवृथायेरसिद्ध ॥ जैसेंतैसें ॥ ७९ ॥ असद्‌निःशेषनाहीं ॥ ह्मणोनिसत्‌चिअसेठायीं ॥ नेणीवनसेकधींही ॥ ह्मणोनिचिद्रूप वस्तु ॥ ८० ॥ आपुलेनिसुखपणें ॥ दुःखासीनिःशेषनेणें ॥ यालागींस्वांगींचेसुखपणें ॥ सर्वदा असे ॥ ८१ ॥ तस्मात्‌सत्‌सर्वदापाहीं ॥ ह्मणोनिचिअसदत्वनाहीं ॥ तैंचिद्रूपत्वाकधींही ॥ पालटुनसे ॥ ८२ ॥ यालागींसर्वदाआनंदघन ॥ दुःखाचाअभावनिपटून ॥ ह्मणोनिवेदेंसच्चिदानंदखूण ॥ प्रगटकेली ॥ ८३ ॥ परंतुयेथेंनसतीतीनभाग ॥ भागहेबोलाचीबाग ॥ चिन्मात्रचिअभंग ॥ विलासतअसे ॥ ८४ ॥ ह्मणोनिसतप्रतियोगियेंऐसीं ॥ सत्तादिह्मणिजेसत्तादिकेंअविनाशियासी ॥ अभावाआणितपेशी ॥ असतादिक ॥ ८५ ॥ याचादेखोनिअभावो ॥ वेदेंबोलिलासत्तादिभावो ॥ येथेंशब्दुचिदिसेवावो ॥ पुनरुक्तपणें ॥ ८६ ॥ असत्‌स्वतंत्रअसतें ॥ तरीसतत्व अभावायेतें ॥ किंवाजडत्वउरोनेदीतें ॥ चिद्रूपतायेथींची ॥ ८७ ॥ नातरीदुःखाचानिःशेष बाध ॥ तरीचिनित्यआनंद ॥ यालागींसत्तादिकांप्रतिवाद ॥ असतादिकें ॥ ८८ ॥ याचाअभावदेखोनी ॥ सच्चिदानंदवेदवाणी ॥ हेंपुनरुक्तवांचोनि ॥ आइतेंस्वरूप ॥ ८९ ॥ एवंसच्चिदानंदशब्द ॥ हाअन्यवृत्तिसिद्ध ॥ वांचूनिआत्मास्वतःसिद्ध ॥ तद्वाचकनव्हे ॥ ९० ॥ स्वरूपस्वतःसिद्धआहे ॥ तेथेंशब्देंकीजेकाये ॥ येचिअभिप्रायें ॥ बोलिलेंपुढें ॥ ९१ ॥

**सूर्याचेनिप्रकाशें ॥ जेंकांहींजडआभासे ॥ तयातोगिवसे ॥ सूर्यकायी ॥ १४ ॥ तेंवींजेणेंतेजें ॥ वाचेसीवाच्यसुजे ॥ तें वाचाप्रकाशिजे ॥ हेंकेंआहे ॥ १५ ॥**

सूर्याचेनिप्रकाशें ॥ पदार्थजातआभासे ॥ तेंपदार्थींकैसें ॥ प्रकाशिजेसूर्य ॥ ९२ ॥ सूर्याचें अवलोकन ॥ तेंसूर्यप्रकाशेंचिकरून ॥ वांचूनिजडपदार्थींकेवींजाण ॥ प्रकाशिजेसूर्यें ॥ ९३ ॥ तेवींसिद्धसच्चिदानंद ॥ जेणेंप्रकाशिलाहाशब्द ॥ तरीशब्देंकेवींसिद्ध ॥ साधिजेपाहें ॥ ९४ ॥ वाचाजेणेंवावडे ॥ तैंकेवींआलेंवाचेपुढें ॥ तस्मात्‌वाचानघडे ॥ वाच्यसूचक ॥ ९५ ॥ अर्थी अर्थमगशब्द ॥ हेंतंवदिसेप्रसिद्ध ॥ तेथेंकेवींसच्चिदानंद ॥ वाचेचाविषय ॥ ९६ ॥

**विषोनाहींकोणहाही ॥ जयाप्रमेयत्वचिनाहीं ॥ तयास्वप्रकाशाकायी ॥ प्रमाणहोये ॥ १६ ॥**

तेवींचिद्घनानंदएकलें ॥ नाहींदुजयातेंजेंप्रसवलें ॥ किंवाठायींचेंनाहींजालें ॥ त्याहूनिस्वतंत्र ॥ ९७ ॥ ह्मणोनिविषयकोणहाचानव्हे ॥ जेंकींस्वप्रकाशेंचिआहे ॥ ऐसेंतेंकेवींसाहे ॥ प्रमाणासी ॥ ९८ ॥ जरीप्रमाणासीविषयनव्हे ॥ तरीप्रमाणवृथाहोये ॥ तेंजैसेंतैसेंआहे ॥ स्वताचिसिद्ध ॥९९॥ एवंप्रमेयप्रमाणातीत ॥ निखळआत्माचिसतत ॥ तेंप्रमाणींसाधिजेत ॥ ऐसेंनव्हे ॥१००॥

आतांसच्चिदानंदशब्द ॥ येथेंनकरितांअसेशब्दबाध ॥ वांचूनिजेंअसेस्वतःसिद्ध ॥ तेंठायींचे ठायीं ॥ १ ॥ ॥ आशंका ॥ ॥ स्वतःसिद्धवस्तुच्याठाईं ॥ प्रमेयप्रमाणत्वनाहीं ॥ तरीवस्तु चिहेकायी ॥ प्रमाणनव्हे ॥ २॥ आतांप्रमाणजरीअसे ॥ तरीप्रमेयत्वकासयानसे ॥ येआशंकेस्त वऐसें ॥ बोलिलेंपुढें ॥ ३ ॥

**प्रमेयपरिच्छेदें ॥ प्रमाणत्वनांदे ॥**
**तेंकांहींस्वतःसिद्धे ॥ वस्तूच्याठाईं ॥ १७ ॥**

वस्तूसीवस्तुहेंप्रमाण ॥ येथेंप्रमाणचिविरालेंवस्तुत्वेंजाण ॥ तेथेंप्रमेयतेंकोठून ॥ आणावें दुजें ॥ ४ ॥ प्रत्ययमात्रवस्तुपूर्ण ॥ हेंचिप्रमेयहेंचिप्रमाण ॥ आतांप्रमेयपूर्णघन ॥ प्रमाणशून्य ५ आतांप्रमाणजरीनाहीं ॥ तरीप्रमेयतेंकोणकाई ॥ असोनठाईच्याठाईं ॥ उभयातीत ॥ ६ ॥ प्रमेय चिप्रमाणजरीनोहे ॥ तरीकायप्रमाणत्वसाहे ॥ मगप्रमेयत्वेंप्रमेये ॥ कासयाअसे ॥ ७ ॥

**एवंवस्तूसीजाणोंजातां ॥ जाणणेंचिवस्तुतत्वता ॥**
**मगजाणणेंआणिजाणता ॥ कैंचाउरे ॥ १८ ॥**

नातरीप्रमेयपरिच्छेदे ॥ ह्मणिजेप्रमेयवेगळेंनांदे ॥ हेंनघडेस्वतःसिद्धे ॥ वस्तूच्याठाईं ॥ ८ ॥ अर्थेंशब्दत्वआलेंशब्दीं ॥ परीशब्देंनव्हेचिअर्थसिद्धी ॥ एवंप्रत्ययमात्रींअधीं ॥ मावळेशब्दु ॥९॥

**ह्मणोनिसच्चित्सुख ॥ हेबोलवस्तुवाचक ॥**
**नव्हेतिहेशेष ॥ विचारांचें ॥ १९ ॥**

ह्मणोनिसच्चिदानंदत्रय ॥ याशब्दासीवस्तुनव्हेविषय ॥ होतांस्वरूपप्रत्यय ॥ शब्दुचिवृथा ॥ ११० ॥ विचाराच्याअांतु ॥ तोहाशब्दसंकेतु ॥ परीस्वरूपासीप्रकाशितु ॥ ऐसानव्हे ॥ ११ ॥ वाचाजेथेंनिवर्तती ॥ तेचिजाणावीआत्मानुभूती ॥ येणेंचिभावेंश्रुति ॥ बोलिलीअसे ॥ १२ ॥ विचाराच्याआंतु ॥ शब्दहीतेथेंचिविरमतु ॥ पुढेंहीयाचिहेतु ॥ बोलिलेंअसे ॥ १३ ॥

**ऐसेनिइयेंप्रसिद्धें ॥ चालिलींसचिदानंदपदें ॥ मगद्रष्टयास्व संवादे ॥ भेटतीजेव्हां ॥ २० ॥ तेव्हेळींवरिसोनिमेघु ॥ समुद्रहोऊनिओघु ॥ सरेदाऊनिमाघु ॥ राहेजैसा ॥ २१ ॥**

स्वरूपींशब्दुनाहीं ॥ हेंदावावयाचेप्रवाहीं ॥ चालिलींअसतींपाहीं ॥ सत्तादिकेंहें ॥ १४ ॥ स्वरूपमात्रींनिर्गुणीं ॥ उमटलीसत्तादिवाणी ॥ परीउमटतांचिहानि ॥ शब्दाचीजाली ॥ १५ ॥ दृश्यात्रद्रष्टृत्वींयिये ॥ त्रिविधविशेषणींएकुप्रत्यये ॥ परीप्रत्ययींविरोनिजाये ॥ त्रिविधविशेष ॥ १६ ॥ जेवींमेघाचेप्रवाहें ॥ सिंधुजळचिओघजालेंहे ॥ मगओघत्वमोडोनिगेलेंहे ॥ पावतां सिंधु ॥ १७ ॥ मेघद्वारावर्षलें ॥ तेंसिंधुजळत्वींओघजालें ॥ मगओघत्वमोडोनिगेलें ॥ पावतां सिंधु ॥१८॥ सिंधुजळसिंधुत्वेंसंचलें ॥ परीओघपणचिमिथ्याजालें ॥ तेवींसच्चिदानंदयेणेंबोलें ॥ बोलचिमिथ्या ॥ १९ ॥ स्वरूपासजेंसंचलें ॥ तेंप्रत्ययमेघेंप्राशिलें ॥ मगतेंह्मणेमेघेंवर्षिलें ॥ स च्चिदानंदत्वें ॥ १२० ॥ तेंचिहेंप्रत्ययओघ ॥ स्वरूपींमिळालेंअमोघ ॥ परीमिळतांचिओघभाग ॥ हरपलेंजाण ॥२१॥ तेथेंप्राशिताआणिजीवन ॥ हेंजीवनमात्रचिसंपूर्ण ॥ आणिओघरूपहीजाण ॥ अभेदेंतेंचि ॥ २२ ॥ एवंविभागींअविभाग ॥ येकचिस्वरूपसांग ॥ दुसरयाचालाग ॥ लागला

नाहीं ॥ २३ ॥ तेथेंशब्दींदिसेशब्दपण ॥ तेंचियेथेंव्यर्थजाण ॥ येऱ्हवींस्वरूपमात्रपूर्ण ॥ संचलें असे ॥ २४ ॥ सिद्धचिचिद्घनानंद ॥ प्रत्ययतोचिसिद्ध ॥ येथेंनकरितांचिबाध ॥ शब्दासी आला ॥ २५ ॥ बोलेंअर्थद्योतिला ॥ सेखींअर्थेंशब्दुचिपुसिला ॥ मगसच्चिदानंदहेबोला ॥ विष यहोयकेवीं ॥ २६ ॥ जेणेंअर्थेंशब्दरूपासीआला ॥ तेणेंचिअर्थेंशब्दअर्थिला ॥ ह्मणोनिअर्थबोला ॥ नव्हेचिविषय ॥ २७ ॥

**फळविऊनिफूलसुके ॥ फळनाशेरसपाके ॥ तोहीरसउपखे ॥ तृप्तिदानीं ॥ २२ ॥ कांआहुतिअग्निआंत ॥ घालूनिवोसरे हात ॥ सुखचेववूनिगीत ॥ उगाराहे ॥ २३ ॥ नानामुखामु खदाऊनि ॥ आरिसाजायनिगोनि ॥ कांनिदैलेंचेवऊनि ॥ चेववितेंजैसें ॥ २४ ॥ तैसेंसच्चिदानंदचोखटा ॥ दाऊनिद्रष्ट याद्रष्टा । तिन्हींपदेंलागतीवाटा ॥ मौनाचिया ॥ २५ ॥**

पुष्पेंफळद्योतिलें ॥ सेखींपुष्पत्वासीचिमुकलें ॥ किंवाफळरसत्वाआलें ॥ फळपणामुके ॥२८॥ किंवारसेंतृप्तिजाली ॥ तिणेंरसपणाहानीकेली ॥ अंगेंअंगानिवटली ॥ तृप्तिचिएकी ॥ २९ ॥ किं वाआहुतिहवनींसमर्पेली ॥ तेथेंहस्तक्रियाचिहरपली ॥ अंगेंअंगसंचली ॥ आहुतीचिअग्नि ॥१३०॥ अथवागीतेंसुखठसावलें ॥ जेथेंगीतत्वहरपलें ॥ अंगेंअंगभरलें ॥ सुखचिसुखीं ॥ ३१ ॥ सुखेंचिसुखचेइलें ॥ गीतहेंमिसचिजालें ॥ सेखींसुखाचिसुखींभरलें ॥ गीतलोपें ॥ ३२ ॥ किंवा आरिसादेखिलेंमुख ॥ येथेंआरिसाजालाअप्रयोजक ॥ आपेआपमुख ॥ मुखींचिअसे ॥ ३३ ॥ आरिसादेखिलेंनावेक ॥ परीसंतोषासीमुखचिजनक ॥ यालागींआरिसियाचेलेख ॥ संतोषीं नाहीं ॥ ३४ ॥ किंवानावेकजेंनिदैलें ॥ तेंदुसरियानींजऱ्हींउठविलें ॥ तऱ्हींतेंव्यर्थजालें ॥ चेववि तेपण ॥३५॥ निःशेषजोनिदैला ॥ तोनवचेचिजागाकेला ॥ तस्मात्‌जागाचिजागाजाला ॥ हेंचि मुख्य ॥ ३६ ॥ अवघयाचातात्पर्यार्थु ॥ सिद्धचिअर्थसिद्धहोतु ॥ कार्यकारणाघातु ॥ नकरितां चिअसे ॥३७॥ ह्मणोनिसुखमात्रसच्चिदानंदु ॥ येथेंत्रिपदत्वेंजऱ्हींअनुवादु ॥ तरीप्रत्ययींबाधु ॥ शब्दासीजाला ॥ ३८ ॥ स्वरूपप्रत्ययमात्रचिअसे ॥ प्रत्ययचिप्रत्ययहोतसे ॥ येथेंशब्दशब्दत्वा सीरुसे ॥ सहजेंचिमौन ॥ ३९ ॥ फळेंबीजाचेनिमिसें ॥ पुष्पआणिलेंपुष्पदशे ॥ ह्मणोनिफलचि कारणअसे ॥ फळासीपैं ॥ १४० ॥ इत्यादिदृष्टांतेंकरूनी । कार्यचिसूचककारणीं ॥ ह्मणोनिचि कारणत्वाहानी ॥ सिद्धार्थीं ॥ ४१ ॥ यालागींदृष्टचिजालेंद्रष्टें ॥ सच्चिदानंदींचोखटें ॥ त्रिपदें लागलींवाटे ॥ मौनाचिया ॥ ४२ ॥ प्रत्ययाचेनिविलासें ॥ स्वरूपींपदत्रयहेंउल्हासे ॥ तेणेंचिप्र त्ययसमरसे ॥ स्वरूपप्रत्ययस्वरूपीं ॥ ४३ ॥ एवंसच्चिदानंदपदमिसें ॥ स्वरूपींस्वरूपचिसम रसे ॥ येथेंशब्दाचिलिहीपुसे ॥ सिद्धचिमौना ॥ ४४ ॥ ह्मणोनिदाऊनिद्रष्टयाद्रष्टा ॥ तिन्हींपदें मौनाचियावाटा ॥ लागलीनिजनिष्ठा ॥ स्वरूपाचिया ॥ ४५ ॥ अर्थींचिअर्थुभेटला ॥ शब्दुअश ब्दत्वेंउडाला ॥ येचिअर्थींपुढिला ॥ ओवियाअसती ॥ ४६ ॥

**जेंजेंबोलिजेतेंतेंनव्हे ॥ होयतेंतंवनबोलावें ॥ साउलीवरीन मववे ॥ मवितेंजैसें ॥ २६ ॥ मगआपलियाकडे ॥ मवितया सांपडे ॥ तैंलाजहिलाजोआखुडें ॥ मवितेंजैसें ॥ २७ ॥**

शब्दाअर्धींजेंआहे ॥ जेणेंशब्दत्वलाहे ॥ तेंकेवींहोऊनिराहे ॥ शब्दाचाविषय ॥ ४७ ॥ आतां जैंस्वरूपज्ञान ॥ तेथेंशब्दुचिनिमालासंपूर्ण ॥ ह्मणोनिशब्दनव्हेकारण ॥ प्रत्ययासी ॥ ४८ ॥ जरीशब्दुप्रत्ययासीसाधी ॥ तरीसाचनव्हेप्रत्ययसिद्धी ॥ स्वरूपप्रत्ययींअधीं ॥ बुडावाशब्दु ४९ शब्दाचेनिअनुमानें ॥ स्वरूपज्ञानजालेंह्मणणें ॥ जेवींसाउलीवरीमवणें ॥ स्वशरीरातें ॥ १५० ॥ साउलीवरीमवणेंघडे ॥ तैंसाउलीचिपैंनातुडे ॥ असतुचिभ्रंशींपडे ॥ आपेआपु ॥ ५१ ॥ मग स्मरणींचिजालेंविस्मरण ॥ साउलीचिनव्हेप्रमाण ॥ लाजेसीजाण ॥ लाजजाली ॥ ५२ ॥ आप लीसोयसांडिली ॥ तैंलाजहीपैंअंतरली ॥ लाजजेणेंधरली ॥ तोअंतरेकाह्या ॥ ५३ ॥ धरूनि साउलीचेंअनुमान ॥ नव्हेआपआपणाप्रमाण ॥ स्वतःसिद्धअसोन ॥ आपणस्वयें ॥ ५४ ॥ ते वींमानूनिशब्दप्रमाण ॥ जहालेंजैंतत्वज्ञान ॥ तोप्रत्ययचिजाण ॥ असंबद्ध ॥ ५५ ॥ ॥ आशंका ॥ जरीस्वरूपप्रत्ययाच्याठायीं ॥ शब्दप्रमाणनाहीं ॥ तरीमहावाक्यकाई ॥ अप्रमाण ॥ ५६ ॥ जरीमहावाक्यअसंबंध ॥ तरीगुरूवचनेंकैंचाबोध ॥ ऐसाजरीतर्कवाद ॥ कीजैलकोण्हीं ॥५७॥ तरीप्रत्ययाचीखूण ॥ महावाक्यचिस्वरूपपूर्ण ॥ येथशब्दींशब्दपण ॥ असेनापैं ॥ ५८ ॥ घटप टादिवादु ॥ तेथेंघटुचिनव्हेशब्दु ॥ जेथेंप्रमेयपरिच्छेदु ॥ वर्ततअसे ॥ ५९ ॥ यालागींअर्थेश ब्दाह्वनिभिन्न ॥ तरीशब्दींअसेशब्दपण ॥ महावाक्यतंवजाण ॥ ऐसेंनव्हे ॥ १६० ॥ महावाक्या चाअर्थ ॥ तेंमहावाक्यचिसमर्थ ॥ यालागींयेथ ॥ शब्दत्वनघडे ॥ ६१ ॥ महावाक्यहेंवचन ॥ गुरूच्याठायींमूर्तपण ॥ भाविजेतरीजाण ॥ अनुभवुकैंचा ॥ ६२ ॥ शब्दसारूनिबोलुजोजाण ॥ तेथेंकैंचेंबोलिकेपण ॥ हेअनुभवाचीखूण ॥ अनुभवामृतीं ॥ ६३ ॥ मागेंएकओवीअसे ॥ जेंप्रमे यपरिच्छेदेंप्रमाणनसे ॥ एवंस्वरूपप्रत्ययींकाइसें ॥ शब्दमात्रासीशब्दत्व ॥ ६४ ॥ तेथमहावा क्यहाशब्दु ॥ तर्कुचियेथेंअबद्धु ॥ असोआतांप्रबंधु ॥ प्रकरणार्थ ॥ ६५ ॥ आइतासच्चिदानंदु ॥ तेथेंप्रमाणनव्हेशब्दु ॥ प्रत्ययेंवीणअर्थवादु ॥ वाउगाहोय ॥ ६६ ॥ येऱ्हवींनसोनितिन्हीभाग ॥ सच्चिदानंदुचिअभंग ॥ उपचाराचालाग ॥ लागेनायेथें ॥ ६७ ॥ अधींत्रिविधभागमानिले ॥ मगयाचेंऐक्यदेखिलें ॥ ऐसेंनव्हेसंचलें ॥ आइतेंअसे ॥ ६८ ॥

**सत्ताचिस्वभावें ॥ असत्तातंवनव्हे ॥ मासत्तात्वनसंभवे ॥ सत्तेसीकाई ॥ २८ ॥ आणिअचिदाचेनिनाशें ॥ आलेंजेंचि न्मात्रदशे ॥ आतांचिन्मात्रचिमाकैसें ॥ चिन्मात्रींये ॥ २९ ॥ निद्प्रबोधाच्याठाई ॥ नसेतैसेंजागणेंही ॥ तेवींचिन्मात्र चिमाकाई ॥ चिन्मात्रियें ॥ ३० ॥ ऐसेंययासुखपणें ॥ नाहीं दुःखकीरहोणें ॥ मासुखहेंगणणें ॥ सुखासीकाई ॥ ३१ ॥**

स्वभावेंसत्ताअसे ॥ तेंतंवकदानभ्रंशे ॥ परंतुहेतुसरिसें ॥ संभवणेंनघडे ॥ ६९ ॥ आइतास च्चिदानंद ॥ यासीतंवसर्वथानघडेबाध ॥ तरीशब्देंकेवींसिद्ध ॥ करावेंयासी ॥ १७० ॥ आतांअ चिन्मात्राचानाशदेखावा ॥ मगआणावेंचिन्मात्रभावा ॥ तरीचिन्मात्रींस्वयमेवा ॥ अचिन्मा त्रकैंचें ॥ ७१ ॥ आतांअचिन्मात्रजरीनाहीं ॥ तरीशब्देंकीजेकायी ॥ असोनिठायठाई ॥ दशा हीन ॥ ७२ ॥ जेवींनिडारलेप्रबोधीं ॥ निद्राचिअसावीअधीं ॥ मगजागृतीयेहींशब्दीं ॥ जागृ तीमिरवे ॥ ७३ ॥ तेवींचिन्मात्रजेंआइतें ॥ अचिन्मात्रकैंचेंतेथें ॥ ह्मणोनिचिन्मात्रत्वातें ॥ चि

न्मात्रनेघे ॥ ७४ ॥ तैसेंचिनसोनिदुःखसंबंधु ॥ स्वसुखेंचिसुखसिद्धु ॥ तेथेंसुखासीसुखहेद्वंद्वु ॥ कासयाअसे ॥ ७५ ॥ स्वरूपसुखरूपअनादिवंत ॥ तेंअसेगणनेरहित ॥ एवंसच्चिदानंदसंबंधातीत ॥ नसोनिअसे ॥ ७६ ॥ स्वरूपमात्रचिअभंग ॥ येथेंशब्दींदिसतीतीनभाग ॥ तेचिवावयेर अव्यंग ॥ जैसेंतैसें ॥ ७७ ॥

**ह्मणोनीसदसदत्वेंगेलें ॥ चिदचिदत्वेंमावळलें ॥**
**सुखासुखजालें ॥ कांहींनाकीं ॥ ३२ ॥**

सदसदत्वाचेनिसदपणें ॥ शब्दशब्दत्वेंउरोंनेणें ॥ आतांसंदेहेंकोणें ॥ सदत्वाआणावें ॥७८॥ ह्मणोनीसदसदत्वेंनसे ॥ बोलिलातेंहेंऐसें ॥ तेवींचिन्मात्रत्वींनसें ॥ चिदत्वेंचिद् ॥ ७९ ॥ चिन्मात्राचेनिपूर्णपणें ॥ चिन्मात्रउमगावेंकोणें ॥ ह्मणोनिचिन्मात्रगणणें ॥ चिन्मात्रासी ॥१८० तैसेंचिसुखेंसुखत्वनेलें ॥ आतांकायबोलिजेबोलें ॥ दुःखेंवीणसंचलें ॥ आइतेंजें ॥ ८१ ॥ या सुखाचेंगणिजेस्वरूप ॥ तरीगणनाचीसुखरूप ॥ येथेंसहजचिलोप ॥ गणनेसीजाला ॥ ८२ ॥ किंवासत्तादिकांचेनिनित्यपणें ॥ असतादिभावउपजोंचिनेणें ॥ मगरूपासीचिनघडेयेणें ॥ सत्तादिकां ॥ ८३ ॥ आतांक्रियाआणिउगेपण ॥ यादोहिंसीगाळून ॥ सुखासुखनसोन ॥ सुखरूप चिजें ॥ ८४ ॥

**आतांद्वंद्वाचेलवंचक ॥ सांडूनिदुणीचेकंचुक ॥ सुखमात्रचि**
**एक ॥ स्वयेंआथी ॥ ३३ ॥ वरीएकपणेंगणिजे ॥ तेंगणितेंन**
**सीदुजें ॥ ह्मणोनिहेंनगणिजे ॥ ऐसेंएक ॥ ३४ ॥**

आतांसुखदुःखद्वंद्वनघडे ॥ मासुखकायसुखत्वेंवाढे ॥ यालागींदुणीनाद्वंद्वपाडे ॥ नव्हेजेंएक ॥ ८५ ॥ सुखरूपींदुःखहेंलवंचक ॥ हेंनाहींह्मणोनिसुखमात्रचिएक ॥ किंवादुणीचेकंचुक ॥ हेंही नाहीं ॥ ८६ ॥ ह्मणिजेलाधतांयासुखरूपासी ॥ वृद्धिनाहींज्यासुखासी ॥ पूर्वआणिअपरतेसी ॥ देखिलेंनाहीं ॥ ८७ ॥ लाधतांयासुखाचीगोडी ॥ हरपलीवृद्धिक्षयाचीपरवडी ॥ कांजेकाळाचीसवडी ॥ नपडेयेथें ॥ ८८ ॥ तस्मात्सुखदुःखातीत ॥ वृद्धिक्षयाविरहित ॥ गणनाविवर्जित ॥ जेंकांहींअसे ॥ ८९ ॥ श्रुतिः ॥ नकर्मणालिप्यतेपापकेननवर्धतेनोकनियान् ॥ एवंएकपणजेंऐसें ॥ तेंगणावयाचेनिदोषें ॥ दुजेंकैंचेंअसे ॥ एकपणींइये ॥ १९० ॥ ह्मणोनियेथेंगणनेवीण ॥ एकचि असेएकपण ॥ एवंगणनायेथेंशून्य ॥ वांचूनिअसणेंचिअसे ॥ ९१ ॥

**सुखआंतोनिनिघणें ॥ तेंसुखियेसुखेतेणें ॥ हेंसुखमा**
**त्रचिमाकोणें ॥ अनुभवावें ॥ ३५ ॥**

ज्यासुखासीसंभवआहे ॥ तेणेंसुखेंसुखीकोण्हीहोये ॥ परंतुस्वतःसिद्धसुखमात्रींइयें ॥ संभउचिनाहीं ॥ ९२ ॥ तेधर्मुधर्मित्वविहीन ॥ निखळसुखमात्रचिपूर्ण ॥ तेणेंसुखेंकरून ॥ सुखियाकवणु ॥ ९३ ॥ एकसुखियाएकसुख ॥ हेंद्वंद्वनाहींजेथेंदेख ॥ तयासुखाचेलेख ॥ करवी कवणें ॥ ९४ ॥ तयेसुखमात्रींअभंगे ॥ दिठीकोणाचीनलगे ॥ वाचाराहावयाजोगें ॥ नाहींजें सुख ॥ ९५ ॥ एवंग्राह्यग्राहकतेवीण ॥ सुखमात्रचिअभिन्न ॥ ह्मणोनियांसुखासीसुखपण ॥ नसोनिअसे ॥ ९६ ॥

**जैंप्रकृतिडंकुअनुकरे ॥ तैंप्रकृतिडंकेअवतरे ॥ माडंकुचितैं भरे ॥ कोणकोणा ॥ ३६ ॥ तैसेंआपुलेनिसुखपणें ॥ नाहींज यासुखावणें ॥ आणिनाहींहेंहीजेणें ॥ नेणिजेसुखें ॥ ३७ ॥**

डंकुसंबंधींनादु ॥ तोप्रकृतिडंकुऐसाशब्दु ॥ याडंकाचासंबंधु ॥ प्रकृतीसीघडे ॥ ९७ ॥ मग डंकाचेघोषगति ॥ अवतरोंलागेप्रकृति ॥ मागुतीतेडंकुनिवृत्ति ॥ निवांतराहे ॥ ९८ ॥ मगते प्रकृतीचेनिअभावें ॥ डंकुतोअडंकुनव्हे ॥ परीअवतरणेंचिनसंभवे ॥ कोण्हासीतेथें ॥ ९९ ॥ तैसेंसुखमात्रचिजेंपूर्ण ॥ तेणेंसुखीहोईलपैंकोण ॥ परीसुखआपुलेंसुखपण ॥ नसंडीकधीं २०० सुखाचेनिसद्भावें ॥ सुखींसुखत्वनसंभवे ॥ परीआपणचिअभिभवे ॥ हेंतंवनघडे ॥ १ ॥ हेंएक लेंदिसेसुखवाचक ॥ परीसच्चिन्मात्रहेंचिएक ॥ शब्दाचेंकंचुक ॥ फिटोनिआहे ॥ २ ॥ सुखासु खद्वंद्वनाहीं ॥ एकलेंसुखचिअसेपाहीं ॥ आतांऐशियेठायीं ॥ अभावकैंचा ॥ ३ ॥ सुखासुखद्वंद्व नाहीं ॥ एकलेंसुखचिअसेपाहीं ॥ सुखसुखातेंही ॥ सुखजेणें ॥ ४ ॥

**आरिसानपाहतांमुख ॥ स्वयेंसन्मुखनाविन्मुख ॥ तेवींनसोनिसुखासुख ॥ सुखचिजें ॥ ३८ ॥**

आरिसानपाहतां ॥ नघडेमुखाचीसन्मुखता ॥ तरीकायविमुखता ॥ मुखाचीमुखा ॥ ५ ॥ स्वतासन्मुखनाविन्मुख ॥ तरीअभावानयेचिमुख ॥ तेवींनसोनिसुखासुख ॥ सुखमात्रजें ॥ ६ ॥ येथेंनसतांहेतूदर्पण ॥ नबिंबेआपणयाआपण ॥ तरीसुखचिनाहींजेंजाण ॥ घडेलकायी ॥ ७ ॥ यासुखमात्रसंधीअसावा ॥ मगसुखत्वेंआणावेंभावा ॥ नित्यानंदस्वभावा ॥ भावनानरिघे ॥ ८ ॥ आतांस्वतःसिद्धासिद्धांतकीजे ॥ मगसुखहेंरूपाआणिजे ॥ ऐसेंनाहींसहजें ॥ आपण चिअसे ॥ ९ ॥

**सर्वसिद्धांताचियाउजरिया ॥ सांडूनियांनिदसुरिया ॥ आपलियाहाताचोरिया ॥ आपणचिजो ॥ ३९ ॥**

स्वरूपींपूर्वपक्षचिनाहीं ॥ तेथेंसिद्धांतायेईलकायी ॥ आतांसिद्धांतेंपाडिजेठायीं ॥ तेंतेंनव्हे ॥२१०॥ स्वरूपजेंआपुलें ॥ तेंउपपत्तीनेंसिद्धकेलें ॥ तरीउपपत्तीसीप्रकाशिलें ॥ कवणेंपाहें॥११ आतांजरीउपपत्तिसिद्धकेलें ॥ तऱ्हींस्वरूपतंवहोयआपुलें ॥ हेंनचुकेपरीजालें ॥ निदसुरिया ऐसें ॥ १२ ॥ सिद्धअसोनिअन्यथाजाला ॥ मगआपआपणाभेटला ॥ तेव्हांविसरुनव्हेसंचला ॥ नाआठउहीनव्हे ॥ १३ ॥ निद्राजेजागृती ॥ तेनिदसुरेऐसेंह्मणती ॥ तेवींआपणासीसिद्धांतीं ॥ साधोनघ्यावें ॥ १४ ॥ मुळींअन्यथानाहींजाला ॥ ह्मणोनिविसरुविसरींबुडाला ॥ मगआठउ निमाला ॥ आठवामाजीं ॥ १५ ॥ तेथेंजोजोसिद्धांतकीजे ॥ तोनिदसुराऐसेंजाणिजे ॥ स्वरूप सिद्धांताआणिजे ॥ ऐसेंनाहीं ॥ १६ ॥ आपल्याठायींआपण ॥ असेआपणयाचोरून ॥ आतांते थेंकायशून्य ॥ ह्मणोंयेपां ॥ १७ ॥ स्वताचिजेंकींसिद्ध ॥ तयाकायद्योतीलशब्द ॥ निखळसच्चि दानंद ॥ नसोनिअसे ॥१८॥ आपलेंआपणग्रहण ॥ नकरितांअसेजेंजाण ॥ ह्मणिजेहेतूविहीन ॥ चोरिलेंअसे ॥ १९ ॥ नलगतांहेतूचाहात ॥ स्वयेंचिअसेजोसिद्धांत ॥ तेचिअसतांहातेंहात ॥ चोरलेदेखा ॥२२०॥ तेंकैसेंहेंघेवोंजातां ॥ जंवसिद्धांतचिराहेरिता ॥ आणिअस्तिक्यतेसीतंवअ न्यथा ॥ होऊंनसके ॥ २१ ॥ ह्मणोनिचोरूनिचिआहे ॥ तेंयेणेंअभिप्रायें ॥ परंतुअभावासीनये ॥

नसोनिचिअसे ॥ २२ ॥ तेचिअसोनियांनसती ॥ कैसीपांअसेरीति ॥ पुढेंइयाउपपत्ति ॥ बोलिलाअसे ॥ २३ ॥

**नलवितांऊंस ॥ तोजैसेनिअसेरस ॥ तेथींचामिष्टांश ॥ तोचिजाणे ॥ ४० ॥ कांनसज्जितांवीणा ॥ तोंनादजोआबोलणा ॥ तयातेणेंचिजाणा ॥ होआवेंलागे ॥ ४१ ॥ नानापुष्पांचियाउदरा ॥ नयेतांपुष्पसारा ॥ आपणचिभवरा ॥ होआवेंपडे ॥ ४२ ॥ नानानरंधितांरससोये ॥ तेगोडीकैसीपांआहे ॥ हेंपहाणेंतेंनोहे ॥ आणीकाजोगें ॥ ४३ ॥ तैसेंसुखपणायेवों ॥ लाजेआपुलेंसुखपावों ॥ तेंआणीकाचाखोसुवों ॥ येईलकायी ॥ ४४ ॥**

ऊंसनसतांरसुअसे ॥ तेचिगोडीउंसींप्रवेशे ॥ परीउंसाचेनिनसे ॥ रसपणरसीं ॥ २४ ॥ तोरसपणेंवीणरसु ॥ त्याचातोचिचाखेमिष्टांशु ॥ तेवींग्राह्यग्राहकतेवीणचिद्रसु ॥ नसोनिअसे२५ किंवाअनादिजोअसेनादु ॥ जेणेंवीणाउमटेशब्दु ॥ तोजरीनव्हेविशदु ॥ श्रोत्रांसीविषय॥२६॥ तोवीणाजरीनवाजे ॥ तऱ्हींआपआपणासीगाजे ॥ तेथीलश्रोत्रहोइजे ॥ तयाचेंतेणें ॥ २७ ॥ आपआपणासीजाणु ॥ तोनादुपैंविचक्षणु ॥ अभावासीहीग्रासुनु ॥ राहिलाअसे ॥ २८ ॥ परिमळुजोपुष्पसार ॥ जोनसतांपुष्पअसार ॥ जेणेंद्योतिलेंनिपरिकर ॥ बहकेपुष्प ॥ २९ ॥ जेथेंपुष्पआहेनाहीं ॥ हेवार्तानसेकांहीं ॥ तेथिंचाभ्रमरूपाहीं ॥ तोचिहोये ॥२३०॥ ह्मणिजेभोग्यभोक्ता तोचित्याचा ॥ संबंधुनसेआणीकाचा ॥ एवंत्याआमोदाचा ॥ अभावनघडे ॥ ३१ ॥ पुष्पसंबंधीअसतां ॥ तरीपुष्पनाशेतोननाशता ॥ एवंपुष्पेंवीणआइता ॥ स्वताचिअसे ॥ ३२ ॥ तेवींचिरसुजोअधीं ॥ जेणेंपाकासीयेस्वादसिद्धि ॥ तोतयातेंनरंधी ॥ परीस्वादींनचुके ॥ ३३ ॥ तोपदार्थनाशेंनासता ॥ तरीदुसरेपदार्थींकोठूनअसता ॥ ह्मणूनिरूपेंवीणआयितां ॥ असतुचिअसे ॥ ३४ ॥ त्याचीतोदेतसेगोडी ॥ परीघेणेंनघेणेंदेशधडी ॥ तेवींनसोनिपरवडी ॥ सुखमात्रजें ॥ ३५ ॥ जेंसुखपणाअधींअसे ॥ जेणेंसुखऐसेंप्रकाशे ॥ जेथेंसुखासुखपणनसे ॥ माभोगिजेकोणें ॥ ३६ ॥ एवंकरणियावीण ॥ जेंएकलेंचिन्मात्रपूर्ण ॥ तेंचाखावेंघ्यावेंकवणेंजाण ॥ तेंचितेंह्मणोनी ॥ ३७ ॥ तस्मात्‌रूपारूपविहीन ॥ चिन्मात्रस्वरूपपूर्ण ॥ शब्दासीहीसारून ॥ नसोनिअसे ॥ ३८ ॥

**दिहाचियादुपारीं ॥ चांदुजैसाअंबरीं ॥**
**तेंअसणेंचांदाचिवरी ॥ जाणावेंकीं ॥ ४५ ॥**

दिवसादोंप्रहरां ॥ आकाशींचंद्रमाखरा ॥ परीदेखावानेत्रद्वारा ॥ ऐसानव्हे ॥ ३९ ॥ तेंचंद्राचेंअस्तिक्यपण ॥ चंद्रचिअसेजाण ॥ जऱ्हींनदेखतीनयन ॥ जनाचेतया ॥ २४० ॥ तेवींवस्तुवांचूनिकांहीं ॥ असणयाउरीनाहीं ॥ आतांकोणापडेठायीं ॥ असणेंतेथींचें ॥ ४१ ॥ तऱ्हींसुखमात्रजेंआहे ॥ तेंतंवनाहींनव्हे ॥ नघेतांचिसोये ॥ असेजेंपैं ॥ ४२ ॥ स्वप्रकाशेंप्रकाशमान ॥ तेथेंअनुद्योतिलकवण ॥ विषयविषयीविहीन ॥ स्वतांचिजेंअसे ॥ ४३ ॥ तेंकैसेंअसे ॥ तेंमागुतें

सांगतुसे ॥ अनुभवाचेनिपैसें ॥ जाणोनिघ्यावें ॥ ४४ ॥ घेणयादेणयावीण ॥ अनुभविजेऐशी खूण ॥ हेंअसोआतांनिरूपण ॥ अवधारिजोजी ॥ ४५ ॥

**रूपनाहींतैंलावण्य ॥ अंगनुठीतैंतारुण्य ॥ क्रियानफुटेतैं पुण्य ॥ कैसेंअसे ॥ ४६ ॥ जैंमनाचाअंकुरनुपजे ॥ तेथिलेंनि मकरध्वजें ॥ तोचिहृनमाजे ॥ तरीचिघडे ॥ ४७ ॥ कांवाद्य विशेषाचीसृष्टि ॥ जैंजन्मनेघेदृष्टि ॥ तैंनादुऐसीगोष्टी ॥ नादाचिजोगी ॥ ४८ ॥ नानाकाष्ठांचियाविटाळा ॥ वोस रलियाहीअनळा ॥ लागणेंकेवळा ॥ अंगासीचि ॥ ४९ ॥ दर्पणाचेनिनियमें ॥ वीणचिमुखप्रेमें ॥ आणितीतेचिवर्में ॥ वर्मतीयेणें ॥ ५० ॥ नपेरितांपीकजोडे ॥ तेमुडाचिआहेरो कडें ॥ ऐसियासोईउघडे ॥ बोलणेंहें ॥ ५१ ॥ एवंविशेषसा मान्य ॥ दोहींनातळेचैतन्य ॥ तेंभोगिजेअनन्य ॥ तेणेंसी सदा ॥ ५२ ॥**

रूपाअधींलावण्य ॥ जेणेंलावण्यरूपशोभायमान ॥ तेंरूपेंवीणआपण ॥ आपणपेंअसे ॥४६॥ किंवाशरीराअधींतारुण्य ॥ तरुणकाळींतरुणजेणेंकरून ॥ जेवींवर्षाकाळपावतांजाण ॥ मेघ वृष्टि ॥ ४७ ॥ तेणेंशरीरअसतांनसतां ॥ त्याचीत्यासीचतरुणता ॥ शरीरभाववृथा ॥ त्याच्या ठायीं ॥ ४८ ॥ अथवाकेलेंनिधर्माचरण ॥ फळासीनेतसेजेंपुण्य ॥ तेंधर्मोपार्जितनव्हेजाण ॥ अधींचिअसे ॥ ४९ ॥ आपेंआपपुण्यवंत ॥ याअर्थासीजेंनढळत ॥ क्रियाकरणेंतेथें ॥ आगमा पायी ॥२५०॥ किंवामदनुजोजाण ॥ जेणेंमदेंउन्मत्तपण ॥ आतांमनजैंविकारहीन ॥ तैंहीअसे जो ॥ ५१ ॥ तोआपुलेनिअंगबळें ॥ मन्मथहेंतंवनटळे ॥ कीजेलकायमनमेळे ॥ उन्मत्तत्यासी ॥५२॥ किंवावाद्याचेनिअभावें ॥ पाहेंनादाअंगींनादुआहे ॥ वाद्याचेनिनव्हे ॥ वाजणाजो ॥५३॥ तऱ्हींवाद्याचेनिवाजणादिसे ॥ परंतुवाद्यत्वाचेनिवाजतअसे ॥ आणिवाद्यनसतांअभावनसे ॥ नादपणासीत्याचे ॥५४॥ किंवाकाष्ठस्पर्शजैंनाहीं ॥ तैंअग्निचिनसेलकायी ॥ तोआपुल्याठायीं ॥ अग्नित्वेंचिअसे ॥ ५५ ॥ परीआपुलेउष्णत्वेंकरून ॥ संतप्तनव्हेतोजाण ॥ हेंचिनाहींवांचून ॥ जैसातैसा ॥ ५६ ॥ किंवानशिवतांदर्पण ॥ मुखप्रेमाअसेभोगेंवीण ॥ भोग्यभोक्तृत्वविहीन ॥ मुखप्रेमाअसे ॥ ५७ ॥ दर्पणाचेनिमिसें ॥ तोचिप्रेमास्पष्टहोतसे ॥ तऱ्हींदर्पणकारणनसे ॥ मुखप्रेमेसीं ॥ ५८ ॥ हेंवर्महाताचढे ॥ तैंदर्पणजालाचिकारणनघडे ॥ ऐसियेनिसुरवाडे ॥ बोलिलाअसे ॥ ५९ ॥ दर्पणव्याजेंमुखजालें ॥ हेंतंवअवघेंयेथेंक्रमलें ॥ तेंप्रेमअसेसंचलें ॥ दर्पणा अधीं ॥२६०॥ जऱ्हींदर्पणमिसेंजालें ॥ तऱ्हींदर्पणव्याजक्रमलें ॥ जेव्हांवर्मसांपडलें ॥ संचलेंप णाचें ॥ ६१ ॥ मुखप्रेमेसीप्रसवलें ॥ कींप्रेमेसीमुखआवडलें ॥ हेंवर्मजैंजाणितलें ॥ तैंप्रेमेसीप्रे मा ॥ ६२ ॥ किंवापेरणीवीण ॥ पीकपिकलेंचिअसेआपण ॥ तेंजरीपाहिजेजाण ॥ तरीमुडाचि असे ॥ ६३ ॥ जेंजेंपेरणीअधींचिअसे ॥ पेरणीजेणेंप्रकाशे ॥ पेरणीदोषें ॥ फळत्वानयेपैं ॥ ६४ ॥ एवंअसतेपणेंवीण ॥ असेचिन्मात्रैकघन ॥ येथेंदृष्टांतउपलक्षण ॥ मात्रकेलें ॥ ६५ ॥ येथेंदृष्टांत

हेमिस ॥ परीसंबंधेंवीणचिद्रस ॥ जेणेंसकळसंबंधास ॥ द्योतिलेंअसे ॥ ६६ ॥ तेंचिलावण्या चेंलावण्य ॥ तेंचितारुण्याचेंतारुण्य ॥ पुण्याचेंपुण्य ॥ अकृत्रिम ॥ ६७ ॥ तोचिरसाचारस ॥ नादींनादतोचिसुरस ॥ एवंजेणेंसकळास ॥ सकळपण ॥ ६८ ॥ श्रुतिः ॥ येनवापश्यतियेन वाश्रृणोति ॥ येनवागंधानाजिघ्रतियेनवाचंकरोतियेनवास्वादुविजानाति ॥ इत्यादि ॥ ॥ येन शब्दंरसंरूपंगंधंजानासिराघव ॥ तमात्मानंपरंब्रह्मजानीहिपरमेश्वरं ॥ ॥ एवंसकळांचेंअधि ष्ठान ॥ जेथूनिसकळासीसकळपण ॥ परीसकळनहोनिआपण ॥ सकळींअसे ॥ ७९ ॥ जेथेंस कळींसकळत्वनसे ॥ ऐसेंहीतेंचिअसे ॥ सकळसकळत्वेंदिसे ॥ तऱ्हींयेकुचिअंशु ॥ २७० ॥ ए कांशेनस्थितोजगत् ॥ इतिभगवद्वचनं ॥ एवंसंबंधेंवीण ॥ असेपूर्णचिद्धन ॥ विशेषआणिसामा न्य ॥ दोहींसीअगाध ॥ ७१ ॥ तयाचाभोगुत्यासीचिअसे ॥ तेथेंधर्मूधर्मित्वचिनसे ॥ परंतुस्व खरूपींनरूपशें ॥ विलोपुकधीं ॥ ७२ ॥ स्वविलासेंविलासमान ॥ परंतुनचुकेजेथिंचेंएकपण ॥ चिद्विलासपरिपूर्ण ॥ हेलावतअसे ॥ ७३ ॥ इंद्रियद्वाराक्रियाभान ॥ वर्ततांदिसेअनान ॥ परंतु तेंइंद्रियसंबंधेंवीण ॥ चिन्मात्रैक ॥ ७४ ॥ जेणेंरसाचेंस्वादन ॥ तेणेंचिगंधाचेंग्रहण ॥ रूपातें अवलोकितजाण ॥ एकिचिकळा ॥ ७५ ॥ तेंचिशब्दातेंशब्दवित ॥ तेथेंचिस्पर्शेहीउमटत ॥ एवं विभागेनपवत ॥ विभागांतें ॥७६॥ पावतांतेथिंचीखूण ॥ तेंसगळेंचिविरेहेंभान ॥ तेथेंशब्दुतो जाण ॥ किमात्मक ॥७७॥ नव्हेविषयनाविषयी ॥ शब्दुचिनसेजयेठायीं ॥ परंतुआपणयाकधीं ही ॥ लोपातेंनपवी ॥ ७८ ॥ येथेंसरलाशब्दुजाण ॥ तरीकांपडेलमौन ॥ वरीमौनासीहीमौन ॥ जाणपडतसेयेथ ॥ ७९ ॥ हाचिभावधरून ॥ अवधाराअग्रेंमूळवचन ॥ हेअनुभवाचीखूण ॥ अ नुभवेंघ्यावी ॥ २८० ॥

**आतांयावरीजेंबोलणें ॥ तेंयेणेंचिबोलेंशहाणें ॥**

**जेंमौनाचेंहीनिपटणें ॥ पिऊनिगेलें ॥ ५३ ॥**

स्वरूपींबोलुचिनसे ॥ तरीहाचिबोलुकैंचादिसे ॥ हेंमानेलह्मणोनिऐसें ॥ बोलिलाअसे॥८१॥ आतांहेंजेंबोलणें ॥ तेंयेणेंचिबोलेंशहाणें ॥ ह्मणोनिप्रत्ययेयाचेखूणें ॥ हरपेबोलु ॥ ८२ ॥ प्रत्य याचेपूर्णत्वेंजाण ॥ शब्दींचिनुरेशब्दपण ॥ तेथेंमौनआणिबोलकेपण ॥ दोन्हींहीनसती ॥ ८३ ॥ शब्दासीदेखोनिमौन ॥ तरीमौनींचिउठेशब्दपण ॥ तस्मात्अनुभवाचीखूण ॥ अनारिसीअसे ॥ ८४ ॥ मौनाचेंनिपटणेंजाण ॥ ह्मणिजेसरलेंजेथेंमौन ॥ तेंसरलेहीपण ॥ प्रत्ययींनुरे ॥ ८५ ॥ आतांप्रमाणेंकाजजाणावें ॥ प्रमेयत्वकोणेंघ्यावें ॥ पुढेंयाचिभावें ॥ बोलणेंअसे ॥ ८६ ॥

**एवंप्रमाणेंअप्रमाण ॥ दृष्टांतींवाइलीआण ॥ प्रमेयकेलेंअप्र माण ॥ दिसावयाची ॥ ५४ ॥ अंगाचियाअनुपपत्ति ॥ आ टलियाउपपत्ति ॥ येथेंउठिलींपांथीं ॥ लक्षणांची ॥ ५५ ॥ उपायमागीलपाय ॥ घेऊनिजालेंवाय ॥ प्रतीतिसांडिली सोय ॥ प्रत्ययाची ॥ ५६ ॥ येथेंनिर्धारेंसीविचारू ॥ निमो निजालासारू ॥ स्वामीच्यासंकटींशूरू ॥ सुभटुजैसा ॥५७॥ नानानाशुसाधूनिआपुला ॥ बोधुबोधेलाजिला ॥ नुसुधे पणेंथोंटावला ॥ अनुभउजेथ ॥ ५८ ॥**

नाहींजेथेंज्ञानाज्ञान ॥ दृश्यमात्रजेंदृष्टेपण ॥ तेथेंप्रमाणकरीकोण ॥ आणिप्रमेयतेंकाई ॥ ८७ ॥ येथेंजरीकरावेंप्रमाण ॥ तरीप्रमेयासीपडेशून्य ॥ आतांप्रमेयचिजरीपूर्ण ॥ तरीप्रमाणनुरे ॥८८॥ स्वरूपजेणेंजाणिजे ॥ तेंजाणणेंचिस्वरूपसहजें ॥ तरीप्रमाणासीदुजें ॥ प्रमेयकैंचें ॥ ८९ ॥ जरी प्रमेयत्वनघडे ॥ तरीप्रमाणत्वसहजेंचिबुडे ॥ आतांस्वरूपासांगडे ॥ स्वरूपचिअसे ॥ २९० ॥ ऐसेंप्रमेयप्रमाणातीत ॥ तेथेंदुजयाचानिःशेषनिःपात ॥ तेथेंद्यावादृष्टांत ॥ कोठूनिकोणा ॥९१॥ स्वताचिजेअनुपपत्ति ॥ तेथेंकैंच्याअसाव्याउपपत्ति ॥ सहजचितेंदृष्टांतीं ॥ साधणेंसरलें॥९२॥ उपपत्तिह्मणिजेउपचार ॥ स्वरूपींनसेनिरंतर ॥ आतांवेगळीचिथार ॥ उपचाराकैंचि ॥ ९३ ॥ एवंस्वरूपींउपपत्तिनाहीं ॥ तरीनिपजाव्याकोणेंठाईं ॥ नाटिताचीपाहीं ॥ निमाल्याअसती ॥ ९४ ॥ केवळजेंचिन्मात्रपूर्ण ॥ तेथेंकायिसेंपैलक्षण ॥ आणिअंगेंचिसिद्धजाण ॥ ह्मणोनिउ पायाहानी ॥ ९५ ॥ स्वरूपउपायाचेंआद्य ॥ स्वताचिअसेजेंसिद्ध ॥ तेंउपायासीसाध्य ॥ होईल कैसें ॥ ९६ ॥ त्यास्वमूळाससांडोन ॥ घेतलेंउपायींरान ॥ मगनिहाळितांनिजात्मखूण ॥ पर तलेउपाय ॥ ९७ ॥ नानापरतलेकायी ॥ निमोनिचिगेलेंठायीं ॥ निखळप्रत्ययोचिप्रत्ययीं ॥ पुंजा ळलापैं ॥ ९८ ॥ आतांस्वताचिजेप्रत्ययमात्र ॥ तेथेंकेउतेंप्रतीतिचित्र ॥ दुजेनवीणस्वतंत्र ॥ आपणचिअसे ॥ ९९ ॥ पहातांप्रत्ययाचीसोये ॥ प्रतीतिचिप्रत्ययोआहे ॥ ह्मणोनिपोटींरिघोनि पाये ॥ राहिलीप्रतीति ॥ ३०० ॥ येथेंविचारुअसारजाला ॥ जैंविचारणामुकला ॥ तोविचारु चिपरीबोला ॥ भागुनाहीं ॥ १ ॥ जेवींमहाशूरजोकोण्ही ॥ आपणवेंचोनिरणरंगणी ॥ आपणा सीसुभटत्वआणी ॥ जनांमाजीं ॥ २ ॥ स्वामीच्यामृत्युसंकटीं ॥ आपणबैसोनिमृत्युपाठीं ॥ मगवाणिजेवोटी ॥ भलाभलाह्मणोनी ॥ ३ ॥ तेवींजेणेंविचारें ॥ अंगेंविचारुचिविरे ॥ नसोनि सरलीअसारे ॥ सारपणेंज्याचें ॥ ४ ॥ मुळींअसारचिनाहीं ॥ यालागींसारणेंनलगेकांहीं ॥ ह्मणोनिविचारेवीणपाहीं ॥ विचारुसारू ॥ ५ ॥ अंगनमिरवीविचारु ॥ ह्मणोनिहाविचारुसारु॥ मुरडलानिर्धारु ॥ निर्धार्यैवीण ॥ ६ ॥ तेवींचिबोधुनयेबोध्यदशे ॥ थितयाबोधपणासीचिरुसे॥ आतांअनुभउमात्रचिअसे ॥ अनुभव्यहीन ॥ ७ ॥ ह्मणोनिअनुभउथोंटावला ॥ अंगेंअंगींचिभ रला ॥ पूर्वापरतेचागेला ॥ पांगुआतां ॥ ८ ॥ स्वरूपमात्रींकायसांडावें ॥ मगसांडूनिकायमां डावें ॥ येथेंसांडणेंमांडणेंचिनव्हे ॥ येरजैसेंतैसें ॥ ९ ॥ हेचिअनुभवाचीखूण ॥ अनुभवींनुरे जालेपण ॥ पूर्वदशेतेंजाण ॥ देखिलेंनाहीं ॥ ३१० ॥ अपरअनुभाव्यकांहींएक ॥ तेंअनुभउचि आपणअनुभाविक ॥ ऐसेंतंवयेथेंदेख ॥ उपजलेंनाहीं ॥११॥ एवंजडभागातेंसांडावें ॥ अजडा नुभवेंअजडव्हावें ॥ हेंसांडीमांडीनसंभवे ॥ स्वरूपींइयें ॥ १२ ॥ येथेंजडभागसांडिजेकांहीं ॥ तरीअजडत्वासीभेटीचिनाहीं ॥ येविषयींपुढेंपाहीं ॥ बोलिलेंअसे ॥ १३ ॥

**भिंगाचियाचडळा ॥ पदराचापुंजवेगळा ॥ करितांजैसा निफळा ॥ अंगाचाहोय ॥ ५९ ॥ कांगजबजिलाउबा ॥ पांगु रणेंकेळीचागाभा ॥ सांडीतव्हेळींउभा ॥ कैंचाकीजे ॥६०॥ तैसेंअनुभाव्यअनुभाविक ॥ इहींदोहींअनुभूतिक ॥ तेंगेलि याकैंचेएक ॥ एकासीचि ॥ ६१ ॥**

भिंगाचेंशुद्धत्वपहावया ॥ पदरटाकिजतीकाढूनियां ॥ मगभिंगासीअसावया ॥ ठावोचि नाहीं ॥ १४ ॥ जंवजंवकाढावेपदर ॥ पुढेंपुढेंपदराचाचिथार ॥ मगकैंचेनिरोपचार ॥ उरेभिंग

त्वेंअसे ॥ ३१ ॥ तेवींब्रह्मींअविद्यानाहीं ॥ हेंजनतोंनेणेंकांहीं ॥ जनबुद्धितंवपाहीं ॥ साचचिह्म णोंये ॥ ३२ ॥ तरीअविद्येचाहीध्वनि ॥ उगाचिआहेजनीं ॥ परीविचाराचाकानीं ॥ आइकोंनये ॥ ३३ ॥ सूर्यासीअस्तमान ॥ हेंकायविचारूनिबोलतीजन ॥ तेवींनसतीवार्ताजाण ॥ अवि द्याऐसी ॥ ३४ ॥ सूर्याचाअस्तुदेखेचक्षु ॥ तरीचक्षुसीसूर्याचाचपक्षु ॥ कांजेनेत्रींअध्यक्षु ॥ नांदतोसूर्य ॥ ३५ ॥ असोसूर्यजेणेंप्रकाशवंत ॥ त्यासीतंवनाहींअस्त ॥ जेणेंप्रकाशेंदेखिजेत ॥ सूर्याचाअस्त ॥ ३६ ॥ तेणेंचिनेत्रदेखणें ॥ बुद्धिहीदेखणीतेणें ॥ तोसूर्यआत्माजेणें ॥ चराचरर चियेलें ॥ ३७ ॥ श्रुतिः ॥ सूर्यआत्माजगतस्तस्थुषश्च ॥ इति ॥ ॥ असोसूर्याच्याठायीं ॥ रात्री चाउगउनाहीं ॥ ह्मणोनिरात्रीविषयीं ॥ अप्रयोजक ॥ ३८ ॥ तेवींचिदादित्युएकला ॥ असेनुग वतचिउगवला ॥ तयाचाचित्किर्णीशिवतला ॥ वर्ततोलोकु ॥ ३९ ॥ परीतोलोकाचीनेणेकाह्मा णी ॥ तेथेंकेउताअविद्येचाध्वनि ॥ आतांनसतियेनासोनि ॥ शब्दुकायीमिरवे ॥ ४४० ॥ असो उदयअस्तेंवीण ॥ चित्सूर्यदेदीप्यमान ॥ तेथेंअविद्यातमासीजाण ॥ सिद्धीचिनाहीं ॥ ४१ ॥ तेणेंचितेंजेंजाणा ॥ नावेकशब्दुदेखणा ॥ परीअविद्येच्यानाहींपणा ॥ देखेलकाई ॥ ४२ ॥ ह्मणो निसिद्धांचेनिराजे ॥ पुढेंप्रबंधाचेनिव्याजें ॥ बोलिलेंअसेवोजें ॥ अवधानद्यावें ॥ ४३ ॥

**दिठीपाहातांकायनफवे ॥ परीनिदेतेंतंवनदेखवे ॥**
**चेतांतेंनसंभवे ॥ ह्मणोनिया ॥ ६५ ॥**

निद्राकाळींनिद्रानदेखे ॥ माप्रबोधींकायदेखे ॥ ह्मणोनिनिद्रापाहातांपारुखे ॥ पाहा पण ॥ ४४ ॥ दिठीदेखणीभली ॥ परीनिद्रनाहींदेखिली ॥ तेवींअविद्याबोली ॥ साचपणानपवे ॥४५॥ एवंदेखणयांनिद्नाहीं ॥ तेवींशुद्धास्वरूपाचाठाईं ॥ नसेअविद्याहेकायी ॥ बोलेंहोये ॥४६ ॥

**चकोरांचीयाउद्यमा ॥ लटिकेपणाचीसीमा ॥**
**जरीदिहाचिचंद्रमा ॥ गिवसूंबैसे ॥ ६६ ॥**

दिवसाचाठायीं ॥ चंद्रींचंद्रिकाचिनाहीं ॥ माचकोरींठायी ॥ सेवावेंतेथें ॥ ४७ ॥ चंद्रिका पिऊनिचकोरें ॥ जरींअतिशयअसतीचतुरें ॥ परीनसतेंचंद्रकरें ॥ सेवितीकायी ॥ ४८ ॥ ते वींशब्दाचेंशब्दपण ॥ अविद्यानाशींव्यर्थजाण ॥ पुढेंआणिकवचन ॥ सुंदरआइका ॥ ४९ ॥

**नुसुधियेचिसांचा ॥ मुकाहोयवाचकाचा ॥**
**अंतराळींपायांचा ॥ पेंधाहो ॥ ६७ ॥**

नलिहितांसाचाअसे ॥ तोवाचकुजैंवाचूंबैसे ॥ तेंव्हकासीचिजैसें ॥ मुकेपणआलें ॥४५०॥ स्तकवाचुनिप्रवीण ॥ परीकोरियासांचापडिलेंमौन तेवींअर्थबोधकशब्दजाण ॥ परीअवि ाचिनाहीं ॥ ५१ ॥ अथवाअंतराळींचालतांजाण ॥ लकासीचियेपांगुळपण ॥ तेवींअविद्या ाहींनिपटून ॥ शब्दकायसारी ॥ ५२ ॥ शब्दाचेंशपण ॥ अविद्येविषयींराहिलेंजाण ॥ ऐसें त्रउपसंहरण ॥ करितुसेकाई ॥ ५३ ॥

**तैसिअविद्येसन्मुखें ॥ सिद्धप्रतिषेधकें ॥**
**उठलींचिनिरर्थकें ॥ जल्पेंहोनी ॥ ६८ ॥**

अविद्येचिआथीनाथी ॥ वचनेंअसतीग्रंथोपग्रंथीं परीतितुकियाहीउपपत्ति ॥ निरर्थकाचि

कांत्या ॥ ५४ ॥ अविद्येचींप्रतिषेधकें ॥ ह्मणिजेअविद्यानाशींवचनेंअनेकें ॥ परीअर्थीचियेतुळिकें ॥ बैसतीना ॥ ५५ ॥ अविद्यानाशींउपावो ॥ किंचोजवावाआत्मभावो ॥ सकळवचनाचासमुदावो ॥ ऐसेंचह्मणें ॥ ५६ ॥ ॥ स्मृतिः ॥ मामेवयेप्रपद्यंतेमायामेतांतरंतिते ॥ ॥ इतिभगवद्वचनं ॥ तरीशरणाचेंकायलक्षण ॥ जेंशिवहोऊनिशिवाचेंयजन ॥ एवंजेथेंभज्यभजकपण ॥ एकवटलें ॥ ५७ ॥ अपरंच ॥ तेषांज्ञानीनित्ययुक्तएकभक्तिर्विशिष्यते॥ आतांज्ञानीह्मणिजेकोण ॥ तरीजेस्वरूपसुखसंपन्न ॥ ज्ञेयआणिज्ञातेपण ॥ असेनाजेथें ॥ ५८ ॥ तरीऐसाजोशरण ॥ तोचिमायातरलाजाण॥यदर्थींश्रुतिहीवचन॥ अवधारीजोजी॥५९॥ ॥ श्रुतिः॥ तमेकंविदित्वातिमृत्युंतरंतिइति ॥ अथच ॥ तमात्मस्थंयेनुपश्यंतिधीरास्तेषांसुखंशाश्वतंनेतरेषामिति ॥ कठवल्ली ॥ एवंश्रुतिस्मृतींचातात्पर्यार्थजाण॥जेस्वरूपज्ञानेंवांचून॥ नव्हेअविद्याखंडण ॥ बोलिलेंऐसें ४६० तरीपूर्वापरतेनवीण ॥ जालेंपांस्वरूपज्ञान ॥ तेंअविद्येचेंअनुमान ॥ साद्यंतलटिकें ॥ ६१ ॥ ज्ञेयज्ञातेपणेंविहीन ॥ सर्वकाळस्वरूपअविलक्षण ॥ तेथेंअविद्येचामागुजाण ॥ सांपडलाचिनाहीं॥ ॥ ६२ ॥ तेथेंअविद्याआहेत्रिजगतीं ॥ हेतवनदेखोंकांहींगुंती ॥ एवंवचनेंहोत्सातीं ॥ अवचनहेचि ॥ ६३ ॥ ह्मणोनअविद्यानाहींस्वरूपें ॥ सहजचिनिरर्थकजालीजल्पें ॥ कांजेवस्तुसविलोपे॥ देखिलेचिनाहीं ॥ ६४ ॥ स्मृतिः ॥ एवंबुद्धेःपरंबुध्वासंस्तभ्यात्मानमात्मना ॥ जहिशत्रुंमहाबाहो कामरूपंदुरासदं ॥ इति ॥ ॥ एवंहेंभगवद्वचन ॥ याचाभावऐसाजाण॥आत्माजोबुध्यादिकांहू[illegible] निराळाअसे ॥ ६५ ॥ त्याआ[illegible]पणातेंजाणोन ॥ आपुलेठाईंस्थिरराहोन॥ करींशत्रुहनन ॥ [illegible]ाहो ॥ ६६ ॥ ह्मणिजेपांहींआ[illegible]पुलेठाईं ॥ शत्रुआहेकींनाहीं ॥ मगमारणेंचकांहीं ॥ नलगे [illegible] ६७ ॥ तस्मात्जाणतांजेंनाहीं [illegible]जालें ॥ तेथेंकोणेंपांकायनाशिलें ॥ त्याचेंनाहींपणेंचिनेलें ॥ [illegible] जाण ॥ ६८ ॥ एवंनिषेधकांहीं [illegible]वचनाच्याठायीं ॥ अविद्याभावधरिलानाहीं ॥ यालागीं [illegible]गावाहीं ॥ निरर्थकताचअसे [illegible] ॥ ६९ ॥ यालागींवचनासन्मुख ॥ अविद्यानव्हेचदेख ॥ [illegible]ह्मानिरर्थक ॥ जल्पओढवला ॥ [illegible]४७० ॥ केवळओष्ठस्फुरण ॥ तेनव्हेंशब्दाशब्दपण ॥ विचा[illegible] ॥ शब्दसंज्ञतु ॥ ७१ ॥ [illegible]त्याविचारासीहानीनसे ॥ परीअविद्याविचारींनुमसे ॥ ह्मण[illegible]चारासीकैसें ॥ परतणेंजालें[illegible] ॥ ७२ ॥ येविषयींउपपत्ति ॥ आणीकसांगेलपुढती ॥ आव[illegible]जीसंतीं ॥ कृपाकरूनि ॥ ७३ ॥

**अवसेआलासुधा[illegible]करु ॥ नकरीचकायअंधकारू ॥**
**[illegible]हि अविद्यानाशीविच[illegible]ारु ॥ तैसाहोय ॥ ६९ ॥**

अमाव[illegible]ठायीं ॥ जरीचंद्राचीहानि[illegible]नाहीं ॥ तरीप्रकाशासीकांहीं ॥ उपेगानये ॥ ७४ ॥ तेवींअविद्ये[illegible]र ॥ निषेधार्थजालाविचा[illegible]र ॥ तंवविचारचअविचार ॥ होवोनिठेला ॥ ७५ ॥

**[illegible]ाननिफजतेनिअन्नें ॥ जेवणेंतेंचिलंघनें ॥**
**[illegible]मालेनिनयनें ॥ [illegible]पाहाणाचिअंधु ॥ ७० ॥**

बाळेंजेवींखेळ[illegible] ॥ मिथ्याजेऊंबैसती ॥ परीत्याजेवणामाजींरीति ॥ उपवासांची ॥ ७६ ॥ तेवींअविद्याजरीनाहीं ॥ तरीविचारुनिषेधि[illegible]ठकायी ॥ आतांनयनेंवीणपाहीं ॥ पाहाणाचिअंध ॥ ७७ ॥ ह्मणिजेनयनेंवीणपाहाणा ॥ तोहावि[illegible]चारुचिएकजाणा ॥ ज्याचेदेखणेपणा ॥ लोपचिनाहीं ॥ ७८ ॥ तयाविचाराच्याठाईं ॥ अविद्यात्मकनेत्रभाविलापाहीं ॥ तेणेंपदार्थप्रवाहीं ॥

देखणाहोये ॥ ७९ ॥ तेअविद्याचिनाहीं ॥ ह्मणोनिदेखतांचिअंधपाहीं ॥ हेंविवरलेंजेंकांहीं ॥ तेंउपसाहावेंसंतीं ॥ ४८० ॥ एवंअविद्यानसतीपाहीं ॥ विचार्यविचारकदोन्हींनाहीं ॥ ह्मणोनविचारचकांहीं ॥ विचारेंवीण ॥ ८१ ॥ आतांअसोहेखूण ॥ प्रस्तुतपरिसावेंनिरूपण ॥ अविद्यानाशाजाण ॥ विचारचनुमसे ॥ ८२ ॥ विचाररूपाशब्दा ॥ अर्थाचाचअसेबाधा ॥ अर्थावांचून धंदा ॥ वृथाचजैसा ॥ ८३ ॥ शब्दशब्दपणेंदिसे ॥ परीनिखळअर्थचिअसे ॥ अर्थेंवीणकायसें ॥ शब्दत्वयासी ॥ ८४ ॥ ज्याअर्थास्वतःसिद्धता ॥ तेथेंचशब्दासअसार्थक्यता ॥ मानसत्यासनाशितां ॥ प्रमाणकैंचें ॥ ८५ ॥

**कैसिहीवस्तुनसे ॥ जैंशब्दाचाअर्थहोबैसे ॥**
**तैंनिरर्थकपणेंनाशे ॥ शब्दहीथिता ॥ ७१ ॥**

भलताहीपदार्थअसे ॥ तेणेंचिशब्दप्रकाशे ॥ परीशब्दकरीतनसे ॥ पदार्थत्वत्यासी ॥ ८६ ॥ पदार्थत्वजरीनाहीं ॥ तरीशब्देंवदावेंकायी ॥ एवंशब्दासमूळपाहीं ॥ अर्थचिजाणा ॥ ८७ ॥ शब्दाचाअर्थकरितां ॥ अर्थेंचभरेअर्थता ॥ एवंशब्दपणवृथा ॥ सहजचिअसे ॥ ८८ ॥ परस्परें अनुवाद ॥ तेथेंअर्थासीचस्वाद ॥ त्यासीकरीपांरूपशब्द ॥ ह्मणावेंकायी ॥ ८९ ॥ अर्थचशब्दासकारण ॥ शब्दींअर्थचिप्रियमान ॥ आतांअसतेहीपदार्थींप्रमाण ॥ नव्हेचशब्द ॥ ४९० ॥ किंवा नसतांपदार्थजाण ॥ तयाआइतेंचनास्तिकपण ॥ त्यानाशासहीकारण ॥ केवींहाशब्द ॥ ९१ ॥ तस्मात्स्वतःसिद्धजेंअसे ॥ तेंनयेशब्देंअस्तिक्यदशे ॥ मानसेतयाकैसें ॥ नाशीलशब्द ॥ ९२ ॥

**आतांअविद्याचिनाहीं ॥ हेकीरह्मणोंकायी ॥**
**परीतेनाशितांकांहीं ॥ नुरेचिशब्दाचें ॥ ७२ ॥**

स्वरूपसर्वदासंत ॥ काळत्रयींअबाधित ॥ तेथेंअविद्येचीमात ॥ उगवितांनदिसे ॥ ९३ ॥ आतांस्वरूपींजेंनसे ॥ यासठावचिकैंचाअसे ॥ ह्मणोनिनसत्याचेनिनाशें ॥ निमालाशब्द ॥९४॥ अविद्यायेणेंआकारें ॥ स्फुरणमात्रचिस्फुरे ॥ आतांअविद्याशब्दाचेंउरे ॥ शब्दपणकैसें ॥ ९५ ॥ स्मृतिः ॥ ॥ नैवभाषणमज्ञानभावादेवशिवंविना ॥ तस्मादज्ञानमज्ञानकार्यंचसुरपुंगवाः ॥ एतद्ब्रह्मैवनैवान्यदितिमेनिश्चितामतिः ॥ इतिस्कंदपुराणेब्रह्मगीता ॥ ॥ अज्ञानींअज्ञानपण ॥ हें चिनसंभवेशिवेंवीण ॥ तस्मात्अज्ञानआणिअज्ञानकार्यजाण ॥ निश्चितपूर्णब्रह्मैवएेक्यें ॥ ९६ ॥ एवंआत्मयावांचूनकांहीं ॥ सर्वसर्वदारितेंनाहीं ॥ तरीअविद्याहेकायी ॥ कासयाह्मणावें ॥९७॥

**यालागींअविद्येचियामोहरा ॥ उठिलियाहीविचारा ॥**
**अंगाचाचिसंसारा ॥ होऊनिठेला ॥ ७३ ॥**

विचारेंवीणशब्दनसे ॥ ह्मणोनविचारचशब्दअसे ॥ तोविचारअविद्या[illegible] ॥ ना[illegible]शावयाउठे ॥ ९८ ॥ तैंनासणेंहेंपारुषलें ॥ असतचिविचारत्वगेलें ॥ अविद्याहेंबोलें ॥ बोलतांहे[illegible]पैं ॥ ९९ ॥ जेथेंविचारचमालवला ॥ तेथेंवचनाचाहीठावमोडला ॥ एवंअविद्यानाशींबोला[illegible] ॥ प्रमाणत्व नाहीं ॥ ५०० ॥

**ह्मणोनिअविद्येचेनिमरणें ॥ प्रमाणायेईलबोलणें हे ॥**
**हेंअविद्याचिनाहींपणें ॥ नेदीघडों ॥ ७४ ॥**

एवंरूपाचेअस्तिक्यत्वेंजाण ॥ अविद्यानघडेपैंनिपटून ॥ तेथेंकोणासीआलेंमरण ॥ शब्दाचें नपाहा ॥ १ ॥ अविद्येचानास्तिक्यस्वभाव ॥ तोचीपुसीतसेशब्दाचाठाव ॥ येथआक्रोशेंवी णवाव ॥ जालाशब्द ॥ २ ॥ अहोचिन्मयानंदेंचिद्गगनीं ॥ सत्यत्वानयेअविद्याध्वनि ॥ तरी जगाचीचश्रेणी ॥ मिथ्याजाली ॥ ३ ॥ तेथेंअविद्याहेकोठेंअसे ॥ येणेंअसावेंजगाचेनिमिषें ॥ तरीयाजगासीचनसे ॥ जगत्वआतां ॥ ४ ॥ तेथेंशब्दहीतदंतःपाती ॥ बैसलाअविद्येचेपातीं ॥ अविद्यानाहींतरीनिवृत्ति ॥ सहजचीशब्दाची ॥ ५ ॥ तेथेंशब्देंअविद्यानाशकेला ॥ मगआत्म्या नेंआत्मादेखिला ॥ याबोलियाफोला ॥ वोडवलीयाकीं ॥ ६ ॥ आत्माअनादित्वेंशुद्धबुद्ध ॥ तेथें कधींचनाहींप्रतिबंध ॥ ह्मणोनीत्याचात्यासींबोध ॥ व्हावानलगे ॥ ७ ॥ हाआशयधरून ॥ पुढें बोलिलेंसेवचन ॥ तयादेइजेजीअवधान ॥ प्रत्ययोन्मुख ॥ ८ ॥

**आणिआत्माह्नआत्मया ॥ दाऊनिबोलमहिमेयां ॥**
**येईलहेसविया ॥ विरुद्धचि ॥ ७५ ॥**

अहोआत्माह्मणिजेबोधघन ॥ नाहींअबोधाचेंदर्शन ॥ त्याचातयाबोधजाण ॥ अधींचअसे ॥९॥ प्रज्ञानंब्रह्मइतिश्रुतिः ॥ तथाच ॥ सनित्योपलब्धिःस्वरूपोहमात्मा ॥ इतिहस्तामलके ॥ एवंबोध रूपआत्मयाच्याठाईं ॥ आ/बोधउत्पन्नचिनाहीं ॥ तयाआत्मबोधींकायी ॥ मिरवावाशब्द ॥५१०॥ अगाबोधरूपनविसकुसोन ॥ कांहींहोतसेबोधजाण ॥ तोहीपूर्वापरतेवीण ॥ हेअनुभवीजाणती ॥११॥ याअर्थाचेंदृढीकरण ॥ गुरुस्तवनींकेलेंसेजाण ॥ ऐक्यत्वनहालोन ॥ खूणजाणितली ॥१२॥ एवंआत्मत्वींसंधिनाहीं ॥ तरीअविद्याकैंचिकायी ॥ तयाचातयाबोधपाहीं ॥ होणेंचिनलगे॥१३॥ आतांआत्मत्वेंशब्दरूपाआला ॥ तेणेंआत्मादाविला ॥ किंवाआत्माभेटला ॥ आत्मयास्वयें ॥१४॥ हेंपैंविरुद्धचिअघवें ॥ येथशब्देंकायसाधावें ॥ पुढेंययाचभावें ॥ दृष्टांतअसती ॥ १५ ॥

**आपणयांआपणपेंसी ॥ लागलेंलग्नकवणेंदेसीं ॥**
**कींसूर्यअंगग्रासी ॥ ऐसेंग्रहणआहे ॥ ७६ ॥**

देसींकोणेंयेकेही ॥ देखिलेंऐसेंनाहीं ॥ जेआपणेंसीआपलेंपाहीं ॥ लाविलेंलग्न ॥१६॥ ह्मणिजे आपणेसीयोग ॥ हाअबद्धअवघाप्रसंग ॥ कांजेंमुळींचिवियोग ॥ असावाअधीं ॥ १७ ॥ ह्मणोनि आत्मयाआत्मज्ञान ॥ हेंअवघेंअसंगतजाण ॥ कांजेंआत्माकायआन ॥ कोठेंहीअसे ॥ १८ ॥ आतां आत्मलोपअसतांजरीअधीं ॥ तरीप्राप्तिहीसुखेंचिजातसिद्धि ॥ आत्माचयेकुनिरवधि ॥ अद्वि तीयत्वेंअसे ॥ १९ ॥ सजातीयविजातीयस्वगत ॥ याभेदींअसेनिरस्त ॥ तरीलोपयाचाघडत ॥ कवणाप्रति ॥ ५२० ॥ आत्माएकअखंडित ॥ विजातीयप्रपंचनाशिवंत ॥ तरीप्रपंचाचानुमटत ॥ मागहीयेथें [illegible] २१ ॥ आतां[illegible]नाहीं ॥ तरीआणीकाठावचकेंपाहीं ॥ ह्मणोनिविजातीय भेदकांहीं ॥ [illegible]सनायेथें ॥२२॥ आतांएव[illegible]आत्माएकप्रत्यगात्मा ॥ हेसजातीयभेदाचीप्रमा ॥ तरी [illegible]र्मा ॥ सारिखेंनव्हे ॥ २३ ॥ आतांशाखापल्लुवा ॥ अवघावृक्षएकचिजाणावा ॥ स्व गतभेदह्मणाव[illegible]ा ॥ ययासपाहीं ॥ २४ ॥ [illegible]सोसत्यज्ञानानंद ॥ हेमानावेस्वगतभेद ॥ याभेदासी दावीशब्द ॥ [illegible]र्थतानाहीं ॥ २५ ॥ तरीआत्माकाळत्रयींअविच्छिन्न ॥ चिद्घनानंदपरिपूर्ण ॥ तेथेंहेभेदनिपट[illegible]न ॥ असतीचनापैं ॥ २६ ॥ त्रिधाभेदवाचारंभण ॥ अर्थएकलाचिद्घन ॥ येवि षयींनिरूपण ॥ [illegible]ागेंकेलेंअसे ॥ २७ ॥ आतांत्याचातयाप्रतिलोप ॥ हामिथ्याअवघाजल्प ॥ आ

त्मत्वींमिथ्यारोप ॥ असंबद्धकीजे ॥ २८ ॥ जेवींराहुकेतुवीण ॥ सूर्यांकेवींघडेपांग्रहण ॥ सूर्यत रीसूर्यासीजाण ॥ लोपिजेनाकीं ॥ २९ ॥ ह्मणोनिसूर्येंनिजअंगग्रासून ॥ तेंकायहोईलसूर्यग्रहण ॥ ह्मणिजेसंबंधेंवीण ॥ लोपातेंनपवे ॥ ५३० ॥ ह्मणोनिआत्मासंबंधातीत ॥ उदयलोपवर्जित ॥ तेथें आत्मयांआत्मत्वप्राप्त ॥ हेंअघटमान ॥ ३१ ॥ पुढेंआणीकांदृष्टांतीं ॥ दाविलीहेउपपत्ति ॥ अव धारावेंसंतीं ॥ जेंबोलिलेंअसे ॥ ३२ ॥

**गगनआपणयांनिगे ॥ सिंधुआपणयांरिघे ॥**
**कींतळ्हातवोळघे ॥ आपणयां ॥ ७७ ॥**

आपणामाजींआपण ॥ नघालितांचअसेगगन ॥ किंवासिंधुमाजींसिंधुजाण ॥ नसांठवितां असे ॥ ३३ ॥ तेवींजालेनप्राप्तिवीण ॥ प्राप्तचिआपणाआपण ॥ तयाआत्मराजाजाण ॥ प्राप्तिचि नशोभे ॥ ३४ ॥ आपणासप्राप्तआपण ॥ हेंनशोभेआत्मत्वींजाण ॥ आतांभावितयाव्यर्थपण ॥ सहजचिआलें ॥ ३५ ॥ जेवींएकेभागींचातळहात ॥ तोचिजरीतेणेंधरिजेत ॥ तरीआत्माप्राप्त होत ॥ आत्मयासी ॥ ३६ ॥ प्राप्तिहाधर्मजाण ॥ तरीआत्माधर्माधर्मेंविहीन ॥ प्राप्ताप्राप्तविल क्षण ॥ आनंदघनजो ॥ ३७ ॥ श्रुतिः ॥ ॥ अन्यत्रधर्मादन्यत्राधर्मादस्मात्कृताकृतादन्यत्रभूत श्चभव्यश्चयत्तत्पश्यतितद्वदिति ॥ ॥ तस्मात्ऐसीयेआत्मत्वींपाहीं ॥ प्राप्ताप्राप्तकैंचीकाई ॥ ह्मणोनिद्वयेविषयीं ॥ पुढेंहीबोले ॥ ३८ ॥

**चराचरापाणीपाजणी ॥ करूंयेईलएकेक्षणीं ॥ परीपाणियां सीपाणी ॥ पाजावेंकाई ॥ ७८ ॥ साठितिशांदिवसां ॥ मा जींयेखादाहोयऐसा ॥ जेसूर्यासीचिसूर्यजैसा ॥ डोळां दावी ॥ ७९ ॥**

उदकत्त्वताजैंवितृष्ण ॥ करीजगाचेंतृषाहरण ॥ परीआपणासतंवआपण ॥ प्राशिनाकधीं ॥ ३९ ॥ तेंभोग्यभोक्तृत्वेंवीण ॥ नकरितांचिअसेवितृष्ण ॥ तेवींआत्मत्वींप्राप्तिजाण ॥ आत्मत्वा सनघडे ॥ ५४० ॥ तेवींचसूर्याच्याकिरणीं ॥ जगासीहोयधणी ॥ परीतोचितयाचेनि ॥ देखिला नवजाय ॥ ४१ ॥ ह्मणिजेतेणेंचितयाउजेडावें ॥ हेंतंवतेथेंनसंभवे ॥ कांप्रकाशचिअघवें ॥ अंगत याचें ॥ ४२ ॥ कांजेयेकाधावेळुऐसाहीहोता ॥ जेआपणआपणयांनदेखता ॥ मगदेखावयाची योग्यता ॥ घडतीतयाचीतया ॥ ४३ ॥ एवंप्रकाशमात्ररवी ॥ तेथेंऐसीनाहींपदवी ॥ जेंआपण यादावी ॥ नदावीकधींही ॥ ४४ ॥ तेवींअप्राप्तिचाअभाव ॥ ह्मणोनिप्राप्तीचानसेभाव ॥ ऐसेन आत्माराव ॥ देखणामात्र ॥ ४५ ॥ आतांआणीकहीदृष्टांत ॥ देऊनअसेबोलत ॥ शब्दाचीजेथ ॥ खुंटलीगति ॥ ४६ ॥

**कृतांतजरीकोपेल ॥ तरीत्रैलोक्यहेंजाळील ॥**
**वांचूनिआगीलावील ॥ आगीसीकाई ॥ ८० ॥**

कृतांताचेंअनुमोदन ॥ पावोनिखवळलाहुताशन ॥ तेणेंत्रैलोक्याचेंदहन ॥ आरंभिलेंकाळें ॥ ४७ ॥ परीऐसेंतयानकरवे ॥ जेअग्नीनेंअग्निजाळवे ॥ तेवींपरोक्षींशब्दपावे ॥ नपवेआत्मत्वीं ॥ ४८ ॥ कांजेसकाळाचाआत्मापाहीं ॥ शब्दासींकायआत्मानाहीं ॥ ह्मणोनिआत्मत्वेंशोधितां

कांहीं ॥ नुरेचिशब्दाचें ॥ ४९ ॥ शब्दासीजेंशब्दत्व ॥ तेंचितयाचेंआत्मत्व ॥ तेंशोधितांआत्म तत्त्व ॥ तैंआपणचिविरे ॥ ५५० ॥ एवंआत्मयांआत्मदर्शन ॥ येथशब्दजालाकारण ॥ तरीआत्म त्वींमुख्यजाण ॥ प्राप्तिचनघडे ॥ ५१ ॥

आपणपेंआपणयां ॥ दर्पणेवीणधात्रेया ॥
समोरहोआवया ॥ ठाकींआहे ॥ ८१ ॥

हेंजैसेंनघडेजाण ॥ तेवींआत्माउपाधिहीन ॥ प्राप्तहोणेंनवीण ॥ प्राप्ताचिअसे ॥ ५२ ॥ येथेंकां हींउपाधिअसतां ॥ तरीआपआपणाप्राप्तहोता ॥ एवंप्राप्तरूपचिआयिता ॥ आत्माअसे ॥ ५३ ॥ एवंआत्मयाआत्मप्राप्ति ॥ हेअवघीअसंबंधवदंती ॥ दाविलेंसेदृष्टांतीं ॥ पुढेंहीहेचि ॥ ५४ ॥

दिठीदिठीतेंरिघोंपाहे ॥ रुचिरुचीतेंचाखोसुंये ॥
कींचेतयाचेतऊंये ॥ हेंनाहींचकीं ॥ ८२ ॥

देखणीदिठीहोये ॥ परीआपणाआपणनपाहे ॥ कींस्वादस्वादाचाखतआहे ॥ हेंकायेघडतें ॥ ५५ ॥ कींजागयाजागविजे ॥ हेंहीअप्रयोजकजाणिजे ॥ एवंबोलिलेंहेंजेंजें ॥ अघटितअवघें ॥ ५६ ॥ ह्म णोनिदेखण्यांचादेखणा ॥ तोहाआत्माजाणा ॥ तोहादेखेआपणा ॥ कासेनेहोय ॥ ५७ ॥ किंवा स्वादींजयाचास्वाद ॥ अचाटस्वतांचअसेशुद्ध ॥ तेथस्वादसंबंध ॥ कासयालागे ॥ ५८ ॥ किं वानिद्राजागरेंवीण ॥ आत्मासर्वदाविद्यमान ॥ तयाआपलेंपण ॥ भानचिनाहीं ॥ ५९ ॥ एवंउ पाधीवीण ॥ स्फुरद्रूपसर्वदाजाण ॥ दृष्टांतींहेचिखूण ॥ मागुतिबोले ॥ ५६० ॥

चंदनचंदनालावी ॥ रंगुरंगपणारावी ॥
मोंतिपणमोतींलेववी ॥ ऐसेंकैंचें ॥ ८३ ॥

चंदनीचेंजेंचंदनपण ॥ जेंकाष्ठउपाधिहीन ॥ तयाकायविलेपन ॥ चंदनाचेंकीजे ॥ ६१ ॥ किंवाजेणेंरंगरंगला ॥ तयारंगकायआणीकदिधला ॥ एवंनेदितचभला ॥ आइताअसे ॥ ६२ ॥ किंवामुक्ताफळींमुक्ताफळपण ॥ जेणेंसुढाळेंकरून ॥ तयातयाचासुढाळजाण ॥ द्यावालागे ॥ ६३ ॥ इत्यादिउपलक्षण ॥ कळाएकिचजाण ॥ हेंग्रहणकेलेंनवीण ॥ जेथिचेंतेथें ॥ ६४ ॥ आप्रआपलाठाईंअसे ॥ आणीककोठेंचनसे ॥ ह्मणोनिऐसेंकैंचेंअसे ॥ जेंबोलिला ॥ ६५ ॥

सोनेपणसोनेंकसी ॥ दीपपणदीपप्रकाशी ॥
रसपणाबुडीदेरसीं ॥ तेकेंजोडे ॥ ८४ ॥

अहोसोनेनसींजेंभिन्न ॥ तेसोनयाकसीजाण ॥ परीजयाचेनिसोनेंपण ॥ सोनयासी ॥ ६६ ॥ तेंकसिलेंद्रवीण ॥ स्वताअसेसंपूर्ण ॥ किंवादीपजेणेंतेजेंकरून ॥ दीप्तिवंतु ॥ ६७ ॥ तेंप्रकाशिलें नवीण ॥ स्वतास्वतेजसआपण ॥ किंवारसींजेंरसपण ॥ हीनउपाधि ॥ ६८ ॥ तेचतयाच्याठाईं ॥ हेंहीबोलणेंतेथेंकाई ॥ आणिऐसेंभाविजेजरीकांहीं ॥ तरीतेंनघडे ॥ ६९ ॥

आपुलियेमुकुटींसमर्था ॥ चंद्रबैसविलासर्वथा ॥
परीचंद्रचंद्राचियेमाथां ॥ वाऊंयेकाई ॥ ८५ ॥

चंद्रशेखरसमर्थ ॥ तोस्वभाळींचंद्रासधारित ॥ परीचंद्रचंद्राचेवोळगत ॥ मस्तकींकाई ॥ ५७० ॥ चंद्रींचजयेचेनेचंद्रपण ॥ तेचंद्रकळामात्रजाण ॥ तेथेंत्यागआणिग्रहण ॥ लागलेंचनाहीं ॥ ७१ ॥

**तैसाआत्मराजुजंव ॥ ज्ञानमात्रचिभरीव ॥**
**आतांज्ञानेंज्ञानासीखेव ॥ कैसेंदीजे ॥ ८६ ॥**

तेवींआत्माइंद्रियात्मकनव्हे ॥ किंवाइंद्रियांसीनव्हेविषये ॥ नव्हेबुध्यादिकांध्येये ॥ ह्मणोनि नघेवेतिहीं ॥ ७२ ॥ आत्माचज्ञानमात्रपाहीं ॥ आत्मत्वींहेंकांहींचनाहीं ॥ ह्मणोनिप्राप्तिअप्राप्ती चीकांहीं ॥ वार्ताहीनसे ॥ ७३ ॥ उक्तंच ॥ जगद्विलक्षणंब्रह्मब्रह्मणोन्यन्नकिंचन ॥ ब्रह्मान्यद्भा तिचेन्मिथ्यायथामरुमरीचिका ॥ १ ॥ इतिस्कंदपुराणेब्रह्मगीतायां ॥ ब्रह्मजगाहूनिविलक्षण ॥ त्याब्रह्मींआणीकनाहींचजाण ॥ आतांकांहींनावेकजेंभान ॥ तेंमिथ्याअघवें ॥ ७४ ॥ ऐसेंजेंब्रह्म पूर्ण ॥ तेंनिखळज्ञानमात्रचिजाण ॥ जडाजडपणखूण ॥ असेनातेथें ॥ ७५ ॥ ॥ श्रुतिः ॥ प्रज्ञानं ब्रह्मेति ॥ ह्मणोनआत्मप्राप्तिनसाहे ॥ निखळज्ञानमात्रचिआहे ॥ ज्ञानमात्रअभिप्रायें ॥ दृङ्मात्रद्रष्टे ॥ ७६ ॥ तेथेंनाहींदुसरेंज्ञान ॥ मातेणेंजाणिजेतयालागून ॥ किंवाएकलेंआपण ॥ आपणजाणें ॥ ७७ ॥ तरीऐसियाहीपुरतेंनाहीं ॥ केवळदृङ्मात्रचतेंपाहीं ॥ नेणणेंजेथकांहीं ॥ स्पर्शोंनेणें ॥ ७८ ॥ तेथेंनेणीवेचामागुनुमसे ॥ तेथजाणणेंतेंकाइसें ॥ नेणिजेजाणिजेऐसें ॥ नव्हेजेंकीं ॥ ७९ ॥ परी आपणाहानीनाहीं ॥ ऐसेंजेंजाणणेंकांहीं ॥ तेंजाणीवेवीणपाहीं ॥ सर्वकाळअसे ॥ ५८० ॥

**आपुलेनजाणपणें ॥ आपणयांतेजाणोंनेणें ॥**
**डोळयाआपुलेंपाहाणें ॥ दुवाडजैसें ॥ ८७ ॥**

ज्ञेयज्ञातेपणेंवीण ॥ ज्ञानमात्रआत्मापूर्ण ॥ ह्मणोनिआपणाआपण ॥ जाणोंनसके ॥ ८१ ॥ जे वींअंगींचेनउष्णपणें ॥ अग्निउष्णत्वासनेणें ॥ तेवींआपलेंचजाणतेपणें ॥ जाणीवनेणें ॥ ८२ ॥ जेवींआपलेंदेखणेंपणें ॥ डोळाआपणादेखोंनेणें ॥ डोळाडोळयापरोक्षपणें ॥ देखेलकैसा ॥ ८३ ॥ एवंआपुलेनिजाणपणें ॥ आपणजाणोंनेणें ॥ तोनेणताकोणें ॥ करूंयेईल ॥ ८४ ॥ आतांनेणीव नाहींनिपटून ॥ तरीजाणीवनघडेजाण ॥ जाणीवमात्रह्मणोन ॥ नघडेहेंपैं ॥ ८५ ॥ येविषईंनिरो पण ॥ असेदृष्टांतेंसहवर्तमान ॥ श्रोतींदीजोअवधान ॥ बोलिजेतया ॥ ८६ ॥

**आरिसाआपुलिये ॥ अंगींआपणपाहे ॥**
**तरीजाणणेंजाणोंलाहे ॥ आपणयांतें ॥ ८८ ॥**

आरिस्याचीस्वच्छता ॥ आरिसातंवपाहोंनलाहेसर्वथा ॥ स्वच्छतामात्रचितत्त्वता ॥ आरिसा ह्मणोनि ॥ ८७ ॥ स्वच्छताआनआरसाआन ॥ ऐसीजरीकाहींअसतीखूण ॥ तरीतयाचेंतयाअव लोकन ॥ सुखेंचिघडतें ॥ ८८ ॥ तेवींआत्माआणिजाणीव ॥ ऐसाजरीकांहींअसताभाव ॥ तरी अवश्यजाणावयाचीहाव ॥ धरितासुखें ॥ ८९ ॥ तरीआत्माचजाणीव ॥ आणीकुनसेयेथभाव ॥ जाणावेंलागेहृतुकीअडव ॥ असेनायेथें ॥ ५९० ॥ वारावारियानेंगेला ॥ कींपरिमळेंपरिमळअनु ग्रहिला ॥ तेवींआत्माजाणितला ॥ आत्म्यानेंस्वयें ॥ ९१ ॥

**दिगंतापैलीकडेचें ॥ धांवोनिसुरियाखोंचे ॥**
**मातियेकांतियेचें ॥ अंगफुटे ॥ ८९ ॥**

दिगंताहूनिदूरी ॥ पदार्थकोण्हीयेतसेजरी ॥ तयातेंखोंचावयासुरी ॥ योग्यहोय ॥ ९२ ॥ सुरीहूनआन ॥ असोसुरीसन्निधान ॥ किंवादिगंताहूनीजाण ॥ असोदुरी ॥ ९३ ॥ तऱ्हींसुरी

तयातेंखोंचिल ॥ काळवशेंऐसेंघडेल ॥ परीआपणाआपणछेदवेल ॥ हेंकायघडे ॥ ९४ ॥ एवंसु रीचैतिखटपण ॥ सुरीसनव्हावेंजाण ॥ तेवींजाणणेंचिआत्मापूर्ण ॥ आपणानजाणें ॥ ९५ ॥

**रसवृत्तीसीउंगाणे ॥ घेऊनिजिव्हाग्रशहाणें ॥ परीकायींकी जेनेणें ॥ आपणापेंचाखों ॥ ९० ॥ तरींजिभेकायीआपुलें ॥ चाखणेंहनठेलें ॥ तैसेंनव्हेंसंचलें ॥ तेंचितेंकीं ॥ ९१ ॥ तैसा आत्मासच्चिदानंदु ॥ आपणयाआपणसिद्धु ॥ आतांकायदे शब्दु ॥ तयाचेंतया ॥ ९२ ॥**

आत्माअसेआपलेजाणीवेवीण ॥ तरीनेणोंकायअसेलनेण ॥ ऐसातर्कजाण ॥ उठेलजरी ॥९६॥ तरीमागेंज्ञानअभेदप्रकर्ण ॥ तेथशून्यवादउठावलाजाण ॥ तोसच्चिदानंदकथन ॥ करूनखंडिला ॥ ९७ ॥ जेंसच्चिदानंदशब्दातीत ॥ येथभेदतोशब्दींउमटत ॥ तोशब्दचियेथनिरस्त ॥ वांचूनि आत्मासंचला ॥ ९८ ॥ ह्मणोनिहेंशब्दखंडण ॥ आतांनिरोपिलेंप्रकर्ण ॥ तेंचउपसंहरण ॥ येपदीं केलें ॥ ९९ ॥ आपलेनजाणतेपण ॥ आपलाजाणनव्हेआपण ॥ तोशब्देंकायजाण ॥ जाणताहोय ॥ ६०० ॥ आत्मापूर्णानंदचिद्धन ॥ येथेंशब्दानसेशब्दपण ॥ परीआपणजाणतेपणेंवीण ॥ जाण तचिअसे ॥ १ ॥ जाणपणेंवीणजाण ॥ तरीस्वताअसेलनेण ॥ यातर्काचेंउपसंहरण ॥ केलें असेपैं ॥ २ ॥ जेंजेणेंजाणणेंपूर्ण ॥ हेंचराचरभरलेंअसेजाण ॥ तेंजाणचिनेण ॥ ह्मणावेंकैसें ॥ ३ ॥ श्रुतिः ॥ तमेवभांतमनुभातिसर्वंतस्यभासासर्वमिदंविभाति ॥ इति ॥ तथाच ॥ नित्यो नित्यानांचेतनश्चेतनानांएकोबहूनांयोविदधातिकामानिति ॥ ॥ स्मृतिरपि ॥ वेदाहंसमतीता निवर्तमानानिचार्जुन ॥ भविष्याणिचभूतानिमांतुवेदनकश्चन ॥१॥ इतिभगवद्वचनं ॥ ॥ भूतभ विष्यवर्तमान ॥ रचलेंआहेभूतभान ॥ यासमस्तासीमीचएकजाण ॥ वांचूनतेनेणतीसर्वथा ॥ ४ ॥ एवंजेंजेंकांहींभासमान ॥ मिळोनजाणतेंएकचिजाण ॥ ऐसेंस्वरूपनेण ॥ ह्मणावेंकसें ॥ ५ ॥ जेवींरसाचेंरसपण ॥ जिव्हेनेंठायींठेविलेंजाण ॥ तेजिव्हाकायरसहीन ॥ ह्मणोंयेपाहा ॥ ६ ॥ तेरसमात्राचिदेखें ॥ ह्मणोनिआपआपणानचाखे ॥ तऱ्हींनचाखोनचाखे ॥ उपाधिर हित ॥ ७ ॥ तेवींआत्मानिखळज्ञानघन ॥ तेणेंआपणाआपण ॥ जाणावेंचनलगेजाण ॥ इतु काअर्थ ॥ ८ ॥ जरीतोआपलाआपणनेणे ॥ तरीहेंचिजाणतसेकोण ॥ तस्मात्अवच्छेदहीन ॥ जाणताचस्वयें ॥ ९ ॥ ज्याचेजाणीवेसपाहीं ॥ काळाचावारालागलानाहीं ॥ ह्मणोनभेदलागेल कांहीं ॥ ऐसेंनव्हे ॥६१०॥ जोआत्मानित्यबुद्ध ॥ नाहींकाळगतिअवच्छेद ॥ ह्मणोनिवेद्यवेदकभेद ॥ असेनाकीं ॥ ११ ॥ ह्मणोननजाणतचजाण ॥ हेंचिउमटिलेंतेथेंखूण ॥ तेथेंतंवनवेंज्ञान ॥ उठलें नाहीं ॥१२॥ ज्ञानेंजाणिजेज्ञान ॥ तेथूनउठिलेंतेंचजाण ॥ हेअनुभवाचीखूण ॥ नव्हेवम्रगनाकीजे ऐसी ॥ १३ ॥ असोऐसाआत्मासच्चिदानंदु ॥ जेथेंनसेतर्कांचाभेदु ॥ तोतेणेंचअसेसिद्धु ॥ काय देशब्दतयाचेंतया ॥ १४ ॥ नेणणेंआणिजाणणें ॥ हेंजयाचेनजाणतपणें ॥ त्यासीनाहींह्मणणें ॥ घडेकाई ॥१५॥ तरीशून्यवादतर्क ॥ निमालायेथेंनिष्टंक ॥ सच्चिदानंदस्वाभाविक ॥ आत्माअसे ॥१६॥ तेंत्रिभेदलक्षणें ॥ जाणिजेत्रिवाचकपणें ॥ ऐसियाअनुमानें ॥ नाहींजोकीं ॥ १७ ॥ जोअ नुमानाचाद्योतक ॥ नव्हेजोआनुमानिक ॥ तोशब्दासीकेवींदेख ॥ विषयहोय ॥ १८ ॥ शब्दाची नुमगेसोय ॥ आणिलेवीणजोआहे ॥ तोजाणोनिजाणोंये ॥ ऐसाकैंचा ॥ १९ ॥ जोजाणणेंमात्र आहे ॥ त्यासीजाणणेंनव्हेउपाये ॥ ह्मणोनिउपायनवाहे ॥ जेथीलवाट ॥६२०॥ किंवातोचित

यासप्राप्त ॥ हेंअवघेंअसंमत ॥ मांशब्दकेवींशोभत ॥ प्राप्तिमिसें ॥ २१ ॥ हेंबोलिलेंदिसेलशब्दीं ॥ परीहेंआहेबोलाअर्धीं ॥ ह्मणोनियेथेंत्रिशुद्धि ॥ शब्दनमिरवे ॥ २२ ॥ स्मृतिः ॥ शब्दगोचरतया स्थितःसदाशब्दगोचरविहीनरूपतः॥यत्स्थितंतदहमेवसंततःप्रत्ययोपिमतिरेवमेवहि॥१॥इतिब्र ह्मगीतायां ॥ ॥ जेंजेंशब्दासीअगोचरपाहीं ॥ तेथेंदिसेशब्दगोचरताही ॥ एवंगोचरअगोचर कांहीं ॥ आत्माचअसे ॥२३॥ ह्मणोनिशब्दासीद्योतकतानघडे ॥ किंवास्वतानसेप्राप्तिचेंकुवाडें ॥ आपलेनिसुखवाडे ॥ सर्वदाअसे ॥ २४ ॥

कोण्हाहीप्रमाणाचेनिहातें ॥ वस्तुघेनानेघेआपणयातें ॥
जेंस्वयेंआयितें ॥ घेणेंनानघेणें ॥ ९३ ॥

आपुलेजाणीवेआपणजाणोंये ॥ तरीजाणीवतंवअर्धीचआहे ॥ अंगतेंकायनव्हे ॥ आपलेंरूप ॥ २५ ॥ एवंजर्‍हींजाणितलें ॥ तर्‍हींआपणावरीकल्लोळें ॥ परीजाणीवेनजाणितलें ॥ ऐसेंनव्हे ॥ २६ ॥ एवंप्रमाणेंजेणेंद्योतिलीं ॥ तेवस्तुप्रमाणींनिर्धारिली ॥ हेअवघीबोली ॥ वल्गनमात्र ॥ २७ ॥ घेणेंनानघेणें ॥ ऐसेंजेंआपलेंअसणें ॥ तेंकेवींशब्देंयेणें ॥ सद्भावाआणिजेल ॥ २८ ॥

ह्मणोनिआत्माआत्मलाभें ॥ नांदऊनिशब्दशोभे ॥
येइलऐसानलभे ॥ उमसुघेवों ॥ ९४ ॥

ह्मणोनआत्मानित्यप्राप्त ॥ तोआपणाआपणप्राप्तहोत ॥ हेंअवघेंअसंमत ॥ वोडवलेंयेथें॥२९॥ तेथेंआत्माआत्मत्वलाधला ॥ ह्मणोनिशब्दसार्थकजाला ॥ कांजेअविद्यानाशकेला ॥ शब्देंह्म णोनि ॥६३०॥ तरीनसतीअविद्याशब्देंभाविली ॥ तेशब्देंयेणेंखंडिली ॥ जेवींनिर्धनाच्यामनोरथा जाली ॥ आथीनाथी ॥ ३१ ॥ ह्मणोनिनसतेअविद्येसीनाशिलें ॥ हेंअवघेंनिरर्थकजालें ॥ मां आत्मयासीदाविलें ॥ येणेंकेवीं ॥ ३२ ॥ अहोआत्मयाचेंपूर्णपणीं ॥ नाहींशब्दाचीमिरवणी ॥ तेथेंस्वरूपप्राप्तीचीआयिनी ॥ पुरवीलहाकेवीं ॥३३॥ ॥ उक्तंच ॥ यमग्न्युष्णवन्नित्यबोधस्वरूपं मनश्चक्षुरादीन्यबोधात्मकानि ॥ प्रवर्ततआश्रित्यनिष्कंपमेकंसनित्योपलब्धिस्वरूपोहमात्मा ॥ इतिहस्तामलके ॥ हेंजेंमनश्चक्षुरादिकें ॥ स्वताअसतीअबोधात्मकें ॥ बोधरूपएकनिकें ॥ आत्म स्वरूप ॥ ३४ ॥ तेंकोण्हेंसंबंधेंवीण ॥ आपेंआपबोधपूर्ण ॥ जेवींउष्णतवचिजाण ॥ अग्निचेरूप ॥ ३५ ॥ यालागींउपचारेंवीणउपलब्ध ॥ ह्मणोनिबोलिलानित्योपलब्ध ॥ मनचक्षुरादिकेंमुग्ध ॥ स्वताअसती ॥ ३६ ॥ तैंनावेकयाचाआश्रयोपावोनि ॥ क्षणेकयाचीप्रवृत्तिदिसतसेजनीं ॥ तयाआत्मयाचेनि ॥ निर्धारवेकेवीं ॥ ३७ ॥ ह्मणोनिआत्मानित्यबुद्ध ॥ येथेंउमसुचिनेघेशब्द ॥ यालागींदृष्टांतेंसीमहासिद्ध ॥ पुढेंहीबोलतसे ॥ ३८ ॥

एवंमाध्यान्हींचिदिवीं ॥ तमधाडीनादिवोदावी ॥
तैसीउभयतापदवी ॥ शब्दाजाली ॥ ९५ ॥

अविद्यानसेआपण ॥ सिद्धआत्मासाधिलेवीण ॥ येथेंशब्देंकायजाण ॥ केलेंपाहा ॥ ३९ ॥ जेवींमाध्यान्हकाळींअग्नि ॥ उजळिजेजरीदीपकोण्ही ॥ तेव्हडीतयाचीकरणी ॥ वांयांचिगे ली ॥ ६४० ॥ नकरीप्रकाशासीअनुमोदन ॥ ननासीतमाचेंनाहींपण ॥ एवंतयासीदीपपण ॥ असतचिनाहीं ॥ ४१ ॥ तेवींअसतचिशब्दनिमाला ॥ अविद्यानाशातोनाथिला ॥ आत्मत्वींत रीबुडाला ॥ आपणचिथिता ॥ ४२ ॥

**आतांअविद्यानाहींपणें ॥ नाहींतयेतेंनाशणें ॥ आत्मासिद्धु चिमाकोणें ॥ कायसाधावें ॥ ९६ ॥ ऐसाउभयपक्षीं ॥ बोलुन लाहेनखी ॥ हरपलाप्रळयोदकीं ॥ ओघजैसा ॥ ९७ ॥**

एवंआत्माशुद्धबुद्ध ॥ जोकींस्वताचिअसेसिद्ध ॥ जयाच्याद्रष्टृत्वासबाध ॥ कालत्रयींनसे ॥४३॥ ॥ श्रुतिः ॥ नहिद्रष्टुर्दृष्टेर्विपरिलोपोविद्यतेअविनाशित्वात् ॥ इति ॥ ॥ ह्मणोनिज्यादेखण्यासपाहीं ॥ सर्वथाविलोपचिनाहीं ॥ तेथेंअविद्याहेंकाई ॥ कासयाऐसी ॥ ४४ ॥ आतां आत्मयाचेअखंडपणीं ॥ आइतीअविद्येचीहानी ॥ तेथेंअविद्याहाशब्दह्मणी ॥ उमसपावे ॥ ४५ ॥ एवंउभयपक्षींयासी ॥ अप्रयोजकताआलीऐसी ॥ किंबहुनाअसावयासी ॥ ठावचिनाहीं ॥४६॥ अविद्यानाहींठायींचि ॥ आत्माशुद्धअर्धीचि ॥ ह्मणोनशब्दाची ॥ नखीचनलगे ॥ ४७ ॥ आत्मा सच्चिदानंदघन ॥ असेअसतेपणेंवीण ॥ पाहातांपूर्णत्वाचीखूण ॥ तेथेंअविद्याकैंची ॥ ४८ ॥ माशब्दाचाकैंचाउगव ॥ आत्माआत्मत्वाचानधरीभाव ॥ चिन्मात्रचिदार्णव ॥ पुंजाळलाअसे ॥ ४९ ॥ तेथेंशब्दाचाकैंचामाग ॥ जेवींप्रळयोदकींहरपलाओघ ॥ माशब्दींआत्मत्वाचालाग ॥ लागेलकाय ॥ ६५० ॥ उक्तंच ॥ अस्तिनास्तिवचनेनभाषितंभातिशब्दपरिभाषितंतथा ॥ भानहीनमपिभाषितंचमेरूपमेवनहिसंशयःक्वचित् ॥ इतिब्रह्मगीतायां ॥ जेंजेंआथीनाथीनिरूपित ॥ नानापूर्वपक्षनानासिद्धांत ॥ तेंअवघेंशब्दभाषित ॥ नावेकदिसतसे ॥ ५१ ॥ परीम्यानमोडूनि चिन्मात्रखूण ॥ नदेखोनअन्यभान ॥ शब्दगोचरनहोन ॥ रूपमात्रनिरूपिलें ॥ ५२ ॥ तैंनिरूपण दशेआलेंनाहीं ॥ एवंशब्दाचाचउगउनाहीं ॥ ऐसेंब्रह्मयाप्रतिपाहीं ॥ निगदिलेंउमाकांतें ॥ ५३ ॥ एवंआत्मत्वींनाहींपरोक्षदशा ॥ तेथेंशब्दासठावहोयकैसा ॥ आतांशब्दभागसहसा ॥ अर्थचि नाहीं ॥ ५४ ॥

**आतांबोलाभागुकांहीं ॥ असणेंजयाच्याठायीं ॥ अर्थतातरीनाहीं ॥ निपटूनियां ॥ ९८ ॥**

आत्मासर्वदारूपहीन ॥ कार्यकारणविहीन ॥ तोकोण्हीयांअर्थासजाण ॥ प्रसवलाचनाहीं ॥ ५५ ॥ आतांजेथअर्थचनाहीं ॥ तेथशब्दासयेईलकायी ॥ एवंअर्थेंवीणपाहीं ॥ शब्दतोकिमात्मक ॥ ५६ ॥

**बागुलआलाह्मणतें ॥ बोलणेंजैसेंरितें ॥ कांआकाशवोळबतें ॥ तळहातीं ॥ ९९ ॥ तैसीनिरर्थकेंजल्पें ॥ होऊनियासपडपें ॥ शोभतीजैसेलेपें ॥ रंगावरी ॥ १०० ॥**

पूर्वोक्तनिरूपणेंकरून ॥ शब्दव्यर्थजालाअर्थेंवीण ॥ कांजेअविद्येसस्वतानास्तिकपण ॥ शब्दें कायकीजे ॥ ५७ ॥ आत्माशब्दाअधींआहे ॥ ह्मणोनिशब्दतेथेंनसाहे ॥ एवंयाअभिप्रायें ॥ शब्दचमिथ्या ॥५८॥ आतांऐलाडिलजेंआहाच ॥ तेंलटिकेंचदिसेकवच ॥ जेवींबागुलह्मणतेंसाच ॥ बोलणेंजैसें ॥५९॥ लटिकाचबाळाप्रतिबागुल ॥ आलाह्मणतीपरीबोलफोल ॥ तेवींचअर्थेंवीण हेहीबोल ॥ डिंबमात्र ॥६६०॥ किंवादुरूनपाहातां ॥ आकाशाचीअतिनीचता ॥ देखिजेजेवींहाता ॥ पावेजैसें ॥ ६१ ॥ परीतेंठायींच्याठाईं ॥ समीपदूरीतयानाहीं ॥ निरावेवींपाहीं ॥ भानच कैंचें ॥ ६२ ॥ निरावेवींदिसेभान ॥ तैसेंबोलणेंचिपरीअर्थहीन ॥ जेवींपडपाचेंभूषण ॥ विषये

नेत्रां ॥ ६३ ॥ परीआतांअवघेंपोकुळ ॥ देखतदेखतटवाळ ॥ किंवाचित्रींचेंलेपकेवळ ॥ रंगमात्र ॥ ६४ ॥ तेथेंलेपाचाजोहाभाव ॥ दिसेपरीतेंअवघीमाव ॥ तेवींशब्दासीचिबरव ॥ वोडवलीयेथें ॥ ६५ ॥ एवंप्रमेयप्रमाणातीत ॥ ज्ञेयज्ञानविवर्जित ॥ रूपअरूपाचीजेथ ॥ वार्ताचिनाहीं ॥ ६६ ॥ जेथेंविक्षेपकधींनाहीं ॥ तेथेंअविद्याकैंचीकाई ॥ ह्मणोनिशब्दाचियाकांहीं ॥ नयेचिभागा ॥ ६७ ॥ सिद्धाआत्मयाससाधन ॥ नसतीयअविद्येसीनाशजाण ॥ हेंकेवळवाग्विडंबन ॥ हीनअर्थें ॥ ६८ ॥ अर्थींवाचासमर्पिली ॥ तेथवाचकताचबुडाली ॥ तेंकेवींबोलीं ॥ बोलवेआतां ॥ ६९ ॥ एवंआरोपआणिअपवाद ॥ हाशब्दाचाचसंबंध ॥ तोचनाहींआत्मासिद्ध ॥ जैसातैसा ॥ ६७० ॥ आतांयाशब्दाचेंखंडण ॥ प्रसंगाचेंउपसंहरण ॥ केलेंसेतेथअवधान ॥ श्रोतींदीजे ॥ ७१ ॥

**एवंशब्दैकजीवनें ॥ बापुडींज्ञानेंअज्ञानें ॥**
**साचपणेंवनें ॥ चित्रींचींजैसीं ॥ १०१ ॥**

जेंज्ञानाज्ञानविहीन ॥ दृङ्मात्रस्वरूपपूर्ण ॥ जेंप्राप्तजालयावीण ॥ नित्यप्राप्त ॥ ७२ ॥ तेथजें विद्यालक्षण ॥ जेंकींप्राप्तिकज्ञान ॥ आणिअविद्येचेंजेंखंडण ॥ तेंअज्ञानजाणावें ॥ ७३ ॥ असोज्ञानासीजेंजालेपण ॥ तेथेंवसतसेअज्ञान ॥ तरीज्ञानरूपासीजाण ॥ ज्ञानचिनसाहे ॥ ७४ ॥ आत्मयाआत्मप्राप्ति ॥ तेथेंचवसेअप्राप्ति ॥ प्राप्ताप्राप्तवित्पत्ति ॥ ज्ञानअज्ञान ॥ ७५ ॥ एवंवस्तूसीवस्तुज्ञान ॥ हेंकेवळवाचारंभण ॥ ह्मणोनिशब्दचिएकजीवन ॥ ज्ञानअज्ञानासी ॥७६॥ आपआपली वेद्यवेदकता ॥ तोचहाशब्दआतां ॥ तरीएकेरूपींसद्वयता ॥ आलीचनये ॥ ७७ ॥ जेवींचित्रींच्यावाटिका ॥ सपुष्पफळींमंडितदेखा ॥ परीरंगनाहींअनेका ॥ भावासीआला ॥ ७८ ॥ तेवीं एकपणनाहींफुटलें ॥ स्वरूपमात्रपाहींसंचलें ॥ तेथज्ञानाज्ञानभासलें ॥ चित्रवनजैसें ॥ ७९ ॥ अथवाचित्रींचेंवन ॥ ह्मणिजेचित्रींचिनाहींपण ॥ मातयासाचपण ॥ येईलकैसें ॥ ६८० ॥ तेवीं स्वताचिन्मात्रपूर्ण ॥ शब्दचिव्यर्थजाण ॥ तेथहीउच्चारण ॥ अज्ञानऐसें ॥ ८१ ॥ तरीअज्ञानह्मणिजेअर्थहीन ॥ आणित्याचेंविरोधिज्ञान ॥ एवंउभयासीव्यर्थपण ॥ सहजचिआलें ॥ ८२ ॥ एवंज्ञानाज्ञानदोन्हीं ॥ केवळशब्दाचीउभवणी ॥ तोशब्दचिह्मणी ॥ उमसघेवो ॥ ८३ ॥

**याशब्दाचानिमाला ॥ महाप्रळयोहोसहरला ॥**
**अभ्रासवेंगेला ॥ दुर्दिनुजैसा ॥ १०२ ॥**

अहोज्ञानाज्ञानासीमूळ ॥ शब्दचहाकेवळ ॥ तरीशब्दचिमूळ ॥ उगउनेघे ॥ ८४ ॥ अहोप्रलयार्णवसंचला ॥ आद्यंतेंवीणभरला ॥ तेथेंशब्दाचामासला ॥ हरपोनगेलापैं ॥ ८५ ॥ त्याशब्दाचेपोटीं ॥ हरपल्याप्रळयकोटी ॥ दृङ्मात्रदृष्टी ॥ सुरवाडजाला ॥८६॥ परीशब्दएकसामावला ॥ मगप्रपंचलयजाला ॥ तरीशब्दत्वेंअसेसंचला ॥ शब्दत्वेंसंहरे ॥ ८७ ॥ तोशब्दचजेथेंनाहीं ॥ तेथेंमहाप्रळयतोकाई ॥ शब्दाचसवेंपाहीं ॥ होऊनिठेला ॥ ८८ ॥ अहोमहाप्रळयह्मणिजेकाई ॥ तरीस्वात्मानुभवजोकांहीं ॥ तोशब्दाचसवेंअनुभवपाहीं ॥ नमिरवीअंग ॥ ८९ ॥ तेंराहिलेंशब्दासवें ॥ येथतंवकांहींचिनसंभवे ॥ आत्मारामींउद्भवे ॥ आणिअभिभवेकाई ॥६९०॥ जैसादुर्दिनअभ्रासवें ॥ परीसूर्यीतंवनसंभवे ॥ ह्मणोनिसूर्यासनलगेराहावें ॥ दुर्दिनासीं ॥ ९१ ॥ तेवीं शब्दचजयाजीवन ॥ तेंमरेचहीशब्देंचवीण ॥ स्वरूपींतंवशब्दाजाण ॥ उगवचनाहीं ॥ ९२ ॥ एवं ज्ञानाज्ञानेंवीण ॥ स्वरूपअसेसंपूर्ण ॥ तेथिचीखूण ॥ दाऊनदिधली ॥ ९३ ॥ आणिज्ञानाज्ञान

ह्मणोनस्तुतिसहीविसरलों ॥ माझेमीपणासीलाजिलों ॥ बोलकेपणेंसांडलों ॥ मौनेंसहित॥२५॥ परीरत्नींजेदीप्तिकांहीं ॥ तेरत्नींनिवांतचिअसेठायीं ॥ आणिनफांकितांचपाहीं ॥ विलासेफांके ॥२६॥ तेवींमाझेंबोलिकेपण ॥ असोनतुझ्याठायींमग्न ॥ आणिमग्नत्वाचीखूण ॥ नमोडतांफांके ॥ २७ ॥ अहोजीश्रीनित्यानंदा ॥ प्रभोसकळकल्याणकंदा ॥ तुझीयाकल्याणत्वेंसर्वदा ॥ कल्याणचअसे ॥ २८ ॥ परीजिव्हाआपलीगोडी ॥ नसंडीनसोनिसवडी ॥ तैसीतुझीपदपरवडी ॥ पाहोंचिआवडे ॥ २९ ॥ ह्मणोनतुझेंपादावलोकन ॥ नराहावेंकेलेंनिवींण ॥ तेचिहेंनबोलोन ॥ बोलतुअसे ॥ ३० ॥ जेवींपावलियाहीसमुद्राचेंअंग ॥ नराहेगंगेचाओघ ॥ तेवींचहेंकांहींलग बग ॥ माझ्याठायीं ॥ ३१ ॥ आतांतुझेंप्रेमनतुटावें ॥ तुजचिवानावेंतुजचिवंदावें ॥ ऐसेंकांहीं द्यावें ॥ पसायदान ॥ ३२ ॥ आतांअसोहेविज्ञप्ति ॥ कृपाकीजेकरुणामूर्ति ॥ जेमीवाणींतुझी कीर्ति ॥ अनुभवामृतव्याजें ॥ ३३ ॥ अहोआइतेंपरमामृत ॥ परीम्याजेणेंहेंआस्वादिजेत ॥ ऐसारसनेसीअद्भुत ॥ अधिकारदीजे ॥३४॥ अहोअरोचकअवघेंफिटे ॥ हेअमृतचजीव्हावावटे॥ रसरसनेचेवांटे ॥ तुटोनजाती ॥ ३५ ॥ हेंचिमागतसेंदातारा ॥ वांचूनवृथाहावचनपसारा ॥ तुझीवासयामोहरा ॥ पाहातुसेस्वामी ॥ ३६ ॥ आतांकरावेंकूर्मावलोकन ॥ म्याचहोइजेरस रूपजाण ॥ आणिआस्वादजीपूर्ण ॥ होइजेमियां ॥ ३७ ॥ पराचापांगफेडी ॥ भोग्यभोक्तृत्वा चामाघुमोडी ॥ अतृप्तीचातोडी ॥ थाराचयेथूनि ॥ ३८ ॥ मगसहजचितृप्तपण ॥ हेंहीमोडेल आठवण ॥ अवघाचिद्रसचिजाण ॥ वोतोनिघाली ॥ ३९ ॥ हेंहीअसोजीदाता ॥ मजगोंवी कायआतां ॥ तुझ्याचरणयुग्मींमाथा ॥ हेंचिपुरे ॥ ४० ॥ अहोसत्पदआणिचित्पद ॥ हेंतुझेंच रणद्वंद्व ॥ माझीआवडीहाआनंद ॥ जडोनिगेला ॥ ४१ ॥ ह्मणोनिमजनाहींमीपण ॥ सर्वकाळ माझेंमन ॥ नकरितांचिजाण ॥ आइतेंअसें ॥ ४२ ॥ ऐसामनचंद्रमाकळापूर्ण ॥ देखोनउल्हा सलाकरुणासिंधुआपण ॥ परीनवलहेंउत्थान ॥ वोहटुनेघे ॥ ४३ ॥ अहोइयेकृपापौर्णिमेच्या ठायीं ॥ दाटलियाचंद्रकळाचचंद्रींपाहीं ॥ तेंहीसांडिलेंतिथिप्रवाहीं ॥ वांटियाजाणें ॥ ४४ ॥ एवंचंद्रकळाभेदमोडला॥ह्मणोनिवाढीहोविसरला॥ह्मणोनसागरेंहीसांडिला॥उल्हासवोहटु ॥ ४५ ॥ आतांसागरकरुणारसेंउचंबळला ॥ तोमागुतानव्हेचिथेकुला ॥ एवंइयासुखार्णवींबु डाला ॥ मनचांदुहीथिता ॥ ४६ ॥ अहोहोतेंजैंपितापुत्रपण ॥ तऱ्हींवागविलीपितृत्वाचीखूण॥ आत्मावैपुत्रनामासिहेजाण॥ श्रुतीचेंवचनसाक्ष ॥४७॥ अहोनित्यानंदाब्धिउचंबळला ॥ तेथेंमन चंद्रमग्नजाला ॥ परीमग्नत्वेंसीउसासला ॥ सुखभोगानावेक ॥४८॥ तोमीनित्यानंदसागरीं॥ कल्लोळत्वेंक्रीडाकरी ॥ सज्जनाचीयानमस्कारीं ॥ चरणारविंदा ॥४९॥ प्रभूहेअनुभवामृत खाजें ॥ आह्लादिधलेंजीगुरुराजें ॥ हेंस्वीकारावेंवोजें ॥ तेसिकवावेंतुह्मी ॥५०॥ तुह्मीनित्यानंद निर्झर ॥ नित्यानंदस्वामीअतिचतुर ॥ मीतुमचानिपटनाकिंकर ॥ पायधुळीतुमची ॥ ५१ ॥ यावरीसंताचेंअनुमोदन ॥ पावोनआरंभिलेंविवरण ॥ नित्यानंदचरणबैसऊन ॥ हृदयराउळीं ॥ ५२ ॥ अहोतयातेजाचीदिपवाळी ॥ हेविवरणवाटउजळी ॥ आतांसंतराउळींघाली ॥ वाग्वेलपत्री ॥ ५३ ॥ अहोन्यूनचिपूर्णत्वाघ्यावें ॥ अवधानउचितघ्यावें ॥ शिवकल्याणव्हावें ॥ जगेंचियेणें ॥ ५४ ॥ मागेशब्दाचेंखंडण ॥ दाऊनिसंपविलेंप्रकरण ॥ अविद्येचाहीअभावजाण॥ दाखविलातेथें ॥ ५५ ॥ सवेंचिआतांहेंप्रकरण ॥ आरंभिलेंअज्ञानखंडण ॥ तरीअविद्येह्नआन॥ अज्ञानतेंकायी ॥ ५६ ॥ तरीयेथेंदिसतसेअनुमान ॥ जैंमागेंदाविलेंअविद्याखंडण ॥ त्याचेंच आतांदृढीकरण ॥ अज्ञानमिसें ॥ ५७ ॥ परीनावेकविरोधउभाकीजे ॥ तोवृथाह्मणोनिदाविजे॥

मगविरोधचिनुपजे ॥ सर्वथैव ॥ ५८ ॥ वाटेखांबउभाआहे ॥ तेथेंपुरुषभानह्मणीहोये ॥ ह्मणो नवाटसारासांगोंये ॥ खूणतेथिंची ॥ ५९ ॥ अगापंथशोभेलागीं ॥ खांबउभारिलामार्गीं ॥ तेथें नकरावीवाउगी ॥ पुरुषशंकातुह्मीं ॥ ६० ॥ तेवींमिथ्यादावितांअज्ञान ॥ तेचिअर्थपुष्टिलागून ॥ पूर्वपक्षअसतीतेथेंसाचपण ॥ धरावेंह्मणी ॥ ६१ ॥ यालागींपूर्वपक्षलोटून ॥ मिथ्यादावितसे अज्ञान ॥ यालागींफिरोन ॥ बोलणेंकेलें ॥ ६२ ॥ अहोहालऊनिबळकाविलें ॥ तेंवज्रप्रायनिष्टंक केलें ॥ ह्मणोनवायांचउत्पादिलें ॥ विरोधिमत ॥ ६३ ॥ अगापराअपराउक्ति ॥ त्यापरार्थी चिअवधियाझोंबती ॥ अवसानसिद्धांतीं ॥ अवधियांएक ॥ ६४ ॥ नावेकउभेकरूनीपूर्वपक्षातें ॥ साधूनघ्यावेंसिद्धांतातें ॥ मगसिद्धांतींचथितें ॥ सिद्धांतत्वउडे ॥ ६५ ॥ संमतिः ॥ शास्त्राणा मपिनिर्देशस्तर्काणामपिभाषणं ॥ अन्यद्विकल्पजालंयत्तदुक्तिश्चसमासतः ॥ १ ॥ अन्यथानपरंब्रह्म श्रुतिःसाध्वीनतत्परा ॥ चित्तपाकानुगुण्येनश्रोतॄणांपरमाश्रुतिः ॥ २ ॥ सोपानक्रमतोदेवोमंदंमंदं हितंनॄणां ॥ उपदिश्यन्विषन्नापिपुनःपक्वाधिकारिणः ॥ ३ ॥ एतदात्म्यमिदंसर्वमित्याहंपरमाद्वयं ॥ इतिब्रह्मगीतायां ॥ नानाशास्त्रतर्कभाषा ॥ आणिकल्पजाळशतसहस्रशा ॥ याअवधियाहीविशेषां ॥ ब्रह्मचिविशेष्य ॥ ६६ ॥ ब्रह्माहूनपर ॥ नाहींश्रुतिचेंजिव्हार ॥ आतांचित्तपाकानुसार ॥ मंदा धिकारां ॥ ६७ ॥ ह्मणोनमंदमंदसोपानक्रम ॥ बोलोनदाविलेंपक्वाधिकारवर्म ॥ एवंअवघाअनु क्रम ॥ सिद्धांतींझोंबे ॥ ६८ ॥ अहोमंदाधिकारालागून ॥ क्रमसांगितलासोपान ॥ मगपक्वाधि कारत्यासीचजाण ॥ सर्वात्मताबोलिले ॥ ६९ ॥ ह्मणोनअपरजेंमत ॥ तेंपरार्थासीचद्योतित ॥ ह्मणोनपूर्वपक्षसाधित ॥ अज्ञानअभाव ॥ ७० ॥ किंवासच्चिदानंदआत्मापूर्ण ॥ येथेंशब्दाचेंके लेंखंडण ॥ अविद्याहीजाण ॥ खंडिलीतेथें ॥ ७१ ॥ एवंव्यतिरेकाचीखूण ॥ दाऊनखंडिलेंअज्ञा न ॥ आतांअन्वयेंहीकरून ॥ साधितोंतेंचि ॥ ७२ ॥ अभावाआलेंअज्ञान ॥ मगसहजचिज्ञानीनां हींज्ञानपण ॥ अन्वयव्यतिरेकाचीखूण ॥ हरपलीतेथें ॥ ७३ ॥ अज्ञानाचाचिअभाव ॥ तरीवि श्वासीचकेंउताठाव ॥ स्वतःसिद्धआत्माराव ॥ संचलाअसे ॥ ७४ ॥ ऐसेंकांहींअवांकून ॥ आरं भिलेंअज्ञानखंडण ॥ यालागींअवधान ॥ मागतुसेश्रोतयां ॥ ७५ ॥ मागेंप्रबंधमिसें ॥ अवसानीं बोलिलेंऐसें ॥ जैंशब्देंचिजीवनअसे ॥ ज्ञानाअज्ञाना ॥ ७६ ॥ तस्मात्स्वरूपाठायीं ॥ ज्ञानाज्ञान विशेषनाहीं ॥ ऐसेंपडलेंठायीं ॥ येणेंबोलें ॥ ७७ ॥ अहोअर्थेंवीणशब्दजाण ॥ तेंबोलिजेवाचारं भण ॥ वाचारंभणतेंनिपटून ॥ स्वरूपींनसे ॥ ७८ ॥ ऐसापूर्ववाक्याचाअंतरार्थ ॥ देखोनशंका उठत ॥ तेंहीअसेपरिहरित ॥ अवधानद्यावें ॥ ७९ ॥ अहोज्ञानाचेंउत्कर्षें ॥ ज्ञानचिनयेज्ञानदशे ॥ तेथेंअज्ञानकैसें ॥ थारोंशकेपां ॥ ८० ॥ ज्ञानक्षोभोनपाहे ॥ तैंअज्ञानकोठेंआहे ॥ मगसहजचिए कलेंहोये ॥ ह्मणोननिवांतज्ञान ॥ ८१ ॥ एवंज्ञानींनाहींज्ञानपण ॥ यासीअज्ञानचिकींकारण ॥ अज्ञा नतंवनिपटून ॥ असेनायेथें ॥ ८२ ॥ हेंपूर्ववाक्याचेंगुह्यजाण ॥ जैंनिःशेषनसेअज्ञान ॥ येथेंशंके चीखूण ॥ तेंऐसीअसे ॥ ८३ ॥ अहोजालेंअज्ञानपरिहरण ॥ मगज्ञानत्वेंनसेज्ञान ॥ तेथेंसहजचि अज्ञान ॥ अभावाआलें ॥ ८४ ॥ तरीज्ञानदृष्टिपाहातां ॥ कैंचीअज्ञानाचीवार्ता ॥ परीहाज्ञानो त्कर्षनयेहाता ॥ तैंअज्ञानासिद्ध ॥ ८५ ॥ ज्ञानदृष्टिअज्ञानवावो ॥ परीअत्यंतिकनव्हेअभावो ॥ ऐ सापूर्वपक्षाचाभावो ॥ सुचोनबोले ॥ ८६ ॥ यापूर्वपक्षानुसार ॥ पुढेंसूचिलापरिहार ॥ तोआ तांसविस्तर ॥ प्रसंगेंसांगे ॥ ८७ ॥

**येऱ्हवींतरीअज्ञाना ॥ जैंज्ञानानसेक्षोभना ॥**
**तैंतऱ्हींकाना ॥ खालींचदडे ॥ १ ॥**

विचारकरितांचजैंनाहीं ॥ तेंपूर्वींहोतेंहातर्कुकायी ॥ तस्मात्पहिलेंचिनसेयेथेंकांहीं ॥ शंका नलगे ॥ ८८ ॥ अहोऐसाकोण्हीकाळनसे ॥ जोज्ञानेंवीणरिताअसे ॥ आतांअज्ञानतेंकैसें ॥ कास याह्मणावें ॥ ८९ ॥ अगाज्ञानक्षोभजऱ्हींनाहीं ॥ ह्मणिजेज्ञानकरीनपाहतांही ॥ अज्ञानाचीरीति तेकाई ॥ कासयाऐसी ॥ ९० ॥ अहोज्ञानाचाउत्कर्ष ॥ हातुमचामतनिर्देश ॥ सिद्धांतेंसामा न्यविशेष ॥ असेनाकधीं ॥९१॥ असोज्ञानविशेषताहीनसतां ॥ अज्ञानतंवआलेंनाहींश्रवणपंथा॥ अज्ञानाचीवार्ता ॥ नाऐकतीकान ॥ ९२ ॥ कानाखालींदडेह्मणिजेऐसें ॥ जेंश्रवणासीविषयहो तनसे ॥ आतांशब्दींजेंदिसे ॥ तेंतंवस्फुरद्रूप ॥ ९३ ॥ अगाअज्ञानह्मणिजेनाहींज्ञान ॥ तेंकेवींश ब्दासीउठवीजाण॥ज्ञानलोपवितेंकोण॥ अज्ञानाभासवितें ॥९४॥ आतांअज्ञानकारणनव्हे ॥ तरी कारणेंवीणकार्यनसंभवे ॥ ज्ञानापासूनअज्ञानहोआवें ॥ हेंतंवसर्वथानघडे ॥ ९५ ॥ अज्ञानाची करणी ॥ ऐकिलीनाहींजीकानीं ॥ श्रवणाबोधवितेंह्मणी ॥ अज्ञानह्मणाल ॥ ९६ ॥ अहोश्रवणश ब्देंयेणें ॥ मनचक्षुरादिकेंकरणें ॥ इत्यादिकांसीविषयह्मणे ॥ अज्ञानहोय ॥ ९७ ॥ जेंश्रवणासीक रीश्रवणाधिकारी ॥ जेंकींडोळ्यांतेंदेखतेंकरी ॥ असोमनादिकेंस्वव्यापारीं ॥ प्रवर्ततीजेणें॥९८॥ तेंह्मणीहोईलअज्ञान ॥ शंकाघेऊननघ्यावेंरान ॥ एवंअज्ञानसद्भावींजाण ॥ अबद्धमत ॥ ९९ ॥ आतांजरीकरणीवीण ॥ ह्मणालहेंएकअज्ञान ॥ तरीहेंमतकोण ॥ मानीलसाच ॥ १०० ॥ करणी वीणअज्ञान ॥ ह्मणालप्रत्यक्षअसेलजाण ॥ तेंअज्ञानदेखेऐसेंकोण ॥ आहेयेथें ॥ १ ॥ देखिजेजेंना आयिकीजे ॥ बुध्यादिकींहीनेणिजे ॥ करणीचिकांहींनुपजे ॥ अज्ञानकरी ॥२॥ उक्तंच ॥ येनश ब्दंरसंरूपंगंधंजानासिराघव ॥ तमात्मानंपरंब्रह्मजानीहिपरमेश्वरं ॥१॥ इतिवासिष्ठे ॥ ॥ तरी अज्ञानाचीअस्तिक्यता ॥ मानावीआतांकवणियासत्ता ॥ एवंज्ञानहीनक्षोभतां ॥ श्रवणासीनये ॥३॥ उक्तंच ॥ खलुनाभासतेभानंब्रह्मवस्त्वेवकेवलं ॥ भानसंबंधतोभानमितिवार्ताप्यसंगता ॥ ॥ इतिब्रह्मगीतायां ॥ अज्ञानह्मणिजेअप्रकाशमान ॥ तरीतेथूनकेवींघडेहेंभान ॥ आतांभानभानें करून ॥ हेंहीनघडे ॥४॥ एवंवस्तूसीनाहींखंडण ॥ आतांकैंचेंयेथेंअज्ञान ॥ अज्ञानवार्ताचिजाण॥ अज्ञाननव्हे ॥ ५॥ आशंका ॥ आत्मानिरंतरपूर्ण ॥ अनादिलटिकेंअज्ञान ॥ ऐसीतात्विकखूण ॥ प्रकटलीजेकीं ॥६॥ याप्रगटणियांऐलिकडे ॥ अज्ञानहोतेंसेनिवडे ॥ तरीअत्यंतिककेवींघडे ॥ अ ज्ञानअभाव ॥ ७ ॥ हेखूणलाधावयाकारण ॥ जालेंअज्ञानपरिहरण ॥ तस्मात्जालेंअज्ञान ॥ का रणस्थानीं ॥८॥ येआशंकेपरिहार ॥ दिधलाअसेपरिकर ॥ तेंवचनसविस्तर ॥ कीजेलस्पष्ट॥९॥

**आडसूनिअंधारीं ॥ खद्योतदीप्तिशिरीं ॥**
**तैसेंलटिकेवरी ॥ अनादिहोय ॥ २ ॥**

अंधकाराचेनिदोषें ॥ नावेकखद्योतींदीप्तिभासे ॥ मगसूर्योदयींआपैसें ॥ उमगेचिनातें ॥ ११० असतांहीअंधारीं ॥ दीप्तिभासेदीप्तिनकरी ॥ मगस्पर्शतांहीसूर्यकरीं ॥ असेलकाई ॥ ११ ॥ अं धकारींजऱ्हींभासे ॥ तऱ्हींदीप्तिकरुनव्हेंजैसें ॥ तेवींअज्ञानऐसेंदिसे ॥ परीअज्ञाननव्हे ॥ १२ ॥ खद्योतहीप्रकाशहीन ॥ तमहीतंवतैसेंचजाण ॥ तेथेंनावेकद्दुटद्दुटीतेकोण ॥ साचमानी ॥ १३ ॥ तेवींअज्ञानभावितांही ॥ अज्ञानत्वतेथेंनाहीं ॥ आतांसिद्धप्रत्ययीं ॥ कायअनुमानत्याचें ॥ १४ ॥ अहोअप्रत्ययआणिअज्ञान ॥ रूपएकचिजाण ॥ तरीअसेप्रत्ययेंवीण ॥ तेंसाचकेवीं ॥ १५ ॥ अप्र त्ययासीचपाहीं ॥ अप्रत्ययत्वनाहीं ॥ ह्मणोनभाविलेंजेंकांहीं ॥ तेंअज्ञाननव्हे ॥ १६ ॥ नेणीवेचें पांघुरण ॥ घेऊनभासेअज्ञान ॥ तेथेंहीअज्ञानपण ॥ नसेतया ॥ १७ ॥ अहोनेणीवेचेंमिश ॥ वां

चूनजाणीवसावकाश ॥ कांजैंवस्तुनिर्दोष ॥ काळत्रयीं ॥ १८ ॥ जाणीवेनसतांहानी ॥ कैंचीअज्ञानाचीमिरवणी ॥ एवंनेणीवेसीभेदूनि ॥ जाणीवचसंचली ॥ १९ ॥ ह्मणोनज्ञानाचियाअखंडता ॥ ज्ञानाचीपावेप्रकटता ॥ तेंअज्ञानाचाभावधरित ॥ न्यायाचुकी ॥ १२० ॥ जेवींलहरीआडकरूनि ॥ लहरींमाजींलपेपाणी ॥ मागुतीलहरीनिवारूनि ॥ आपणप्रकटे ॥ २१ ॥ तेवींआपलेपरुपें ॥ स्वरूपआपणामाजींलपे ॥ मगआपलेनिचप्रतापें ॥ आपणप्रकटे ॥ २२ ॥ एवंभावितांही अज्ञान ॥ भावनाचनसेज्ञानहीन ॥ आतांलटिकेंपरीजाण ॥ अनादिअसे ॥ २३ ॥ ज्ञानाचेनिस्वभावें ॥ अज्ञानकिंचित्भासावें ॥ त्याभासासवें ॥ अवघेंजगचि ॥ २४ ॥ एवंअज्ञानत्वरूपाआलें परीकार्यनिर्वाहकनाहींजालें ॥ ह्मणोनउमटलेंअसतांचगेलें ॥ हारपोनि ॥ २५ ॥ आतांहाअनादिस्वभाव ॥ तोशब्दींचपावेवरव ॥ जेवींखद्योतींतेजभाव ॥ अंधारींधरिला ॥ २६ ॥ परंतुलटिकेपणतंवनचुके ॥ ऐसेंचिदृष्टांतेंसीनिकें ॥ बोलिलाअसेकौतुकें ॥ मूळप्रबंधें ॥ २७ ॥

**जैसीस्वप्नास्वप्नींमहिमा ॥ तमींमानुअसेतमा ॥**
**तेवींअज्ञानगरिमा ॥ अज्ञानींचि ॥ ३ ॥**

स्वप्नींस्वप्नसाचें ॥ परीलटिकेपणतंवनवचे ॥ तेवींअज्ञानतमींतमाचें ॥ महिमानअसे ॥ २८ ॥ तेथेंअंधारासीचअंधारपण ॥ असेकार्यकारणेंवीण ॥ भासलेंअसतांचिजाण ॥ निर्वाहनपवे ॥ २९ ॥ परंतुप्रकाशाच्याघरीं ॥ नसोनहेउगीचवारी ॥ तेवींवास्तव्यनाहींजऱ्हीं ॥ तऱ्हींअज्ञानत्वआवडे ॥ १३० ॥ अहोअज्ञानऐसेंबोलतांजाण ॥ केवळशब्दचशोभायमान ॥ वांचूनअर्थत्वेंप्रमाण ॥ मानूंनयेकीं ॥ ३१ ॥ भावितांचिअज्ञान ॥ भावनामात्रचिजाण ॥ जैसेंस्वप्नींचेंसाचपण ॥ स्वप्नींचअसे ॥ ३२ ॥ ह्मणोनिअज्ञानाचीथोरी ॥ अज्ञानींचिअसेखरी ॥ परीजाणावयाचीपरी ॥ येथेंनाहीं ॥ ३३ ॥ अहोजाणावयाजेंनाहीं ॥ तेंअसोनकाजकाई ॥ पुढेंइयेविषयीं ॥ दृष्टांतअसे ॥ ३४ ॥

**कोल्हेरीचेवारु ॥ नयेतीधारकींधरूं ॥**
**नयेलेणाशृंगारु ॥ वोडंबरीचा ॥ ४ ॥**

जेवींगंधर्वनगरींच्यावारुवांपांहीं ॥ दिसतचसाचपणनाहीं ॥ तेवींचिवोडंबरीचेंजेंकांहीं ॥ दिसतचिमिथ्या ॥ ३५ ॥ हेंदिसेतैसेंनाहीं ॥ तेवींअज्ञानत्वरूपायेतांही ॥ नसेतेथेंकांहीं ॥ अज्ञानार्थु ॥ ३६ ॥ अहोजेंजेंकांहींप्रमेयजाण ॥ त्यासीअर्थाचेनिअसेसाचपण ॥ येथेंविचारितांनिपटून ॥ कोरडाचिशब्दु ॥ ३७ ॥ अहोभलतेहीपदार्थी ॥ वादकीजेआथीनाथी ॥ तेथेंबुझावितांसिद्धांतीं ॥ विचारूनिपाहा ॥ ३८ ॥ मगविचारजेथेंस्थिरावे ॥ तेंचसत्यत्वायेंपावें ॥ आणिविचारेंजेंअभिभवे ॥ तेंपहिलेंचनाहीं ॥ ३९ ॥ एवंअज्ञानभावेंअज्ञान ॥ पावलेंनाहींसाचपण ॥ मांपाहिजेजेंनिर्वाळून ॥ तेथेंकैंचें ॥ १४० ॥

**हेंजाणणेंयाच्याघरीं ॥ खोंचिलेंहीआननकरी ॥**
**कायीचांदिणांउठेलहरी ॥ मृगजळाची ॥ ५ ॥**

पहिलेंचजेंनाहींजाण ॥ तेंविचारेंकायहोईलआन ॥ ह्मणिजेजाणतांसाचपण ॥ येईलकैंचें ॥ ४१ ॥ नसोनवाउगेंभान ॥ तेंहीनदिसेनिपटून ॥ लाधलियाखूण ॥ सम्यक्ज्ञानाची ॥ ४२ ॥ जेवींप्रकटलियाशांतचंडकीर्णे ॥ तेथेंकेवींउठेमृगजळभान ॥ तेवींअखंडैकजेंज्ञान ॥ तैंअज्ञान कैंचें ॥ ४३ ॥ सूर्यप्रकाशींजाण ॥ मिथ्याचपरीउगेंचभान ॥ त्याप्रकाशासीजैंसौम्यपण ॥ तेथेंभा

नहीनसे ॥४४॥ तेवींज्ञानींजंवज्ञानपण ॥ तेथेंनाथिलेंचिपरीअज्ञानभान ॥ आतांज्ञानींचनाहींज्ञातृत्वजाण ॥ तेथेंअज्ञानकैंचें ॥ ४५ ॥ ह्मणोनजालियासम्यक्ज्ञान ॥ देखिलेंअज्ञानाचेंपरिहरण ॥ यापूर्वपक्षास्तवजाण ॥ निरोपिलेंऐसें ॥ ४६ ॥ पुढेंहीहेंचिदृढीकरण ॥ करावयाउक्तनिरोपण ॥ सिद्धाचासिद्धजाण ॥ उपपादितअसे ॥ ४७ ॥

**आणिज्ञानहेंजेंह्मणिजे ॥ तेंअज्ञानचिपांडुजें ॥**
**एकलपवूनदाविजे ॥ एकनव्हे ॥ ६ ॥**

अगाऐसेंजेंमानिलेंकांहीं ॥ जेंज्ञानोदयींअज्ञाननाहीं ॥ येन्हवींतंवपाहीं ॥ पाहेंचऐसें ॥ ४८ ॥ जरीजालियाज्ञानाचाउदय ॥ मानिजेअज्ञानाचालय ॥ तरीअज्ञानहाअभिप्राय ॥ ज्ञानासीचये ॥ ॥४९॥ तेथेंअज्ञानदिसेलोपलें ॥ परीज्ञानत्वेंतेंचिउठलें ॥ मगकैसेंनहीहरलें ॥ नजायतेंकीं ॥१५० अहोवास्तवेंअज्ञानअसे ॥ तरीअज्ञानभासकुचिभ्रंशे ॥ मगकैसेनहीनसे ॥ नाशिलियाही ॥ ५१ ॥ ह्मणोनवास्तवेंनसेअज्ञान ॥ तेंनाशोनसम्यक्ज्ञान ॥ ऐसीकांहींखूण ॥ अठवेजरी ॥ ५२ ॥ तरी ज्ञानासीआलेंलटिकेपण ॥ नसोडिचयेथअज्ञान ॥ तैंज्ञानाभिधान ॥ विटंबनमात्र ॥ ५३ ॥ तरी हेंआहेकींनाहीं ॥ ऐसेंपाडावयाठायीं ॥ पुढेंइयेचविषयीं ॥ चालिलाग्रंथु ॥ ५४ ॥

**असोआतांहाप्रस्तावो ॥ अधींअज्ञानाचाधांडोळाघेवो ॥**
**मगतयाचासाचीलाहो ॥ ज्ञानहीलटिकें ॥ ७ ॥**

अज्ञानआणिज्ञानअसे ॥ तरीदोंहींसव्यर्थतादिसे ॥ ह्मणोनहेंअसोऐसें ॥ बोलिलामुळीं ॥ ॥ ५५ ॥ अज्ञानाचामागुघेतां ॥ तेंसत्यत्वेंनसांपडेहाता ॥ तरीज्ञानलटिकेंह्मणतां ॥ लाजकाई ॥ ॥५६॥ह्मणोनअज्ञानआहेकिंवानाहीं ॥ हेंआदरेंपाडावेंठायीं ॥ उक्तीइयेविषयीं ॥ परिकराअसती

**याअज्ञानज्ञानातें ॥ अंगींचिआहेजिथें ॥**
**तरीजेथेंअसेतयातें ॥ नेणकांनकरी ॥ ८ ॥**

अहोअज्ञानपदार्थनव्हे ॥ मास्वतंत्रेंचअसोंलाहे ॥ आतांधर्ममात्रचिआहे ॥ तरीप्रमाणानये ॥ ॥५८॥ हेंअज्ञानजेथेंअसतें ॥ तैंअसताठावनेणकरितें ॥ तरीऐसाठावनाहींजेथें ॥ अज्ञानअसेहें ॥ ॥५९॥ काळत्रयाच्याठाईं ॥ ज्ञानासीहानीनाहीं ॥ तरीअज्ञानहेंपाहीं ॥ कोठेंअसेपां ॥ १६० ॥ तृणापासूनब्रह्मवरी ॥ एकिचैतन्याचीचकुसरी ॥ पूर्णत्वाहारी ॥ आलीचनाहीं ॥ ६१ ॥ एवंपूर्णानंदसागरीं ॥ उठेलअज्ञानलहरी ॥ हेंकायचतुरीं ॥ मानूंयेईल ॥६२॥ संमतिः ॥ यद्वात्मानंसकलवपुषामेकमंतर्बहिस्थंदृष्ट्वापूर्णंखमिवसततंसर्वभांडस्थमेकं ॥ नान्यत्कार्यंकिमपिसततंकारणाद्भिन्नरूपंनिस्त्रैगुण्येपथिविचरतांकोविधिःकोनिषेधः ॥ १ ॥ इतिशुकोक्तिः ॥ ॥ एवंकार्यकारणाहून ॥ सर्वथानुठीभिन्न ॥ ह्मणोननिपटूनअज्ञान ॥ सद्भावानये ॥ ६३ ॥

**अज्ञानजेथेंअसावें ॥ तेणेंसर्वनेणहोआवें ॥**
**ऐसीजातिस्वभावें ॥ अज्ञानाची ॥ ९ ॥**

अज्ञानाचाअर्थ ॥ नेणणेंयाचासंकेत ॥ तरीस्फुरद्रूपसमस्त ॥ आइतेंअसे ॥ ६४ ॥ त्यास्फुरद्रूपाच्याठाईं ॥ अज्ञानअसतेंकांहीं ॥ तरीस्फुरद्रूपचिपाहीं ॥ लोपातेंपावतें ॥ ६५ ॥ मगअज्ञानें कोठेंउमटावें ॥ चराचरेंकेवींअसावें ॥ ह्मणोनअज्ञानसद्भावपावे ॥ ऐसेंनाहीं ॥ ६६ ॥ आतांमागुतापूर्वपक्षघेऊन ॥ पुढेंबोलिलासेवचन ॥ आणीकपदेंचिपरिहरण ॥ करीलत्याचें ॥ ६७ ॥

**तरीशास्त्रमतऐसें ॥ जेआत्माचिअज्ञानअसे ॥**
**आणितेणेंचितोगिवसे ॥ आश्रोजरी ॥ १० ॥**

मतांतरेंऐसेंआहे ॥ जेंआत्माचिअज्ञानजेहें ॥ पूर्वार्धेंऐसीहे ॥ आशंकाकेली ॥ ६८ ॥ येथील उरलेंअर्धपद ॥ लाऊनपुढेंसंबंध ॥ आशंकाविविध ॥ निराकरिजे ॥ ६९ ॥

**तरीनुठितांदुजें ॥ जैंअज्ञानआहेबीजें ॥**
**तैंतेचिआथीहेंबुझे ॥ कोणयेथें ॥ ११ ॥**

मतवादीऐसेंबोलिला ॥ हाचिआश्रोतुह्मांगिवसला ॥ तरीमतपक्षचिउडाला ॥ त्याचेचि बोलें ॥ १७० ॥ जेंअज्ञानदुजेंनाहीं ॥ आत्माचिअज्ञानकांहीं ॥ तरीआत्माअज्ञानपाहीं ॥ बुझतें कोण ॥ ७१ ॥ किंवाअज्ञानचअसतेंबीजें ॥ तैंतेथूनकैंचेंउठतेंदुजें ॥ जेणेंदुजेनजाणिजे ॥ आत्मा अज्ञान ॥ ७२ ॥ तस्मात्अज्ञानाह्मूनवेगळें ॥ त्यासीचिअज्ञानऐसेंकळे ॥ आत्माआत्मलीळे ॥ ज्ञान रूप ॥ ७३ ॥ आत्माअसेअज्ञान ॥ तरीआत्मयाजाणतेंकवण ॥ करणेंमनादिकरून ॥ जाणती काई ॥ ७४ ॥ विषयभोग्यहोती ॥ परीस्वतभोगनपवती ॥ विषयांचीग्रहणशक्ति ॥ इंद्रियेंवतें ॥ ७५ ॥ तेइंद्रियेंप्राणेंवीण ॥ स्वतांनपावतीचळण ॥ तेइंद्रियेंआणिप्राण ॥ मनेंवीणस्तब्ध॥७६॥ आतांअवघ्यांसीअधिष्ठान ॥ आलेंमनासीयामनपण ॥ त्यामनाचेंरूपजाण ॥ संकल्पमात्र ॥७७॥ त्यासंकल्पींसंकल्पपण ॥ नसेसंकल्पाअधीन ॥ त्याचेंहीअधिष्ठान ॥ चैतन्यमात्र ॥ ७८ ॥ एवं इंद्रियादिविलासेंजाण ॥ विलासलेंएकलेंचैतन्य ॥ चैतन्यह्मणिजेपूर्ण ॥ ज्ञानमात्र ॥ ७९ ॥ अहो हेमनचक्षुरादिकें ॥ सर्वथाअबोधात्मकें ॥ बोधरूपअसकें ॥ आत्मस्वरूप ॥ १८० ॥ त्याबोधस्व रूपेंवीण ॥ रूपासीचयेपैंकोण ॥ एवंसर्वत्रसर्वदापूर्ण ॥ बोधमात्र ॥ ८१ ॥ त्याबोधरूपालोप नाहीं ॥ ह्मणोनतेथेंनसेअन्यथाकांहीं ॥ जेवींघृतत्वेंनसेपाहीं ॥ कणिकाउगउ ॥ ८२ ॥ एवंआ त्मानिखळज्ञानघन ॥ तोआत्माजरीअज्ञान ॥ तरीअज्ञानचिकोण ॥ जाणतेंपांयेथें ॥ ८३ ॥ एवं यापदाचेंविवरण ॥ जाहालेंपुढिलेपदींअनुमोदन ॥ तेंहींआतांसावधान ॥ परिसावेंहोजी॥८४॥

**अज्ञानतंवआपणयातें ॥ जडपणेंनेणेंनिरुतें ॥**
**आणिप्रमाणप्रमाणातें ॥ होतआहे ॥ १२ ॥**

आतांआत्माजरीअज्ञान ॥ तरीअज्ञाननिखळजडपण ॥ आणितेंआपणयांजाण ॥ जडत्वेंनेणें ॥ ८५ ॥ आणिअज्ञानहेंप्रमाण ॥ प्रमाणींसाधिलेंसेजाण ॥ ह्मणोनप्रमाणासीकारण ॥ अज्ञान नव्हे ॥ ८६ ॥

**यालागींजरीअज्ञान ॥ करीलआपुलेंज्ञान ॥**
**हेंह्मणतखेवोघेववीमौन ॥ विरोधुचि ॥ १३ ॥**

यालागींअज्ञानहेंप्रमाण ॥ अज्ञानेंचकेलेंसेजाण ॥ ऐसेंहेंवलगण ॥ अर्थहीन ॥ ८७ ॥ अहो जियेबोलींअर्थुनाहीं ॥ तोबोलचिनव्हेपाहीं ॥ ह्मणोनअज्ञानविषयकांहीं ॥ बोलतांचिमौन ॥८८॥ ह्मणोनअज्ञानप्रमाणजेंहें ॥ तेंआत्मेनिप्रकाशिलेंपाहें ॥ तेंआत्मत्वींकेवींसाहे ॥ अज्ञानहेतू ॥८९॥ यालागींआत्मत्वींअज्ञान ॥ हेंमुख्यविरुद्धवचन ॥ आतांअज्ञानासस्वतंत्रपण ॥ अर्थुचिनघडे ॥१९०॥ अज्ञानेंजरीअसावें ॥ तरीजाणतयानेणकरावें ॥ तरीजाणतेंतेंस्वभावें ॥ वस्तुमात्र॥९१॥

अहोजाणतेंदुसरेंअसतें ॥ तरीएकासीअज्ञानेंआवरिजेतें ॥ दुसरियानेंजाणिजेतें ॥ अज्ञानऐसें ॥ ९२ ॥ ॥ उक्तंच ॥ वस्तुतोनास्तिचाज्ञानंचित्प्रकाशविरोधतः ॥ इतिब्रह्मगीतायां ॥ अहो ऐसेंकैंचेंअज्ञान ॥ जेंचित्प्रकाशापडेआवरण ॥ आतांचित्प्रकाशानावरितांजाण ॥ अज्ञानतेंकि मात्मक ॥ ९३ ॥ एवंअज्ञानसमूळनाहीं ॥ वस्तुएकलीकालत्रयीं ॥ ह्मणोनयेविषयीं ॥ पुढेंही बोले ॥ ९४ ॥

आणिजाणतीवस्तुएक ॥ तेयेणेंअज्ञानेंकीजेमूर्ख ॥
तैंअज्ञानहेंलेख ॥ कवणधरी ॥ १४ ॥

ह्मणोनस्वरूपाहूनिकांहीं ॥ जाणणेंदुसरेठायीं ॥ वस्तुतातरीनाहीं ॥ निर्धारेंसी ॥ ९५ ॥ ॥ श्रुतिः ॥ जाग्रत्स्वप्नसुषुप्त्यादिप्रपंचोयत्प्रकाशते ॥ तद्ब्रह्माहमितिज्ञात्वासर्वबंधात्प्रमुच्यते ॥ १ ॥ इति ॥ एवंसर्वप्रकाशाचेंस्थान ॥ एकलेंवस्तुमात्रज्ञान ॥ तेंजरीयेणेंअज्ञानेंजाण ॥ कीजेतेमूर्खे ॥ ९६ ॥ अहोअज्ञानाचीखूण ॥ तेंनेणणेंचिनिखळपूर्ण ॥ अहोमूर्खासीमूर्खपण ॥ प्रत्ययानयेपैं ॥ ९७ ॥ यालागींजाणणेंहोयमूर्ख ॥ तरीअज्ञानाचेंनसतेंलेख ॥ ह्मणोनचिवस्तुएक ॥ कालत्रयींकीं ॥ ९८ ॥ आतांअज्ञानासीअज्ञानभान ॥ तरीअज्ञानतेंचिज्ञान ॥ येणेंहीअज्ञान ॥ नाहींचजालें ९९ अहोअज्ञानप्रत्ययायेतें ॥ तरीसुखेंआहेह्मणिजेतें ॥ ह्मणोनिपुढेंमागुतें ॥ बोलतुअसे ॥ २०० ॥

अहोआपणयांहीपुरता ॥ नेणुनकरवेजाणता ॥
तयातेंअज्ञानह्मणतां ॥ लाजिजेकीं ॥ १५ ॥

जाणतयानेणनकरी ॥ तरीअज्ञानइहींउत्तरीं ॥ अक्षरांचीहारी ॥ व्यर्थचिजाली ॥ १ ॥ अहो आत्मत्वींहेंनमखे ॥ अथवानिराळेंहीअसोंनसके ॥ तरीअज्ञानआहेहेंअसकें ॥ वलगणमात्र ॥ २ ॥ एवंजाणीवेनकरितांआवरण ॥ आहेह्मणावेंअज्ञान ॥ इयेलाजेसमान ॥ लाज़आहे ॥ ३ ॥

आभाळेंभानूग्रासे ॥ तैंआभाळकोणेंप्रकाशे ॥
सुषुप्तिसुषुप्तयारुसे ॥ तैंतेचिकोणा ॥ १६ ॥

अहोअज्ञानजरीसत्यअसतें ॥ तरीआत्मयानेणकरितें ॥ मगअज्ञानऐसेंयातें ॥ ह्मणतेंकोण ॥ ४ ॥ जेवींसूर्यप्रकाशेंकरून ॥ अभ्रत्वेंअभ्रदिसेजाण ॥ तेंसूर्यासीलोपीतरीकोण ॥ देखतेंअभ्र ॥ ५ ॥ अगासूर्यरश्मीचाप्रभव ॥ उमटेअभ्राचाभाव ॥ परीसूर्यचिअभ्रास्तव ॥ आच्छादेनाकीं ॥ ६ ॥ तेवींआत्माअज्ञानजाला ॥ मगअज्ञानपक्षकोणेंदेखिला ॥ निद्रिस्तुनिद्रानिमाला ॥ तरीनि द्राचिकैंची ॥ ७ ॥ ह्मणोनतुर्यपुरुषाच्याठाईं ॥ निद्रेचाआडळचिनाहीं ॥ तोअसेकाळत्रयीं ॥ देख णापुरुषु ॥ ८ ॥ तोजरीनिद्रेनेंनिमे ॥ मगयानिद्रेचेनिसंभ्रमे ॥ आपलेसुखींरमे ॥ ऐसाकवणु ॥ ९ ॥ आतांयेविषयींदृष्टांत ॥ पुढिलेंपदींअसेदिसत ॥ तेंचिआतांदत्तचित्त ॥ अवधाराहोजी ॥ २१० ॥

तैसेंअज्ञानअसेजेथें ॥ तेंचिजरीअज्ञानआतें ॥
तरीअज्ञानअज्ञानातें ॥ नेणतांगेलें ॥ १७ ॥

अज्ञानाचेंअधिष्ठान ॥ तेंजरीजालेंअज्ञान ॥ तरीसहजचिनेणतपण ॥ नेणोनिगेलें ॥ ११ ॥ जेवीं निरंजनोकोण्हीनिमाला ॥ तोनिमालेसाहितबुडाला ॥ तोनिमालायाबोला ॥ विषयचिनव्हे ॥ १२ ॥ ह्मणोननेणतयाचेंनेणपण ॥ नेणिवेमाजींबुडालेंजाण ॥ त्याचीवार्ताहीकोण ॥ करिजेतीपहा ॥ १३

आतांसाक्षसाक्षत्वेंवीण ॥ निखळचिजरीअज्ञान ॥ तरीयेवढेंचिद्विलासभुवन ॥ बुडोनिजातें ॥ ॥ १४ ॥ अहोआत्मेनिअवघेंनांदे ॥ तोआत्माअज्ञानेंबाधे ॥ तरीहेबोधविनोदें ॥ जगचिनसतें ॥ ॥ १५ ॥ ह्मणोनयेथेंऐसेंनाहीं ॥ चिद्विलासनीचनवापाहीं ॥ हेंअज्ञानत्वेंचिठायीं ॥ ठेविलेंजेणें ॥ १६ ॥ यालागींपुढेंजाण ॥ बोलिलाउपपत्तिकरून ॥ श्रोतांद्यावेंअवधान ॥ कृपाकरूनि ॥ १७॥

**नातरीअज्ञानएकघडे ॥ हेंजयास्तवनिवडे ॥**
**तेंअज्ञानन्हेंफुडें ॥ कोणेंकाळीं ॥ १८ ॥**

यालागींआत्मत्वजरीसंचलें ॥ तरीचअज्ञानऐसेंनिवडलें ॥ तेंअज्ञानयेणेंबोलें ॥ सिणवीका ह्मा ॥१८॥ जेवींभ्रमितासीभ्रमुजाणवे ॥ तेंभ्रमुचितेथेंनसंभवे ॥ आतांभ्रमकाळींहीजाणीवें ॥ सांडिलानाहीं ॥ १९ ॥ अहोभ्रमाचीप्रत्यक्षतानाहीं ॥ तेंशाहाणाचिमीह्मणेंपाहीं ॥ यालागींकाळत्रयीं ॥ भुलिचिनाहीं ॥ २२० ॥ तेवींअज्ञानहेंप्रमाण ॥ हेंद्रष्ट्यानिद्योतिलेंजाण ॥ ह्मणोनद्रष्टेपण॥ आवरलेंनाहीं ॥ २१ ॥ तोंअज्ञानेंअज्ञानन्हे ॥ तरीअज्ञानकासयाह्मणावें ॥ आतांअज्ञानवादा अघवें ॥ व्यर्थत्वचिआलें ॥ २२ ॥ जरीअज्ञानसत्यअसतें ॥ तरीजाणतेपणमावळतें ॥ यालागीं नघडेनिरुतें ॥ हेंचिसिद्ध ॥ २३ ॥

**पडळहीआथीडोळा ॥ आणिडोळानव्हेआंधळा ॥**
**तरीआथीयापोकळा ॥ बोलियाकीं ॥ १९ ॥**

डोळयानकरीअंध ॥ तेंपडळहावृथावाद ॥ तेवींजाणनयांनाहींबाध ॥ तेंअज्ञानकैंचें ॥ २४ ॥ अहोअज्ञानहेंप्रमाण ॥ परीनमळेनिखळज्ञान ॥ एवंज्ञानचिप्रत्यक्षजाण ॥ अज्ञानवाद ॥ २५ ॥ एवंअज्ञाननघडेह्मणोनि ॥ पुढेंदृष्टांतांचीश्रेणी ॥ चालिलीसेतेसज्जनीं ॥ अवधारीजोजी ॥ २६ ॥

**इंधनाच्याअंगीं ॥ खवळलेनआगी ॥**
**तेंनजळेतैंवाउगी ॥ शक्तिचिते ॥ २० ॥**

कींइंधनींअग्निप्रकटे ॥ आणिइंधनतैसेंचिठाके ॥ तेंप्रकटलाहेंअसकें ॥ वाउगेंजालें ॥ २७ ॥तेवींअज्ञानप्रकटलें ॥ आणिज्ञातेपणअसेसंचलें ॥ तरीव्यर्थेचिवोडवलें ॥ बोलणेंहें ॥ २८ ॥

**अंधारुकोंडोनघरीं ॥ घरापडसाईनकरीं ॥**
**तैंअंधारइहींअक्षरीं ॥ नह्मणावाकीं ॥ २१ ॥**

किंवापडसाईनाहींपडली ॥ अंधारइहींबोलीं ॥ बोलतांजेवींआली ॥ वृथाकुटी ॥ २९॥ तेवींजगदांध्यजालेंनाहीं ॥ आत्मकळाठांयींच्याठायीं ॥ तरीअज्ञानवादाकाई ॥ आतुडेयेथें ॥२३०॥

**वोजावोंनेदीजागणें ॥ तयेनिदेतेंनिदकोणह्मणे ॥ दिवसाना णीउणें ॥ तैंरात्रिचिकैंची ॥ २२ ॥ तैसेंआत्माअज्ञानअसकें ॥ असतांतोनमुके ॥ तैंअज्ञानशब्दालटिकें ॥ आलेंचिकीं ॥ २३ ॥**

जागणेंवोजावलेंनाहीं ॥ ह्मणिजेसंचलेंजागणेंपाहीं ॥ आणिनिद्राआलीहेकायी ॥ प्रमाणगोष्टी ॥ ३१ ॥ किंवारात्रिसमयोजाला ॥ आणिदिवसनाहींमावळला ॥ तरीरात्रियाबोला ॥ साचपणकैंचें ॥ ३२ ॥ तेवींजितुकेंजेंजेंविलासमान ॥ मिळोनमोटकेंआत्मज्ञान ॥ तेंअसकेंअज्ञानन्हे

तरीजाण ॥ तेंचिकैंचें ॥३३॥ अहोजेंजेंजियेठायीं ॥ असतेंज्ञानमात्रचिपाहीं ॥ ऐसियेंचिन्मात्रडोहीं ॥ अज्ञानकैंचें ॥३४॥ आत्माज्ञानमात्रनसतां ॥ तरीअज्ञानहोऊनअसता ॥ आतांत्याज्ञानाचा नाशहोता ॥ आत्मघातचिकीं ॥ ३५॥ आत्माहज्ञात्रज्ञान ॥ तेंजालेंजैंअज्ञान ॥ आत्मनाशकाय आन ॥ याहूनिअसे ॥ ३६ ॥ आहोआत्मनाशहोता ॥ तरीअभावचिअवघाअसता ॥ उद्भवलयें सीनसता ॥ जगाचामार्ग ॥ ३७ ॥ अहोअवघेंअसतेंशून्य ॥ मगअज्ञानकिमात्मककोण ॥ याला गींवृथावलगन ॥ काजकाई ॥ ३८ ॥ अहोआत्मयावेगळें ॥ कांहींअसतेंनिराळें ॥ तरीयेथेंभाविलें ॥ अज्ञानजात ॥ ३९ ॥ आतांआत्माअज्ञाननोहे ॥ परीतेथेंचिअज्ञानआहे ॥ ऐसेंह्मणालतरी वाये ॥ बोलणेंचिहें ॥ २४० ॥ अहोउगाचिबोलाहीजाण ॥ नदिसेशोभायमान ॥ येविषयींनिरूपण ॥ पुढेंहीअसे ॥ ४१ ॥

**येऱ्हवींतरीआत्मयां ॥ माजींअज्ञानअसावया ॥**
**कारणह्मणतांन्याया ॥ चुकीयेईलकीं ॥ २४ ॥**

आत्माआणिअज्ञान ॥ हेंवचनचिअघटमान ॥ विचारेंनव्हेंप्रमाण ॥ आणिन्यायाहीचुकी ४२ अहोहेअनुभवाचीमात ॥ परीतेअसोप्रस्तुत ॥ आतांन्यायेंहेंघडत ॥ कींनघडेपाहा ॥ ४३ ॥ येचिविषयींनिरूपण ॥ असेदृष्टांतेंसहवर्तमान ॥ तेंहीसांगोंविवरण ॥ अवधानद्यावें ॥ ४४ ॥

**अज्ञानतममेळणी ॥ आत्माप्रकाशाचीखाणी ॥**
**आतांदोहींमिळणी ॥ एकींकैसी ॥ २५ ॥**

अहोअज्ञानजातीचेंतम ॥ आत्माप्रकाशाचेंधाम ॥ यादोहींसीसमागम ॥ असेकेवीं ॥ ४५ ॥ हेंपरस्परेंविरोधि ॥ ह्मणोननघडेउभयांसीसंधि ॥ एवंअज्ञानवादीबुद्धि ॥ उमसूंनेघे ॥ ४६ ॥ अहोसाचजरीअज्ञान ॥ तरीआत्मत्वींचनघडेजाण ॥ आतांआत्माजरीसनातन ॥ तरीअज्ञानचिनघडे ॥ ४७ ॥ आतांघडेजरीह्मणतसा ॥ तरीहेंचिआतांपरियसा ॥ विरोधियांसहसा ॥ संधिचिनघडे ॥ ४८ ॥

**स्वप्नआणिजागरु॥आठउआणिविसरु॥इयेंयुग्मेंएकाहारु॥ चालतींजरी॥२६॥ शीतातपाएकवट ॥ वाहेवस्तीचीवाट ॥ कांतमेंबांधिजेमोट ॥ सूर्यरश्मीची ॥ २७ ॥ नानारातिआणिदिवो ॥ येतीएकेठायींराहों ॥ तैंआत्माजीवेजीवो ॥ अज्ञानाचेनि ॥ २८ ॥**

अहोस्वप्नआणिजागृती ॥ नावेकतैसींचदिसती ॥ परीस्वप्नाचीसंपत्ति ॥ जागृतीसनाहीं ॥ ४९ ॥ तस्मात्जागृताच्याठायीं ॥ स्वप्नअसोंचनसेकेपाहीं ॥ तेवींआत्मत्वींनाहीं ॥ अज्ञानहेतू ॥ २५० ॥ अथवास्वप्नशब्देंनिद्राचिघडे ॥ तयाजागृतीसींसंगनघडे ॥ तेवींआत्मत्वींनजोडे ॥ अज्ञानसंगु ॥ ५१ ॥ आत्माजागानिरंतर ॥ तेथेंकैंचेंअवस्थांतर ॥ हेंजाणतीचतुर ॥ प्राप्तपुरुष॥५२॥ अहोजागृतेंपुरुषेंकांहीं ॥ जागृतीवीणनेणिजेचिकांहीं ॥ तेंदेखणीकळापाहीं ॥ नव्हेचिस्वप्न ५३ तेविषयींचिद्विलासपाटणी ॥ नुमटेअज्ञानाचीमिरवणी ॥ चिन्मात्रतरणी ॥ अस्तुचिनपवे॥५४॥ तेवींविसराचीखूण ॥ आठवेदेखिलीचिनाहींजाण ॥ किंवासीताचेंसंगोपन ॥ तपनकेवींकरी

कीळेचेंपांघरूण ॥ आपजवीरत्नाकोण ॥
कींसोनेंलेसोनेपण ॥ जोडजोडूं ॥ १६६ ॥

ज्योतिआणिरत्न ॥ तयाअसतेंपरिच्छिन्नपण ॥ तरीज्योतिचेंपरिधान ॥ कीजेतेरत्नें ॥ ३९ ॥ तरीगाकीळह्मणिजेरत्न ॥ रत्नहीकिळेचीचखूण ॥ एवंरत्नकीळरत्नींजाण ॥ कारणांतरेंवीणशोभा ॥१२४०॥ आतांरत्नासीचरत्नकारण ॥ येथेंकार्यकारणतानाहींजाण ॥ किंवासोनयाससोनेपण ॥ औपाधिकनाहीं ॥ ४१ ॥ सोनयासीपीतवर्ण ॥ येथेंदुजेंनाहींगाकारण ॥ तेवींद्रष्ट्यासीद्रष्टे पण ॥ कारणांतरेंवीण ॥ ४२ ॥ अगास्वताजेंद्रष्टेपणजाण ॥ तेंआपलेंचिदेखतांद्रष्टेपण ॥ येथें दुसरेंकारण ॥ कासयालागे ॥ ४३ ॥ अगावायूच्याठायींचळबळ ॥ तेंआनकोणाचेंबळ ॥ तेवीं द्रष्टेचिजेंप्रांजळ ॥ तेंनपाहेकां ॥ ४४ ॥ त्यासीआपणयापाहातां ॥ दुजाकैंचाआणावापाहाविता ॥ एवंकारणांतराचीवार्ता ॥ स्वरूपींनाहीं ॥ ४५ ॥

चंदनसौरभवेढी ॥ कींसुधाआपणयावाढी ॥
किंगूळचाखेगोडी ॥ ऐसेंआथी ॥ १६७ ॥

चंदनाचेंसुवासपण ॥ चंदनलावितसेआपण ॥ ऐसेंनाहींतेंजाण ॥ तेंनलावितांचअसे ॥४६॥ किंवाअमृतींजेंअमृतंपण ॥ तेंअमृतासीचाखवितसेकवण ॥ तेंचाखविलेंनवीण ॥ चाखिलेंचि असे ॥ ४७ ॥ किंवागुळाचीगोडीजाण ॥ गुळींचअसेभक्षिलेनवीण ॥ तेवींद्रष्ट्यानेंद्रष्टाजाण ॥ देखिलाचिअसे ॥ ४८ ॥ तेणेंदेखतेंहोऊनदेखावें ॥ हेंतंवतेथेंनसंभवे ॥ आतांकारणांतरेंकरावें ॥ काजतेंकवण ॥ ४९ ॥

कींऊजाळाचेकीले ॥ कापुरापुढींदिधले ॥
कींताऊनऊनकेलें ॥ आगीतेंकाई ॥ १६८ ॥

कापुरींउजळता ॥ करावीनलगेतत्त्वता ॥ कींअग्नीसीउष्णता ॥ दियावीनलगे ॥ १२५० ॥ एवंइत्यादिदृष्टांतीं ॥ बोलिलीहेचिनिगुती ॥ कींद्रष्ट्याचीसंपत्ती ॥ द्रष्टेचअसे ॥ ५१ ॥ दृश्याचेनिमिशें ॥ द्रष्टेचिद्रष्ट्यादिसे ॥ तस्मात्द्रष्टेंदेखणेंऐसे ॥ दोनीनव्हती ॥ ५२ ॥ द्रष्टेनिद्रष्टेंदेखिलें ॥ तेथेंद्रष्टेंचिदृश्यजालें ॥ ऐसाअसेपुढिले ॥ पदींभाव ॥ ५३ ॥

नानातेलता ॥ आपुलेवेलीगुंडाळतां ॥
घरकरीनकरितां ॥ जयापरी ॥ १६९ ॥

द्रष्ट्याचेंद्रष्टेपण ॥ जेंद्रष्ट्यासीचअसेजाण ॥ तेंआपलाचिआपण ॥ दृश्यद्रष्टा ॥ ५४ ॥ जेवीं आपल्यावेली ॥ आपणचिलतावेढिली ॥ तेंआपणचिघरजाली ॥ आपणासीपाहा ॥ ५५ ॥ तेंघरहीआपणचिजाली ॥ आणिघरामध्येंआपणचिराहिली ॥ परीलतानाहींभंगली ॥ एकपणासी ॥ ५६ ॥ येथेंघरआणिघरवंत ॥ लताचिनहोनिहोत ॥ तेवींद्रष्ट्यासीघडत ॥ दृश्यद्रष्टेपण ॥५७॥ हेंघडलेंतैसेंनाहीं ॥ द्रष्टेंअसेठायींच्याठायीं ॥ स्वसंव्येद्यत्वेंकांहीं ॥ जालेंऐसेंआवडे ॥५८॥ येथें एकपणाभागनाहीं ॥ तरीकारणांतरेंकाजकाई ॥ पुढेंऐसेंचिकांहीं ॥ बोलतुअसे ॥ ५९ ॥

कांप्रभेचाउभला ॥ दीपप्रकाशसंचला ॥
तैसाचैतन्येंगिवसला ॥ चिद्रूपस्फुरे ॥ १७० ॥

अगाहेंजेंदृश्यभान ॥ तेंचिद्रूपेंचिस्फुरण ॥ हेंचैतन्यासमोडून ॥ विलासलेंनाहीं ॥ १२६० ॥ अगास्फुरणमात्रचैतन्य ॥ तरीदृश्यकायस्फुरणाहूनआन ॥ हेंद्रश्यनहोनिआपण ॥ आपणादेखे ॥ ६१ ॥ परीदेखतांहीजाण ॥ जालेंनाहींदेखतेंपण ॥ ऐसेंचिकांहींवचन ॥ पुढेंहीबोले ॥ ६२ ॥

**ऐसेंआपणयाआपण ॥ आपुलेंनिरीक्षण ॥**
**करावेंयेणेंवीण ॥ करितुचिअसे ॥ १७१ ॥**

ऐसेंहेंदृश्यद्रष्टेपण ॥ तेंआपणचिआपलेंनिरीक्षण ॥ जेंकींकेलेनवीण ॥ कीजेतअसे ॥ ६३ ॥ अहोनिरीक्षणमात्रचितेंअसे ॥ तेंआपणाआपणनदेखेकैसें ॥ तरीकायदेखावेंलागतसे ॥ तयातें तया ॥ ६४ ॥ ह्मणोनदेखावेंमातेंमियां ॥ हाउद्योगुकांहींनसोनियां ॥ सहजचिपाहाणेंपाहाणया ॥ पाहातचिअसे ॥ ६५ ॥ यापाहाणयासीपाहीं ॥ काळवेळभेदनाहीं ॥ तेंपाहाणेंचिमांकायी ॥ पाहावेंलागे ॥६६॥ ह्मणोनियाचेंदेखतेंपणा ॥ अवधीचिनाहींजाणा ॥ निरंतरहादेखणा ॥ सविलासरूप ॥ ६७ ॥ त्याविलासामाजींपाहीं ॥ देखणेंनदेखणेंउमटतांहीं ॥ याच्यादेखणीयास नाहीं ॥ विलोपुजाला ॥ ६८ ॥ मुळींयाचीदेखतीखूण ॥ तेचिनदेखणीयासारिखीजाण ॥ तेथेंच देखतेंनदेखतेंपण ॥ नावेकउमटे ॥ ६९ ॥ परंतुदेखणीयाहानीनाहीं ॥ जैसातैसादेखणापाहीं ॥ पुढेंहीइयेविषयीं ॥ बोलतुसे ॥ १२७० ॥

**ऐसेंहेंदेखणेंनदेखणें ॥ हेंअंधारेंचादिणें ॥**
**मांचंद्रासीउणें ॥ स्फुरतेंकां ॥ १७२ ॥**

येथेंदेखतचिदेखणेंनाहीं ॥ ह्मणोनदेखणेंनदेखणेंहेंचिकांहीं ॥ परंतुदेखणियासपाहीं ॥ अवधीचनाहीं ॥ ७१ ॥ अथवाप्रत्ययाचेप्रवाहीं ॥ दृश्यासीचठावनाहीं ॥ आतांपाहाणेंतेंकाई ॥ दृश्यनसतां ॥ ७२ ॥ ह्मणोनदृश्यद्रष्टेपणेवीण ॥ द्रष्टयासीनघडेद्रष्टेपण ॥ तऱ्हींद्रष्टृत्वाची खूण ॥ लोपातेंनपवे ॥ ७३ ॥ ऐसेंजेंद्रष्टेपणआहे ॥ तेंचिआपणाआपणपाहे ॥ तऱ्हींसंचलेपणा नोहे ॥ हालिचालि ॥ ७४ ॥ जेवींअंधारेंचादिणेंजालें ॥ परीचंद्रपणअसेसंचलें ॥ मांचांदिणें नवेंआलें ॥ कींआधारेंनहारपे ॥ ७५ ॥ ऐसेंनसेकांहीं ॥ चंद्रासीउणेनाहीं ॥ तेवींदृश्यादृश्य पाहीं ॥ द्रष्टाचअसे ॥ ७६ ॥ तोआपलियापूर्णता ॥ असेआपणाहीपाहावयापुरता ॥ आणिपाहातेंतरीतत्वता ॥ पाहाणेंचिनघडे ॥ ७७ ॥ तयासीआपलेनिसुरवाडे ॥ पाहाणेंनपाहाणेंहीआवडे ॥ परीपाहातांनपाहातांहीनघडे ॥ पालटतया ॥ ७८ ॥ तयादुसरीदशानाहीं ॥ पुढेंहीइये विषयीं ॥ बोलिलेंसेजेंकांहीं ॥ तेंअवधाराहोजी ॥ ७९ ॥

**ह्मणोनहेंनव्हावें ॥ ऐसेंहीकरूंपावे ॥**
**तरीतैसाचिस्वभावें ॥ आथिताअसे ॥ १७३ ॥**

देखतांदेखणानव्हे ॥ नानदेखतांलोपातेंनपवे ॥ आतांजरीदृश्यदेखणेंनभावें ॥ तरीपहिलें चिनाहीं ॥ १२८० ॥ दृश्यभरूनद्रष्टेंचिअसे ॥ तेथेंदृश्यहेंकोठेंउमसे ॥ ह्मणोननाशितांनसे ॥ दृश्यभाग ॥ ८१ ॥ आतांदृश्यभागजरीनाहीं ॥ तरीद्रष्टयानेंदेखावेंतेंकाई ॥ ह्मणोनदेखणाचि पाहीं ॥ नपाहेकांहीं ॥ ८२ ॥ अहोदृश्यसारूंबैसे ॥ तैंआयितेंचिदृश्यनसे ॥ कांजेंद्रष्टेंचिद्रष्टेमाकैसें ॥ पाहणेंघडे ॥ ८३ ॥ अथवाअसोहादृश्यभाग ॥ निखळद्रष्टेंमात्रचिसांग ॥ तेंचितयाचेंअंग ॥ तेथेंदेखेलकाई ॥ ८४ ॥ ह्मणोनद्रष्टेपणेंचिपाहीं ॥ ह्मणेंहेंनदेखावेंकांहीं ॥ तरीपहिलें

चिनाहीं ॥ देखणेंघडलें ॥ ८५ ॥ ह्मणोनजैसेंआवडेतैसें ॥ आयितेंतैसेंचिअसे ॥ नयेतांदुजीयेद शे ॥ तेंचितेंकीं ॥ ८६ ॥ तस्मात्‌देखिजेनानदेखिजे ॥ जैसेंतैसेंचिअसिजे ॥ आतांदृश्यद्रष्टृत्वदि सेहेंजें ॥ तेंअसतचिमृषा ॥८७॥ अगापुढलेपदींचेंअनुमोदन ॥ देखोनकेलेंऐसेंनिरूपण ॥ तेंपुढिल पदेंहीजाण ॥ परिसावेंऐसें ॥ ८८ ॥

**द्रष्टादृश्यऐसे ॥ आळुमाळदोनीदिसे ॥**
**तेहीपरस्परानुप्रवेशें ॥ कांहींनाकीं ॥ १७४ ॥**

द्रष्टाआणिदृश्य ॥ नावेकहाजोभास ॥ पाहातांपरस्परानुप्रवेश ॥ दोन्हींहीमृषा ॥ ८९ ॥ अ होपाहातांद्रष्टृत्वाचीउजरी ॥ आठवलीदृश्याचीवारी ॥ त्यादृश्याचेबरोबरी ॥ द्रष्टृत्वहीगेलें ॥ १२९० ॥ अगाघटभंगींघटाकाश ॥ नकरितांचिपावलेंनाश ॥ तेवींदृश्यसंबंधीद्रष्टृत्वास ॥ दृश्याचिसवें ॥ ९१ ॥ आतांहापरस्परानुप्रवेश ॥ पुढेंसांगिजतसेविलास ॥ धरूनियांकास ॥ अवधानाची ॥ ९२ ॥

**तेथदृश्यद्रष्टांभरे ॥ दृष्टेपणदर्शीसरे ॥**
**यादोन्हीनहोनिउरे ॥ दोहींचेंसाच ॥ १७५ ॥**

अगाद्रष्टयासीआपले ॥ दृष्टत्वचिदृश्यजालें ॥ येथेंसहजचिआटलें ॥ दृष्टत्वींदृश्य ॥ ९३ ॥ आतांदृश्यत्वजरीआटलें ॥ मगद्रष्टृत्वाकायउरलें ॥ दृशासवेंचिगेलें ॥ जिरोनतेंहीं ॥९४॥ असो दर्शीद्रष्टेंचिभरलें ॥ ह्मणोनदृश्यरूपाआलें ॥ आतांद्रष्टृत्वेंचिदृश्यघडलें ॥ तरीदृश्यचिमिथ्या॥९५ यालागींद्रष्टेंनव्हेनादृश्य ॥ केवळचिचिद्विलास ॥ हेंआटलेंजेकळेस ॥ तेकळामात्रचिअघवें ॥९६ ज्याचेनिसत्यत्वेंकरून ॥ घडेदृश्यद्रष्टेपण ॥ त्यासत्यरूपासीजाण ॥ विलोपनाहीं ॥ ९७ ॥ अगा दोन्हींभावहेंआहाच ॥ यांसपरस्परेंहोऊनवेच ॥ मगदोन्हींचेंसाच ॥ एकलेंचित्स्वरूप ॥ ९८॥ तेदोहींसनाहींगिवंसलें ॥ ह्मणोनजैसेंतैसेंचिउरलें ॥ हेंआतांनव्हेपाहिलें ॥ तैसेंचिअसे ॥ ९९ ॥ येथेंकाळवेळभेदनाहीं ॥ भलतेव्हांऐसेंचिपाहीं ॥ पुढेंहीहेंचिकांहीं ॥ बोलतुअसे ॥ १३०० ॥

**मगभलतेथेंभलतेव्हां ॥ माझारींलेदृश्यद्रष्टाभावा ॥**
**आटणीकरितखेवा ॥ येतीदोन्ही ॥ १७६ ॥**

जेंकींनित्यानंदचिद्घन ॥ सर्वकाळसनातन ॥ तेथेंदृश्यभावनाजाण ॥ माझारीचिउठे ॥ १ ॥ हातेथीलचिद्विलास ॥ येणेंदृश्यद्रष्टृत्वआभास ॥ येथेंफिरोनआपलीवास ॥ पाहिजेजरी ॥ २ ॥ तरीभावनेचेपोटींपाये ॥ रिगोनिभावनाचिउडोनिजाये ॥ मगदृश्यतेंकाये ॥ आणिद्रष्टेंतेंकवण ॥ ३ ॥ इयेभावनेचीघेतांसोये ॥ भावनातेभावनानोहे ॥ ह्मणोनदृश्यद्रष्टृत्वेंवीणआहे ॥ सर्वदां सरिसें ॥ ४ ॥ इयेभावनेचीअडखिळी ॥ बैसोनवस्तुनाहींथोकली ॥ अगावस्तुचिसरळी ॥ हा लवलीनाहीं ॥ ५ ॥ जेवींआपलियाज्वाळा ॥ अग्निनाहींशांतजाला ॥ तेवींसंधीनाहींसंभवला॥ वस्तुमात्रींइये ॥ ६ ॥ ह्मणोनदृश्याचाभाव ॥ असतांचदृश्यअभाव ॥ येथेंदेखतदेखतठाव ॥ द्र ष्टयासीनाहीं ॥ ७ ॥ अहोऐसेंजेव्हांबोधलें ॥ तेव्हांचकायहेंजालें ॥ भलतेव्हांसंचलें ॥ ऐसेंचि असे ॥ ८ ॥ किंवाबोधाआलेंजयासी ॥ तेथेंचिकायवस्तुऐसी ॥ भलतेथेंचिवस्तूसी ॥ पालट नाहीं ॥ ९ ॥ अगावस्तुचेपोटींचेंपाणी ॥ नहालोनहेमांडणी ॥ भावनेचीआटणी ॥ भावनेमा जीं ॥१३१०॥ ह्मणोनिपरस्परानुप्रवेशु ॥ जालादृश्यद्रष्टृत्वाचाग्रासु ॥ आयिताचिद्विलासु ॥ सर्व

दासरिसा ॥ ११ ॥ आतांयाचेचिनिश्चयासी ॥ पुढेंबोलतसेदृष्टांतेंसी ॥ तेंनित्यानंदापुसी ॥ घेऊनीसांगों ॥ १२ ॥

**कापुरींअग्निप्रवेशु ॥ कींअग्नीघातलापोतासु ॥**
**ऐसेंनव्हेसंवसरिसु ॥ वेचुजाला ॥ १७७ ॥**

अग्निकापुराचियेमिळणी ॥ अटलींअग्निकापूरदोन्ही ॥ कापूरनिमालाअग्नि ॥ कींअग्निसीकापूर ॥ १३ ॥ हेतंवनुरेचिकांहीं ॥ कापूरअग्निदोन्हीनाहीं ॥ तेवींदृश्यद्रष्टृत्वादोन्हीं ॥ भेटीहोतां ॥ १४ ॥ नातोद्रष्टानातेंदृश्य ॥ वस्तुमात्रपैसेंपैस ॥ जैसीतैसींसविलास ॥ असतचिअसे ॥ १५ ॥ यादृश्यद्रष्टयाचेभेटी ॥ नुरेचिभेटीचीगोठी ॥ आपेआपमिठी ॥ पडोनठेली ॥ १६ ॥ अहोदृश्याद्रष्टाभेटींपाहे ॥ तंवअधींचतेंदृश्यनव्हे ॥ तेथेंद्रष्टयाचेपाये ॥ द्रष्टृत्वींरिगालें ॥ १७ ॥ तेंद्रष्टृत्वासीलाजोनि ॥ ठायींचराहिलेंविरोनि ॥ कांजेभेटीचाहीक्षणी ॥ अतिशोवाढे ॥ १८ ॥ एवंदृश्यद्रष्टृत्वनसोन ॥ वस्तुअसेवस्तुत्वेंवीण ॥ पुढेंइयेविषईंआन ॥ द्रष्टांतसुचिला ॥ १९ ॥

**एकाएकुवेचला ॥ शून्यबिंदुशून्यपुसिला ॥**
**द्रष्टादृश्याचानिमाला ॥ तैसेंहोय ॥ १७८ ॥**

अंकेंअंकुभाजितांपाहे ॥ एकुएकिसरोनिजाये ॥ त्यासरलेपणींहोये ॥ शून्यासीठावो ॥ १३२० तेशून्यकायअंखिलेंनव्हे ॥ परीगणनाचुकऊनठाये ॥ अंखिलेंअसतांचिपाहे ॥ लेखियानये ॥ २१ ॥ जऱ्हींशून्यह्मणोनिअंखिलें ॥ तऱ्हीअर्थेंअंकत्वनेलें ॥ तेवींद्रष्टादृश्यसरलें ॥ द्रष्टृत्वींजिये ॥ २२ ॥ तेद्रष्टेऐसेंपडेठायीं ॥ परीतयाद्रष्टृत्वनाहीं ॥ ह्मणोनतेथेंपाहीं ॥ दृश्यचिनुगवे ॥ २३ ॥ अहोद्रष्टयादृश्याचीभेटी ॥ होतांआपणेसीचिमिटी ॥ तेथेंद्रष्टृत्वहीघोटी ॥ आपलियेचपोटीं ॥ २४ ॥ येविषईंआणीकवचन ॥ दृष्टांतेसीबोलतुसेजाण ॥ तेंपरिसावेंसावधान ॥ सज्जनींजनीं ॥ २५ ॥

**किंबहुनाआपुलिया ॥ प्रतिबिंबाझोंबिनलिया ॥**
**झोंबीसकटआटोनियां ॥ जायिजेजेवीं ॥ १७९ ॥**

अगाप्रतिबिंबाचेनिमिशें ॥ आपआपणादुजेंभासे ॥ तयाझोंबोंजैंबैसे ॥ तैंतेंचिकैंचें ॥ २६ ॥ तयासीघ्यावयाहातफळी ॥ आपणजैंरिगिजेजळीं ॥ तैंअंगचिगिळी ॥ अंगासपाहा ॥ २७ ॥ नातेप्रतिंबिंबनातेझोंबी ॥ बिंबचिसामावलेंबिंबीं ॥ तेवींद्रष्टेपणींस्वयंभीं ॥ द्रष्टेंनातेंदृश्य ॥ २८ ॥

**तैसेंरूसतादृष्टी ॥ द्रष्टादृश्यभेटी ॥**
**येतीतेथेंमिठी ॥ दोहींचीपडे ॥ १८० ॥**

ह्मणोनद्रष्टयाचेंदर्शन ॥ द्रष्टृत्वींउमटलेंजाण ॥ तेथेंदृश्यद्रष्टेपण ॥ एकिचिदोनी ॥ २९ ॥ त्यादर्शनाचीखूण ॥ द्रष्टृत्वींआटलीजाण ॥ तेथेंदृश्यनाद्रष्टेपण ॥ दोन्हींहीनव्हे ॥ १२३० ॥ नुमटेदर्शनाचीखूण ॥ मगदृशेतेकायद्रष्टेंतेकवण ॥ अवघाचिद्विलाससंपूर्ण ॥ अवधीविहीन ॥ ३१ ॥

**सिंधुपूर्वापर ॥ नमिळतचितंवसागर ॥**
**मगएकतटनीर ॥ जैसेंहोय ॥ १८१ ॥**

अहोदर्शनाचियेसोई ॥ दृश्यद्रष्टृत्वपडेठायीं ॥ तऱ्हींस्वरूपासीनाहीं ॥ तुटीआली ॥ ३२ ॥ दृश्यद्रष्टृत्वाचेनपरिपाटे ॥ स्वरूपींनपडतीवांटे ॥ आणिप्रत्ययाचेनिनेटें ॥ आटलेंजेव्हां ॥ ३३ ॥

तेव्हांदृश्यद्रष्टृत्वाचामासला ॥ बुडोनचिदार्णवचिडुमदुमिला ॥ तेथेंविसरेंसीबुडाला ॥ आठ उथिता ॥ ३४ ॥ जेवींपूर्वापरसागर ॥ नमिळतांचिएकलेंनीर ॥ याहीवरीप्रळयाचेंघर ॥ पावलेंजेव्हां ॥ ३५ ॥ तयाप्रळयींनाहींपारावार ॥ ह्मणोनएकतटअवघेंनीर ॥ तेवींदृश्यद्रष्टृत्वाचीकोर ॥ उल्लंघिलीजेव्हां ॥ ३६ ॥ तेव्हांपूर्वींदृश्यद्रष्टृत्वभान ॥ आतांअवघेंजालेंसमान ॥ ऐसीकांहींखूण ॥ उरलीनाहीं ॥ ३७ ॥ ह्मणोनदृश्यद्रष्टृत्वस्वभाव ॥ येणेंसींचएकार्णव ॥ दुसऱ्यातटाचाउगव ॥ वस्तुत्वींनाहीं ॥ ३८ ॥ जेवींप्रळयनीरएकतट ॥ तेवींवस्तुचिएकीघनदाट ॥ अंतर्बाह्यसकट ॥ अंतरचिअघवें ॥ ३९ ॥ वस्तूचेंवस्तुअंतर ॥ त्याअंतराआडनाहींआडपदर ॥ ह्मणोनिप्रकटचिनिरंतर ॥ बाह्यहीतेंचि ॥ १३४० ॥ ह्मणोनअंतर्बाह्यविहीन ॥ स्वरूपसर्वकाळसरिसेंचिजाण ॥ तेथेंआतांअज्ञान ॥ केउतेंअसे ॥ ४१ ॥ द्रष्टादृश्यदर्शननसोन ॥ स्वरूपचिएकपूर्ण ॥ कर्तृत्वकर्मनसोन ॥ क्रियाप्रवाह ॥ ४२ ॥ कार्यकर्मकर्ता ॥ येणेंनतुटेस्वरूपींचीअखंडता ॥ क्रियाप्रवाहआइता ॥ चिद्विलासु ॥ ४३ ॥ क्रियात्रिपुटीविहीन ॥ वर्ततसेअवघेंजन ॥ तेथेंआतांअज्ञान ॥ समूळलटिकें ॥ ४४ ॥ आशंका ॥ देहबुद्धिचेनिपरिहरे ॥ स्वरूपाच्यानिसाक्षात्कारें ॥ क्रियासहजाकारें ॥ होतसेतेव्हां ॥ ४५ ॥ जेथेंअहंकारचिनसे ॥ तैंनलिंपिजेक्रियादोषें ॥ तेथेंत्रिपुटीनुमसे ॥ हेप्रमाणमानूं ॥ ४६ ॥ परीदेहबुद्धिमंत ॥ कर्माचरणअभिमानयुक्त ॥ विषयाच्याठायींरत ॥ होऊनिवर्तती ॥ ४७ ॥ जेप्रपंचत्वेंपरिच्छिन्न ॥ वर्ततीकर्माअधीन ॥ तेत्रिपुटीविहीन ॥ कैसेंअसती ॥ ४८ ॥ तेथेंलागलीपूर्वापरता ॥ साध्यासाध्यगतागतता ॥ तैं ब्रह्मचिएकरसता ॥ कैसीअसे ॥ ४९ ॥ एवंजालयाअभिमानहीन ॥ आटलेयाअज्ञान ॥ आत्मत्वींसमाधान ॥ त्रिपुटिरहित ॥ १३५० ॥ एवंऐसाजेथेंदशाभेद ॥ एकमुक्तएकबद्ध ॥ तरीअज्ञानाचाबाध ॥ अत्यंतकैसा ॥ ५१ ॥ ऐसीअशंकाअंतरीं ॥ घेऊनसंबंधिलीओवीदुसरी ॥ तेपरिसावीचतुरीं ॥ माहानुभावीं ॥ ५२ ॥

**बहुयेंहेत्रिपुटी ॥ साहाजेंहोतयारहाटी ॥**
**प्रतिक्षणींकायटी ॥ करितअसे ॥ १८२ ॥**

अहोस्वरूपचिन्मात्रघन ॥ सर्वकाळसरिसेंचिजाण ॥ येथेंजेंजगभान ॥ तोचिद्विलासअघवा ॥ ५३ ॥ हेअसेकेलेनवीण ॥ अनादिएकलीवस्तुपूर्ण ॥ जगाब्रह्मानिपटून ॥ संबंधनाहीं ॥ ५४ ॥ सहजेंहोतांवर्तणुक ॥ नचुकेवस्तुअचुक ॥ त्रिपुटीचेंकंचुक ॥ वाचारंभण ॥ ५५ ॥ जेणेंतेणेंप्रकारें ॥ क्रियामात्रएकाकारें ॥ त्रिपुटीचेनिविसरें ॥ वर्ततेजगीं ॥ ५६ ॥ अहोहेंकर्ममीकर्ता ॥ ऐसेंहेंक्षणक्षणींनविचारितां ॥ चिद्विलासआयिता ॥ होतियेराहाटी ॥ ५७ ॥ आपणेंसीतादात्म्यपाऊन ॥ त्रिपुटीसीगिळून ॥ वर्ततसेअवघेंजन ॥ चिद्विलासेंसी ॥ ५८ ॥ मीकर्ताहेंकर्मकांहीं ॥ हातेथेंनिवाडानाहीं ॥ जेविषयसुखडोहीं ॥ बुडालेअसती ॥ ५९ ॥ तोविषयदुजाह्मणोनये ॥ आपआपणासीचविषयहोये ॥ आपलेंसुखचिउभेंठाये ॥ विषयरूपें ॥ १३६० ॥ तेसुखींबुडीदेऊनीं ॥ आचरेन्यायअथवाविपरीतकरणी ॥ तेथेंमीकर्ताहेंकर्मह्मणी ॥ आठवणहोये ॥ ६१ ॥ अहोआपलीआवठण ॥ तेराहिलीविषयचिहोऊन ॥ आतांत्रिपुटीचेंभान ॥ तेंकवणासी ॥ ६२ ॥ आतांआपुलीचसोयघेतां ॥ निवडेहेंकर्ममीकर्ता ॥ हेंनावेकहोतां ॥ मागुतेंविरे ॥ ६३ ॥ अगाअहंप्रत्ययोजंवउमसे ॥ तंवतेचिठायींतोकळासे ॥ तैंकर्मेंसीत्रिपुटीनाशे ॥ आत्मत्वींरतु ॥ ६४ ॥ एवंआत्मसाक्षात्कारें ॥ किंवावर्ततांप्रपंचाकारें ॥ त्रिपुटीचियेधुरे ॥ नबैसेको

ण्ही ॥ ६५ ॥ अगाआत्मावबोधाउपरी ॥ मीब्रह्महाआठउकोणधरी ॥ धरीतरीउजरी ॥ बोधाचीनव्हे ॥ ६६ ॥ ह्मणोनआपलेआठवणेवीण ॥ सहजत्रिपुटीक्षीण ॥ आतांप्रपंचीजन ॥ तोही आठउनेघे ॥ ६७ ॥ मीदेहमीदेहऐसें ॥ सर्वदाकायतोघोकितअसे ॥ ह्मणोनतेथेंहीनसे ॥ त्रिपुटीचानिवाडु ॥ ६८ ॥ माझेदेहहेंजैंनिवडे ॥ तैंचिमीपणींमीपणबुडे ॥ तेथेंहीबहुडे ॥ त्रिपुटीभान ॥ ६९ ॥ ह्मणोनकोण्हेहीप्रवाहीं ॥ आपलियासुखासीहानीनाहीं ॥ अवघेचिजनहेपाहीं ॥ आत्मत्वींरत ॥ १३७० ॥ यालागींत्रिपुटीविहीन ॥ अवघाचिद्विलासपरिपूर्ण ॥ ऐसीआंतुडलियाखूण ॥ अज्ञानकैंचें ॥ ७१ ॥ अगाहेंपूर्वींनाहींहारपलें ॥ ऐसेंचिकांहींअतुडलें ॥ येथें भागनाहींपडलें ॥ पूर्वआणिअपर ॥ ७२ ॥ ह्मणोनजागेंचिजागेंहोआवें ॥ चाखिलेंचिचाखावें ॥ येथेंचाखणेंनचाखणेंहेंअघवें ॥ उडोनिजाय ॥ ७३ ॥ ह्मणोनसांडूननिंदास्तवन ॥ निर्दोष अवघेंचिद्भुवन ॥ येथेंदेखिजेदोषगुण ॥ हेंअबद्धींपडे ॥ ७४ ॥ असोभरलीदृङ्मात्रदृष्टी ॥ नकरितांचिदृश्यद्रष्ट्याभेटी ॥ हेप्रतिक्षणींठी ॥ नकरितांचिअसे ॥ ७५ ॥ ह्मणिजेअसेंकेलेनवीण ॥ सहजप्रवाहत्रिपुटीक्षीण ॥ हेंसाधावयासाधन ॥ जन्मलेंचिनाहीं ॥ ७६ ॥ येथेंएकशबलांश सांडावा ॥ शुद्धांशुसाधूनघ्यावा ॥ तरीस्वरूपयाभेदभावा ॥ आलेंचिनाहीं ॥ ७७ ॥ एवंविशेषसामान्यनाहीं ॥ तेथेंअज्ञानतेंआतांकाई ॥ पुढेंइयेचिविषयीं ॥ बोलतअसे ॥ ७८ ॥

**दोन्हींविशेषगिळी ॥ नानिर्विशिष्टातेंउगळी ॥**
**उघडझांपीयेकेचडोळीं ॥ वस्तुचिहे ॥ १८३ ॥**

दृश्यआणिद्रष्टेपण ॥ हेदोन्हींविशेषजाण ॥ हेंगिळूनियांमगपूर्ण ॥ स्वरूपानुभव ॥ ७९ ॥ तोनिर्विशेषस्वरूपानुभव ॥ तेथेंउभयविशेषांनाहींसंभव ॥ तरीनिर्विशिष्टाचाभाव ॥ धरीकवण ॥ १३८० ॥ अगाजडभागाचाग्रासु ॥ करूनस्वरूपप्रकाशु ॥ तरीऐसानव्हेदंशु ॥ स्वरूपनिष्ठेचा ॥ ८१ ॥ कांजेवस्तुऐसेंनाहीं ॥ जेंशबलांशसांडिजेकांहीं ॥ मगआपलेशुद्धपणींपाहीं ॥ निर्विशिष्टत्वऐसें ॥ ८२ ॥ अगाहेंजेंविशेषसामान्यमान ॥ याहूनवस्तुकांहींआन ॥ ऐसेंतंवनाहींजाण ॥ निर्धारेंसी ॥ ८३ ॥ अथवाहेजेगतागतता ॥ जेजेउंचनीचसमविषमता ॥ जेजेकांहींक्षणिकता ॥ तेंचिवस्तु ॥ ८४ ॥ तरीऐसीनव्हेआगमापायीं ॥ वस्तूसीबाधनाहींकाळत्रयीं ॥ तरीहेचिवस्तु पाहीं ॥ कैसेनिघडते ॥ ८५ ॥ उक्तंच ॥ नैनंछिंदंतिशस्त्राणिनैनंदहतिपावकः ॥ नचैनंक्लेदयंत्यापोनशोषयतिमारुतः ॥ १ ॥ इतिभगवद्वचनं ॥ ॥ एवंआगमापायीसमविषम ॥ नव्हेवस्तूचें वर्म ॥ आणिसर्वहीहेंब्रह्म ॥ ऐसेंहीनसे ॥ ८६ ॥ उक्तंच ॥ गतिर्भर्ताप्रभुःसाक्षीनिवासःशरणंसुहृत् ॥ प्रभवःप्रलयस्थानंनिधानंबीजमव्ययं ॥ २ ॥ तपाम्यहमहंवर्षंनिगृण्हाम्युत्सृजामिच ॥ अमृतंचैवमृत्युश्चसदसच्चाहमर्जुन ॥३॥ इतिभगवद्वचनं ॥ ह्मणोनजेंजेंआगमापायी ॥ तेंचिहेंवस्तु पाहीं ॥ किंवाआणीकचिकांहीं ॥ वेगळेंअसे ॥ ८७ ॥ वस्तुऐसेंनसेपाहीं ॥ येथेंदशाभेदनाहीं ॥ किंबहुनाहाजोभासकांहीं ॥ वेगळेंअसे ॥ ८८ ॥ असोसर्वअसोनिसर्वनोहे ॥ वस्तूसीनाहींदुसरीसोये ॥ तयाद्रष्टृत्वासीपाहें ॥ विलोपुचिनाहीं ॥ ८९ ॥ ह्मणोनहेंदृश्यद्रष्टृत्वभानअभान ॥ येथेंवस्तुनाहींआनान ॥ देखतांनदेखतांनयन ॥ निडारलाचिअसे ॥१३९०॥ अंगेंअंगदृङ्मात्रद्रष्टें ॥ तेंनपालटोनद्रष्टृत्वेंनेटे ॥ एकडोळाचितेथेंप्रकटे ॥ लपतेंकायी ॥ ९१ ॥ जोपुरुषनेत्रवंतु ॥ तोनेत्रींपाहेकींलावितु ॥ आतांडोळामात्रचिवस्तु ॥ तेथेंप्रकटलोपुकैसा ॥ ९२ ॥ अगारूपमात्रजोडोळा ॥ तेणेंप्रकटलोपाचासोहळा ॥ आतांउघडाझांपीचीकळा ॥ उघडचिदृष्टी ॥ ९३ ॥ उघ

ड्झांपीतरीजाली ॥ आणिदृष्टिद्रष्टत्वानाहींमुकली ॥ ऐसेनरूपाआली ॥ द्रष्टत्वींदृश्यें ॥ ९४ ॥ एवंजेणेंडोळ्यानें ॥ डोळाझांकणेंआणिउघडणें ॥ तोएकलाडोळाकोणें ॥ संबंधिलाजाये ॥९५॥ तियेउघडझांपीचीऐसीरीती ॥ हेसांगतुअसेपुढती ॥ अवधारावेंसंतीं ॥ कृपादृष्टी ॥ ९६ ॥

**पातयापातेंमिळे ॥ किंद्रष्टत्वेंसैंघपघळे ॥**
**तियेउन्मीळितांमावळे ॥ नवलावोहा ॥ १८४ ॥**

अगानवलयेथीलदेखतीपरी ॥ नावेकदिठीजैंआवरी ॥ तंवद्रष्टत्वाचीनगरी ॥ दिठीचिहोय ॥ ९७ ॥ तेथूनिलीलाजैंमोकळीसोडी ॥ तंवअवघेंचिनमोडूनमोडी ॥ तयानावउघडी ॥ वास पाहे ॥ ९८ ॥ जेवींउदकजेथेंपुंजाळलें ॥ तेथेंउठतीकल्लोळाचेउमाळे ॥ नावेकवावरेमोकळें ॥ तंवअंगींचजिरती ॥ ९९ ॥ किंवाफणींद्रठायींथोकला ॥ तोसरिसाचिपरीमंडळजाला ॥ तो वेढाउकलूनिचालिला ॥ तैंमंडळकैंचें ॥ १४०० ॥ त्यासीथोकावयाढळावया ॥ कारणतोचि किंगातया ॥ आपलीयालीळया ॥ भलतैसा ॥ १ ॥ तेवींहेंजेंदृश्यरूपाआलें ॥ तेंद्रष्टत्वचिथिरावलें ॥ तेथूनदृष्टीपुढेंढळे ॥ तरीमावळेअघवें ॥ २ ॥ अगाडोळाचिडोळ्याचीपाती ॥ उघडीझांपीत्याचीत्याचेचिहातीं ॥ याचर्मचक्षूचीरीती ॥ नमानावीतेथें ॥ ३ ॥ येथेंपातींआनडोळा आन ॥ पातींपडतीतैंनदिसेभान ॥ आणिउकलितांचिजनवन ॥ न्याहाळूंलागे ॥ ४ ॥ तैसान व्हेहानयनाचानयन ॥ हालागलाचिउघडाजाण ॥ जोआपलेंलागलेंपण ॥ देखतअसे ॥ ५ ॥ त्यासीदेखतांनदेखतांजाण ॥ नभंगेतयाचेंदेखतेपण ॥ तेथेंतुमचेंअज्ञान ॥ मिरवेकोठें ॥ ६ ॥ अगाहेअनुभवाचीखूण ॥ जाणतीअनुभवीसज्जन ॥ आतांतात्पर्यार्थेंजाण ॥ ऐसाअसे ॥ ७ ॥ द्रष्टें आपणयाआपण ॥ जैंपाहेदृश्यहोऊन ॥ तैंनावेकथोकलीजाण ॥ द्रष्ट्याचीदिठी ॥८॥ ह्मणोनपातयापातेंमिळे ॥ तैंद्रष्टत्वेंद्रष्टेंपघळे ॥ तेंचिउन्मीलनजैंकेलें ॥ तैंआपणापेआपु ॥९॥ तैंदृश्यअवघेंमावळलें ॥ द्रष्टत्वांद्रष्टेंसामावलें ॥ परीपूर्वापरतेसिंवतलें ॥ नव्हेजेंकीं ॥१४१०॥ देखणयानहोनिहानी ॥ एकत्वेंविलासतीदोन्हीं ॥ परीएकल्याहूनि ॥ दुजेंनाहीं ॥ ११ ॥ ह्मणोननवलावो ऐसा ॥ नवानव्होनिदृश्यविलासा ॥ विलासलातऱ्हींसहसा ॥ एकत्वानफुटे ॥१२॥ संमतिः ॥ यदिदंदृश्यतेकिंचित्सदैवात्मनिसंस्थितं ॥ नास्त्मेतिनचोदेतिजगत्किंचित्कदाचन ॥ इतिवासिष्ठे ॥ एवंयेथेंउमटेदृश्यद्रष्टेपण ॥ तोजोनयनाचाहीनयन ॥ आतांत्याचीअनुभवखूण ॥ सांगतुसे ॥ १३ ॥

**द्रष्टादृश्याचाग्रासी ॥ मध्येंलेखुविकोशी ॥**
**योगभूमिकाऐसी ॥ अंगींवाजे ॥ १८५ ॥**

जयाच्यासिद्धप्रकाशीं ॥ यादृश्यद्रष्टत्वापडेग्रासी ॥ आतांतेंआलेंलेखियासी ॥ द्रष्टेंऐसें ॥१४ कांजयाचाग्रासझाला ॥ तऱ्हींतेथेंमध्यलेखुविकाशला ॥ ह्मणजेतेंहिद्रष्टेंयाबोला ॥ पात्रजालें ॥ १५ ॥ तरीतेंद्रष्टेंसिद्धजाण ॥ परीनाहींदृश्यद्रष्टेपण ॥ तेंआपणयाआपण ॥ फुटेलकाई ॥१६॥ अगादृश्यद्रष्ट्याच्यासंगमी ॥ सरलीदृश्यद्रष्टेंऐसीउर्मी ॥ परीतेजैसीतैसीयोगभूमी ॥ विकारहीन ॥१७॥ जेथेंदृश्यद्रष्टत्वाचायोग ॥ होऊनहारलेउभयभाग ॥ तेयोगभूमिअभंग ॥ अंगींनवाजे ॥ १८ ॥ तेथेंयोगवियोगचिनाहीं ॥ तेसर्वदासरिसिचपाहीं ॥ तेंचितेंमाकाई ॥ वाजेलतेथें ॥ १९ ॥ अगासंभवनदेतांदुजें ॥ बाराकायआपणयावाजे ॥ तेवींतयाचेंतयानुपजे ॥ दृश्यद्रष्टत्व

कीं ॥ १४२० ॥ त्यासीकदानाहींलोपु ॥ संभवनेघेचिसंकल्पु ॥ नाहींआपायनाआरोपु ॥ जया च्यारूपीं ॥ २१ ॥ तेंपैंद्दज्ञात्रद्रष्टेंपाहीं ॥ तेथेंदृश्यद्रष्टृत्वभागनाहीं ॥ तेंनिष्फळत्वासीकेही॥ आनसारिखेंनोहे ॥ २२ ॥ हेंचिपुढेंदृष्टांतेंसी ॥ बोलिलाअसेविलासेंसी ॥ तेंहीआतांविवरणेंसी॥ बोलिजैलआइका ॥ २३ ॥

उठिलातरंगुबैसे ॥ पुढेंआनुहीनुमसे ॥
ऐसाठायींजैसें ॥ पाणीहोये ॥ १८६ ॥

उदकींतरंगजाले ॥ होऊनतेथेंचिसामावले ॥ परीउदकेंनाहींदेखिलें ॥ होणेंजाणें ॥ २४ ॥ तरंगरूपाआले ॥ परीउदकींचिअसेसंचलें ॥ तरीउदकींतरंगउठिले ॥ हेंचिनघडे ॥ २५ ॥ त्या उदकाचेंमुख्यरूप ॥ तरंगोद्भवनालोप ॥ नसोनसंकल्पनाविकल्प ॥ स्वरूपमात्रतैसें ॥ २६ ॥ असोउठिलातरंगआटे ॥ सर्वेंचिमागुताडुजानुठे ॥ तियेवेळेगोमटें ॥ उदकमात्रजेवीं ॥ २७ ॥ तेवींदृश्यद्रष्टृत्वेंवीण ॥ कोण्हीएकजेंचिद्धन ॥ स्वरूपस्थितीचेंलक्षण ॥ मुख्यतेंचि ॥ २८ ॥ ऐसी बाणतांप्रतीति ॥ मगजालयाहीदृश्यसंपत्ति ॥ नढळेसंविति ॥ पूर्वोक्तजेकीं ॥ २९ ॥ जेवींतरंग उठिलाबैसला ॥ तोतरंगभावानाहींआला ॥ तैसाप्रत्ययोजाला ॥ तरीअसतहीमिथ्या ॥१४३०॥ तेवींदृश्याच्याठायीं ॥ चिन्मात्रत्वाहानीनाहीं ॥ तरीदृश्यहेंपाहीं ॥ वाग्विलासु ॥ ३१ ॥ स्वता चिन्मात्रजरीपूर्ण ॥ तरीकैंचेंतेथेंदृश्यभान ॥ पूर्वापरतेवीण ॥ निश्चयोहापैं ॥ ३२ ॥ एवंस्वरूप स्थितीतेकाई ॥ तरीतरंगाचाउद्भवनाहीं ॥ तेवेळींजळजैसेंपाहीं ॥ सुनिश्चळअसे ॥ ३३ ॥ तेवीं स्वरूपस्थितीच्याठायीं ॥ दृश्यहेंकैंचेंकाई ॥ उद्भवलयेंसींनाहीं ॥ वार्तायाची ॥ ३४ ॥ आतां ऐसीहेस्थिति ॥ आणीकांहींदृष्टांतीं ॥ सांगतसेंतेंसंतीं ॥ अवधारावें ॥ ३५ ॥

कांनिदसरोनिगेली ॥ जागृतीनाहींचेयिली ॥
तेव्हांहोयेआपुली ॥ जैसीस्थिति ॥ १८७ ॥

अगानिद्रेहूनिवाईलाजाला ॥ परीनावेकनिवांतचिअसेसंचला ॥ असोउमजुनाहींघेतला ॥ विषयांचेसोई ॥ ३६ ॥ निद्रातरीसरलीपाहीं ॥ जागृतिहीघेतलीनाहीं ॥ ऐसीस्थितीजेकांहीं ॥ मध्यदशेची ॥ ३७ ॥ निद्रेहूनजालाअतीत ॥ परीपदार्थकांहींनस्फुरत ॥ आळविल्यावोदेत ॥ परीहेतनाहीं ॥ ३८ ॥ तेनिद्रानव्हेनाजागृति ॥ ऐसेंकांहींजेस्थिति ॥ दृश्यद्रष्टृत्वेंवीणआइती ॥ वस्तुमात्रतैसी ॥ ३९ ॥ जेणेंसुखेंनिद्राकेलीहोती ॥ तेणेंसुखेंविलासेजागृती ॥ तियेसुखमात्रीं चीअवस्थिती ॥ ऐसियेदशे ॥ १४४० ॥ अगादृश्यद्रष्टृत्वाच्याठायीं ॥ वस्तूसीहानीनाहीं ॥ परी वस्तुमात्रींजेंकांहीं ॥ दृश्यद्रष्टृत्वेंवीण ॥ ४१ ॥ तियेनेंदृश्यदेखिलेंनाहीं ॥ मादेखोनसांडीलकाई॥ किंबहुनाद्रष्टृत्वहीनसेपाहीं ॥ द्रष्ट्मात्रींजियें ॥ ४२ ॥ तेंकोण्हेसंबधेंवीण ॥ निखळदेखतीचखूण॥ हेंअनुभवायेतांजाण ॥ अनुभवचिविरे ॥ ४३ ॥ हेदृष्टांतमिशेंखूण ॥ स्वरूपस्थितीचेंलक्षण ॥ पुढेंऐसेंचिजाण ॥ बोलतुअसे ॥ ४४ ॥

नानाएकाठाउनुठी ॥ अन्यत्रनव्हेपैठी ॥
हेगमेतैसियादृष्टी ॥ दिठीसुता ॥ १८८ ॥

एकपदार्थीहूनपरतली ॥ दुसऱ्याठायींनाहींलागली ॥ इयेसंधीजैसीएकली ॥ डोळाचिदृष्टि ॥ ४५ ॥ तैंउघडाचिडोळापाहीं ॥ दृश्याचीसोयनाहीं ॥ किंबहुनादेखतचिकांहीं ॥ उगीचदृष्टि

॥ ४६ ॥ ऐसाहासूक्ष्मसंधी ॥ येथेंपावेजयाचीबुद्धी ॥ तियेबुद्धिचियेशुद्धी ॥ पैसुजैंपावे ॥ ४७॥ नानाविचारांचियाशांतदशा ॥ तेथेंलाहीजेकींइयादशा ॥ कांजेऐसियादिठीसुताऐसा ॥ संकेतकेला ॥ ४८ ॥ त्यासंकेताचेंहीविवरण ॥ जैंउमजेदृष्टांताचेंलक्षण ॥ तियेचिदिठीपाहिजे जैंजाण ॥ स्थिरावोनि ॥ ४९ ॥ तरीस्वरूपस्थितीचीसोये ॥ दृष्टांतींचआतुडेपाहें ॥ जनींवनींभरूनिराहे ॥ देखणेंचिअघवें ॥ १४५० ॥ तेथेंदृश्यासीठावनाहीं ॥ दृङ्मात्रदेखणेंचिअवघेंपाहीं ॥ दिठीआपुल्याचिठायीं ॥ पुंजाळोनिराहे ॥ ५१ ॥ मगअवलोकितांजनविजनसोये ॥ नगुंफतीदिठीचेपाये ॥ किंबहुनाइयेदिठीमाजींहोये ॥ अवघेंचिमृषा ॥ ५२ ॥ असोतेदृष्टिअसेमोकळी ॥ एकिहेळाअवघेचिन्याहाळी ॥ नानापदार्थीनाहींजाली ॥ नानाजेकीं ॥ ५३ ॥ तेंस्वरूपसर्वदापूर्ण ॥ भागाभागविहीन ॥ येचिविषयींआन ॥ दृष्टांतअसे ॥ ५४ ॥

**कांमावळोसरलादिवो ॥ रात्रीचानकरीप्रसवो ॥**
**तेणेंगगनेंहाभावो ॥ वाखाणिला ॥ १८९ ॥**

सूर्याच्याअस्तमानीं ॥ जेव्हांउपजलीनाहींरजनी ॥ तेरजनीदिवसाहूनि ॥ वेगळीजेदशा ॥५५॥ तोरजनीदिवसेंवीण ॥ कोण्हीएकदिवसजेवींजाण ॥ तेवींदृश्यद्रष्टृत्वनसोन ॥ द्रष्टेंजेंकांहीं ॥५६॥ अगासूर्यअस्तहोतां ॥ रात्रिहीनुदैजतां ॥ ऐसाकोण्हीएकपाहातां ॥ निरूपाधिसमयो ॥ ५७ ॥ जोउदयअस्तेंवीण ॥ जोदिवसाचाहीदिवसजाण ॥ जयावरीउदयअस्ताचीखूण ॥ उमटतअसेपैं ॥ ५८ ॥ तोअस्तींअस्तवेना ॥ उदैजोउदैजेना ॥ किंबहुनातयाचियाखूणा ॥ गगनसाक्षी ॥ ५९ ॥ कांजैंउदयअस्तासरिसें ॥ गगनजैसेंतैसेंअसे ॥ तियेगगनींचितोदिवसदिवसेंवसे ॥ गगनहोऊनि ॥ १४६० ॥ ह्मणोनअंधारनाउष्ण ॥ ऐसाजोदिवसउपाधिहीन ॥ किंबहुनाजेवींगगन ॥ दृश्यातीत ॥ ६१ ॥ अगातियेसंधीसजेंभान ॥ तोहीऔपाधिकगुण ॥ ह्मणोनतियेहीप्रभेपैलाडिलजाण॥ सूक्ष्मकाळजो ॥ ६२ ॥ जोउजियडाअंधाराअतीत ॥ तयागगनेंसीअसेसांघात ॥ कांजेगगनेंनेणें मात ॥ उदयअस्तूची ॥ ६३ ॥ ह्मणोनगगनवाखाणीतयासी ॥ वाचोनगोचरनव्हेनेत्रासी ॥ कीं तयाआणिगगनेसी ॥ भिन्नभेदनाहीं ॥ ६४ ॥ आतांनिरावेवनिर्गुण ॥ गगनहेंवाचारंभण ॥ तियेवाचेसीसारून ॥ पाहिजेजरी ॥ ६५ ॥ तरीइयादिवसेंसींगगन ॥ गेलेंनिर्धारींजिरोन ॥ तोनिर्धारुहीजाण ॥ द्रष्टृत्वींविराला ॥ ६६ ॥ जयाद्रष्ट्याचेरहाटीं ॥ विलासतीदृश्याचियाकोटी ॥ तेंद्रष्टेंआटेपोटीं ॥ द्रष्ट्याचेचि ॥ ६७ ॥ तेंदृश्यद्रष्टेंदिवारजनी ॥ विहीनजोदिवसकोण्हीं ॥ तो निर्धारासीह्मणी ॥ गोचरहोये ॥ ६८ ॥ असोतेंदृश्यद्रष्टृत्वेंविहीन ॥ स्वताचिजेंचिद्गगन ॥ तेंआपल्यारूपींजाण ॥ पालटनेघे॥६९॥ तेथेंदृश्यद्रष्टाहेकैंची ॥ अवघीरीतितेथिलप्रभेची ॥ परीतेप्रभागिळूनतैसीचि ॥ ठायींचअसे ॥ १४७० ॥ तेथेंनलगेदुजामळ ॥ सर्वदासुनिश्चळ ॥ ऐसेंचिकांहींप्रांजळ ॥ पुढेंहीबोले ॥ ७१ ॥

**घेतलास्वासुबुडाला ॥ धांपतांनाहींउठला ॥**
**तैसादोहींसीसिवंतला ॥ नव्हेजोअर्थु ॥ १९० ॥**

जेवींनिदेलियासीनुठितां ॥ श्वासोच्छ्वासगतागतता ॥ तेवींस्वरूपअन्यथा ॥ नव्हेतेंदृश्यद्रष्टृत्वें ॥ ७२ ॥ किंवाप्राणाचीपैसारी ॥ जिरालीहृदयमंदिरीं ॥ मागुतीउठीदुसरी ॥ इतुकियामध्येंजें ॥ ७३ ॥ तेंमुख्यप्राणाचेंनिजरूपजाण ॥ जेंकींनिरोपाधिकलक्षण ॥ आतांपावतांहीचळण ॥ तोचिकींप्राणु ॥ ७४ ॥ उपाधिसारूनिपाहिजे ॥ तरीप्राणेंप्राणत्वींचअसिजे ॥ तेथेंदिसे

चंचळताजेंजें ॥ तेंनिश्चळतातेथिंची ॥ ७५ ॥ जेवींअग्निउष्णत्वेंचिशांत ॥ तेवींवायुगती सीचिनिवांत ॥ तेवींदृश्यद्रष्टृत्वनाहींजेथ ॥ दृङ्मात्रकळाजे ॥ ७६ ॥ तेंदृश्यद्रष्टृत्वेंकरून ॥ नसंडीआपलीखूण ॥ ऐसेंकांहींएकजाण ॥ दृष्टिमात्र ॥ ७७ ॥ असोतोप्राणाचाहीप्राण ॥ जेथून प्राणासीनिश्चळताआणिचळण ॥ आतांवस्तुमात्रकायआन ॥ याहूनअसे ॥ ७८ ॥

**कींअवधाचीकरणी ॥ विषयांचीघेणी ॥**
**करितांचीएकेक्षणीं ॥ जेकींआहे ॥ १९१ ॥**

अगाप्रत्यक्षइंद्रियाविषयप्रत्यक ॥ ज्याचातोभोगीयत्नपूर्वक ॥ तेंयत्नेंवीणविषयसुख ॥ अप्रा प्ततया ॥ ७९ ॥ तोयत्नकेलयाहीपाहीं ॥ एकाचाविषयएकाप्राप्तनाहीं ॥ आतांअवघाचिरसएके ठायीं ॥ यत्नावीणप्राप्त ॥१४८०॥ अगाविषयींजोउमटेरसु ॥ तोजेणेंरसेंअसेसुरसु ॥ तोरसाचाही रसु ॥ अवघायांचाएकु ॥ ८१ ॥ तेणेंतयासीचाखतांदेख ॥ अवघीइंद्रियांचीमोडलीभूक ॥ स्वादनघेतांप्रत्यक ॥ अवघींचतृप्त ॥ ८२ ॥ अगाउफराटीयावृत्ति ॥ इंद्रियेंतोठावपावती ॥ तैं एकेचक्षणींहोती ॥ अवघींचतृप्त ॥ ८३ ॥ तेणेंचिवाचावावडे ॥ तेचिशब्दरूपेंहोयवाचेपुढें ॥ तियाचिआवडीआवडे ॥ श्रवणासीशब्द ॥ ८४ ॥ एवंतेथेंचिउद्वादे ॥ सेखींतेथेंचितेंनांदे ॥ वाच्यवाचकभेदें ॥ भेदवेनाजें ॥ ८५ ॥ तैसीत्वगींजेत्वगशक्ति ॥ तेचिस्पर्शहोयेत्वकाप्रति ॥ ग्रहणशक्तिदिसेहस्तीं ॥ तेंतेंचिरूपगा ॥ ८६ ॥ अगासकळरूपाचेंरूपस ॥ तेंचिहेरूपाचीमूस ॥ तेणेंचिगतिजाणिजेस ॥ पादेंद्रियांयर्या ॥ ८७ ॥ मिष्टमधुरादिरसवाणियां ॥ जेणेंरसेंरसवंता इया ॥ तोचिरसनामिशेंमुसोनियां ॥ राहिलाअसे ॥ ८८ ॥ तेणेंमिष्टमधुरादिपरी ॥ जिव्हाके लीसेअतिचतुरी ॥ तेमुख्यरसेंपारखिकरी ॥ नानारसांचीकीं ॥ ८९ ॥ मगतेंनानात्वेंमोडूनि ॥ एकरूपउपतिष्ठेशिष्णीं ॥ तोआनंदमात्रहोऊनि ॥ आनंदींमिसळे ॥ १४९० ॥ एवंभोगीतसेआ नंदु ॥ आनंदचिआपुलास्वादु ॥ माझारिलहाजोछंदु ॥ तोहीतद्रूपअघवा ॥ ९१ ॥ तैसेंचिपरि मळजेणेंसुवास ॥ तेंचिपरिमळाचीहेमूस ॥ तेंचियेऊनिघ्राणास ॥ पारखीहोय ॥ ९२ ॥ अहोतें आपणनव्हेवाणीविचित्र ॥ ह्मणोनजाणेवाणीचेंचित्र ॥ तेंआपणचिजालेंपात्र ॥ घ्राणरूपेंपैं॥९३॥ तेवाणीविचित्राचीमूस ॥ गुदरूपेंपृथ्वीहेंजाणिजेस ॥ किंबहुनातेथेंहीएकरस ॥ परिणमलेंअसे ॥ ९४ ॥ अगातेआपलियेकुसरी ॥ मध्येंचवाणीभेदविस्तारी ॥ सेखींआपणचिस्वीकारी ॥ आप लेंरूप ॥ ९५ ॥ तेथेंवाणीभेदहारपे ॥ आनंदचिआनंदेंउद्दीपे ॥ एवंऐसियेस्वरूपें ॥ संबंधीजेकीं ॥ ९६ ॥ अगातेसंबंधाअतीत ॥ आपणचिअवघेंनहोनहोत ॥ होऊनआपलेंकोडपुरवित ॥ आप णचिपाहा ॥ ९७ ॥ तोअवघाकरणीविषयएकु ॥ तोचियाकर्णाचाप्रवर्तकु ॥ तेथेंघेणियादेणि याचाकळंकु ॥ लागलानाहीं ॥ ९८ ॥ ह्मणोनअवघाचीकरणी ॥ घेइजेतेंएकेचक्षणीं ॥ घ्याव याचीवोढणी ॥ नलागोनिचपाहा ॥ ९९ ॥ एवंस्वरूपस्थितीचेंनिरूपण ॥ याचाउपसंहारक रून ॥ पुढिलेपदींजाण ॥ सांगतुअसे ॥ १५०० ॥

**तयासारिखाठावो ॥ हानिकराचाआत्मभावो ॥**
**येणेंकांपाहों ॥ नपाहोंलाभें ॥ १९२ ॥**

अगाहेंनवांपदींकरून ॥ स्वरूपस्थितिअतिनिर्वाण ॥ बोलिलेंयेथेंजाण ॥ अन्यथानाहीं ॥ १ ॥ ऐसियास्वरूपाच्याठायीं ॥ पाहाणेंनपाहाणेंअसेकाई ॥ आतांयेथेंपाहीं ॥ अज्ञानकैंचें ॥ २ ॥ श ब्दाचेनिविरोधें ॥ अविरोधेंस्वरूपनांदे ॥ जयांचेएकत्वद्वंद्वे ॥ सिवतीजेनापैं ॥ ३ ॥ एवंसर्वत्रद्र

ष्टेंपूर्ण ॥ येथेंपाहेंनपाहेकोण ॥ नपाहातांनतुटेजाण ॥ पाहाणेंजयाचें ॥ ४ ॥ येथेंपाहातांपाहाणयाबाध ॥ येईलहेंअवघेंअबद्ध ॥ आतांअज्ञानसंबंध ॥ कवणासीलागे ॥ ५ ॥ अगासांगीतलीस्वरूपाचीखूण ॥ यासीकधींचनाहींविलक्षण ॥ दृश्यात्रदृष्टिवीण ॥ आणीकनाहीं ॥ ६ ॥ अहोहेंजेंभासमान ॥ तेंचिदैकार्णवचिपूर्ण ॥ ह्मणोनसदसच्चाहमर्जुन ॥ बोलिलेंगीतेसी ॥ ७ ॥ तस्मात्अज्ञानेंवीण ॥ निखळद्रष्टेंचिएकपूर्ण ॥ पाहोंनिनयेपाहातेंपण ॥ नपाहातांननसे ॥ ८ ॥ कांजेंआपणचिआपण ॥ येथेंपाहिजेकायकोण ॥ धर्मधर्मित्वेंवीण ॥ पाहाणेंमात्रकीं ॥ ९ ॥ ह्मणोनआपणचिआपणया ॥ नयेपाहातेंपणाच्याआया ॥ येविषईओवीया ॥ पुढेंहीअसती ॥ १५१० ॥

**कायिआपुलियेभूमिकें ॥ आरिसाआपलेंनिकें ॥ पाहोंनपाहोंसके ॥ हेंकेंआहे ॥ १९३ ॥ कांसमोरपाठिमोरिया ॥ मुखेंहोऊंयेआरिसिया ॥ वांचूनतयाप्रतितया ॥ होवावेंकां ॥ १९४ ॥**

आपलेंस्वच्छपण ॥ आपणामाजींजाण ॥ आरिसाकैसेन ॥ पाहोंसकेपां ॥ ११ ॥ आरिसाह्मणिजेऐसें ॥ स्वच्छतामात्रअसे ॥ तयातेंतयानेंकैसें ॥ पाहिजेनपाहिजे ॥ १२ ॥ मुखआरिसापरिच्छिन्न ॥ ह्मणोनसमोरहोइजेआरिसेन ॥ वांचूनआरिसाआरिसयाजाण ॥ सन्मुखनाविमुख ॥ १३ ॥ तेवींदृश्यात्रद्रष्टेपण ॥ देखोननयेदेखतेपण ॥ नानपाहेतरीजाण ॥ अदेखणेंनव्हे ॥ १४ ॥ जेवींमुखमात्रचिहुताशन ॥ तेवींज्ञानमात्रचिस्वरूपपूर्ण ॥ तेंआपणयाआपण॥देखोंनानदेखो १५

**सर्वांगेंदेखणारवी ॥ परीऐसेंघडेकेवीं ॥ जेउदोअस्तुचीचवी ॥ स्वयेंघेपे ॥ १९५ ॥**

रविप्रकाशेंकरून ॥ प्रकाशलेंदिसेजनवन ॥ तरीतोचितयासीजाण ॥ कायअप्रकाशकु॥१६॥ परीतयाच्याठायींजाण ॥ नाहींउदयनाअस्तमान॥नेणिजेह्मणोनउदयअस्ततेणें ॥ जाणिजेना १७ तेवींआपलेदेखणेपणें ॥ नदेखणेंदेखणेंनेणें ॥ आतांतेंअदेखणें ॥ ह्मणावेंकाई ॥ १८ ॥

**कींरसुआपणियापियें ॥ कींतोंडलपऊनिठायें ॥ हेंरसपणनव्हे ॥ तयाजैसें ॥ १९६ ॥ तैसेंपाहाणेंनपाहाणें ॥ पाहाणेंपणेंचिहोनेणें ॥ आणिदोन्हीहेंयेणें ॥ स्वयेंचिअसिजे ॥ १९७ ॥**

अगाजिव्हासंबंधेंवीण ॥ अंगेंरसमात्रचिजोजाण ॥ तोआपणयाआपण ॥ चाखेलकेवीं ॥१९॥ तरीतोकायविरसजाला ॥ रसत्वाकायमुकला ॥ असोतेणेंतोचाखिला ॥ नचाखतुचि ॥१५२०॥ असोरसाचेंवदन ॥ रसुचिअसेआपण ॥ त्यावदनासीतंवजाण ॥ चुकऊंनसके ॥ २१ ॥ तैसेंपाहाणेंमात्रवस्तु ॥ नचढेपाहाणेयाचाहातु ॥ येथेंनपाहाणयाचीहीमातु ॥ हातींनलागे ॥ २२ ॥ ह्मणोनयापाहाणयामाझारीं ॥ नपाहाणयापाहाणयाचीकुसरी ॥ नसोनपरस्परेंतेंचिपरी ॥ दोन्हीएक ॥ २३ ॥ आतांदेखणेंअदेखणेंजाण ॥ हेंयाचेंदेखतेपण ॥ ह्मणालहेंघडेलकैसेन ॥ तरीतेंहींपरियेसा ॥ २४ ॥

**जेंपाहाणेंचिह्मणोनिया ॥ पाहाणेंनव्हेहाआपणया ॥ तैंनपाहाणेंआपसया ॥ हाचिआहे ॥ १९८ ॥**

निखळेंचिजेंद्रष्टेपण ॥ आदिमध्यांतविहीन ॥ जेथेंनाहींनिपटून ॥ दुसराहेतु ॥ २५ ॥ जेथेंसा

वेवतापैंअसेना ॥ केवलपाहणेंपैसेजेजाणा ॥ तेंआपलेंपाहणेपणा ॥ पाहेकेवीं ॥ २६ ॥ याला गींहेंनपाहाणेंहोये ॥ परीआपलेपाहाणेपणेंचिनपाहे ॥ एवंदोहींअभिप्रायें ॥ एकुचिअर्थु ॥२७॥ ह्मणोननपाहाणेंबोलिलें ॥ तेंपाहाणेंनिचिअसेनिडारलें ॥ तेचिपदेंपुढिलें ॥ बोलतुअसे ॥ २८ ॥

**आणिनपाहाणेंमाकैसें ॥ आपणपेंपाहोंबैसे ॥**
**तरीपाहाणेंहेंऐसें ॥ हाचिपुढती ॥ १९९ ॥**

अगानपाहाणेंअसतें ॥ तरीआपणयांकेवींपाहातें ॥ आतांहेपाहोनिचिहोतें ॥ नपाहाणेंऐसें ॥ २९ ॥ ह्मणोनिआपणासीपाहे ॥ तेंजरीनपाहाणेंहोये ॥ तरीनपाहातियाअभिप्रायें ॥ पाहाणेंचि पुढती ॥ १५३० ॥ एवंदेखोंजातांदेखतेंनव्हे ॥ तरीदेखणियाहीउणीवनये ॥ ह्मणोनिदोन्हींनहो निहोय ॥ कांहींएकजें ॥ ३१ ॥

**हेंदोन्हींपरस्परें ॥ नांदतीएकाहारें ॥**
**बांधोनियेरायेरें ॥ नाहींकेलें ॥ २०० ॥**

पाहाणेंनपाहाणेंमीळोन ॥ स्वरूपएकचिजाण ॥ तरीयेरयेरांचेन ॥ नाशिलींजाती ॥ ३२ ॥ कांजेंएकएकाचेंविरोधी ॥ ह्मणोनएकहीनजायसिद्धि ॥ एवंपाहाणेंनव्हेनकधीं ॥ नपाहाणेंही नव्हे ॥ ३३ ॥ अगापाहाणेंचिनसुधेंआहे ॥ ह्मणोननपाहाणेंहेंचिहोये ॥ तरीयासीकायह्मणोंये ॥ नपाहाणेंऐसें ॥ ३४ ॥ आतांपाहाणेंचिहेंएकलें ॥ तरीकोणेंकायपाहिलें ॥ एवंदोहींसीहीआलें ॥ व्यर्थत्वयेथें ॥ ३५ ॥ येथेंह्मणीअभावगमोंये ॥ ह्मणोनपुढेंबोलतुआहे ॥ यादोपणासीशब्दुचिवा यें ॥ येरजैसेंतैसें ॥ ३६ ॥

**पाहाणयापाहाणेंआहे ॥ तरीनपाहाणेंहेंचिनोहे ॥**
**ह्मणोनियाचीसोये ॥ नेणतीदोन्ही ॥ २०१ ॥**

अगापाहाणेंआपणापाहे ॥ तरीपूर्वींचपाहिलेंआहे ॥ ह्मणोनपाहातांचिहोये ॥ नपाहाणिया ऐसें ॥ ३७ ॥ यालागींविरोधेंवीण ॥ पाहाणेंनव्हेनानपाहाणेंजाण ॥ येथेंअभावाचीखूण ॥ बुडो नगेली ॥ ३८ ॥ येथेंदोन्हीहेभाग ॥ नसिंवतीस्वरूपाचेंअंग ॥ द्रष्टेंमात्रचांग ॥ स्वरूपजेंकीं ॥३९॥ पाहाण्यानपाहाण्यानेणें ॥ कांजेंनपाहाणेंतेंचिकींपाहाणें ॥ ह्मणोनदोन्हीभागवायाणें ॥ होऊन ठेलें ॥१५४०॥ एवंविरोधनसोन ॥ स्वरूपऐसेंचिपैंजाण ॥ हेंचिदृढीकरण ॥ पुढेंहीबोले ॥४१॥

**एवंपाहाणेंनपाहाणें ॥ चोरूनयाअसणें ॥**
**नापाहेतरीकोणें ॥ कायपाहिलें ॥ २०२ ॥**

अगायादोहींभागासीचोरून ॥ स्वरूपमात्रजेंजाण ॥ तेंअनारिसेंनहोन ॥ पाहोंहीलागे ॥ ४२ कांजेंपाहाणेंमात्रआहे ॥ तेंनपाहातेंकेवींठाये ॥ ह्मणोनपाहिलेपणानये ॥ आणिपाहेहीजरी ॥ ४३ ॥ तेंपाहिलेंतैसेंनाहीं ॥ स्वरूपठायींच्याठायीं ॥ दृङ्मात्रदृष्टीचिपाहीं ॥ एकलीअसे ॥४४॥ काळत्रयींअविलक्षण ॥ तेथेंकारणांतरअज्ञान ॥ मानावेंहेंअनुमान ॥ वास्तवनव्हे ॥ ४५ ॥ अगादृ श्यद्रष्टृत्वेंविहीन ॥ संचलेंचिस्वरूपपूर्ण ॥ इत्यादिनिरूपणेंकरून ॥ सांगीतलेंऐसें ॥ ४६ ॥ दृ श्यद्रष्टृत्वनाहीं ॥ तरीकारणेकाजकाई ॥ आतांहेंअज्ञानपाहीं ॥ कासयाअसें ॥४७॥ एवंस्वरू- पनिर्विकारसंचलें ॥ तेथेंदृश्ययेवढेंविकरलें ॥ त्यासकारणमानिलें ॥ अज्ञानसाच ॥४८॥ या

पूर्वपक्षापरिहरण ॥ येथवरीकेलेंजाण ॥ निराकारिलेंअज्ञान ॥ विशेषयेथें ॥ ४९ ॥ आतांअज्ञानाचेंनिराकरण ॥ याचेंकरावयादृढीकरण ॥ मागुतासूचिलाजाण ॥ पूर्वपक्षु ॥ १५५० ॥

**दिसत्यानेदृश्यसभासे ॥ ह्मणावेंनादेखिलेंऐसें ॥**
**तरीदृश्यास्तवदिसे ॥ ऐसेंनाहीं ॥ २०३ ॥**

पूर्वार्धीचाअभिप्राव ॥ दिसेआशंकेचाभाव ॥ तेचिआशंकावाव ॥ उत्तरार्धेंकेली ॥ ५१ ॥ अह्मोदृश्यद्रष्टृत्वेंहीन ॥ वस्तुचिन्मात्रसंचलीजाण ॥ तरीहेंदृश्यभान ॥ देखिलेंकवणें ॥ ५२ ॥ प्रत्यक्षहेंदृश्यादिसे ॥ तेंनाह्मणावेंकैसें ॥ एवंदृश्यास्तवयेतसे ॥ देखतेपणस्वरूपीं ॥ ५३ ॥ दृश्यदेखोनिहोयदेखतें ॥ तरीकारणांतरनघडेकेवींयेथें ॥ स्वरूपदुसरियेदशेतें ॥ पावलेंअवश्य ॥ ५४ ॥ एवंदृश्यदेखतांजाण ॥ कारणांतरअज्ञान ॥ स्वरूपींद्रष्टेपण ॥ संबंधोपार्जित ॥ ५५ ॥ एवंस्वतंत्रदृश्यभान ॥ आत्माअसेनेणुकोण ॥ तोपरतंत्रेंपावेचळण ॥ अनुमानेंऐसें ॥ ५६ ॥ याअक्षेपापरिहर ॥ उत्तरार्धाचेंअंतर ॥ सूचिलेंतेंसविस्तर ॥ विवरणआइका ॥ ५७ ॥ अर्धीदृश्यरचलें ॥ मगद्रष्टेंदिठेंजालें ॥ ऐसेंनकायदेखिलें ॥ दृश्यातेंयेणें ॥ ५८ ॥ अगास्वरूपींद्रष्टृत्व नसे ॥ तरीदृश्यचिकेवींउमसे ॥ सूर्येंअस्तींकैसें ॥ मृगांभउमटे ॥ ५९ ॥ याचाद्रष्टृत्वविलास ॥ तोचिहादृश्यभास ॥ येथेंकारणांतरविशेष ॥ कासयाआला ॥ १५६० ॥ जऱ्हींदृश्यदिसेविलासलें ॥ तऱ्हींद्रष्टेंचिकींतेंसचलें ॥ ह्मणोनदेखोननाहींआलें ॥ देखतेपणतेथें ॥ ६१ ॥ आतांदृश्याचेप्रवाहें ॥ द्रष्टेंअन्यथानव्हे ॥ तरीदृश्यचिहेंपाहें ॥ दृश्यनव्हेकीं ॥ ६२ ॥ अगादृश्यजेंजेंउमटे ॥ तेथेंद्रष्टृत्वचिदाटे ॥ असोद्रष्टेंचिआपणउमटे ॥ दृश्यविलासें ॥ ६३ ॥ ह्मणोनदृश्यभासपाहीं ॥ द्रष्ट्यावीणदुजानाहीं ॥ पुढेंऐसेंचिकांहीं ॥ बोलतअसे ॥ ६४ ॥

**दृश्यकीरदृशीदिसे ॥ परीसाचकींद्रष्टाअसे ॥**
**आतांनाहींतेंकैसें ॥ देखिलेंहोये ॥ २०४ ॥**

नावेकदृश्यहेंदिसेकांहीं ॥ परीद्रष्ट्याहूनिदुजेठायीं ॥ दृश्यदशेसपाहीं ॥ आलेंचिनाहीं॥६५॥ अळुमाळविलासेंभासे ॥ परीयथार्थेंद्रष्टृत्वींचअसे ॥ त्याद्रष्टृत्वासीकदानसे ॥ पालटुजाला ६६ अहोद्रष्टेंद्रष्टृत्वींहूनि ॥ फुटोनिजालेंनाहींदोन्ही ॥ आतांदृश्याचीमिरवणी ॥ वाग्विडंबुअघवा ॥ ६७ ॥ एवंदृश्यचियेथेंनाहीं ॥ तरीद्रष्टेंनेंदेखिलेंकाई ॥ अगासूर्यप्रभेच्याठायीं ॥ मृगजळजैसें ॥ ६८ ॥ अगातेथेंजेंजळभान ॥ तेंआणीकाचेबुद्धिजाण ॥ आतांआत्मत्वींपाहाकोण ॥ दुजेंआलें ॥ ६९ ॥ एवंदह्मात्रजेंद्रष्टेंपाहीं ॥ तेणेंअन्यथादेखिलेंनाहीं ॥ स्वसंवेद्यतेसीकधींही ॥ अनारिसें नसे ॥ १५७० ॥ ह्मणोनयादृश्यप्रवाहीं ॥ देखिजेतेंदेखिलेंचिनाहीं ॥ दृष्टांतइयेविषईं ॥ देतुसे आयिका ॥ ७१ ॥

**मुखदिसोकांदर्पणीं ॥ परीअसणेंकींतयेमुखपणीं ॥**
**तरीजालीतेवायाणी ॥ प्रतीतिकीं ॥ २०५ ॥**

अगामुखमुखींचअसेपाहीं ॥ आरिसांतंवरिघालेंनाहीं ॥ आतांदेखिलेंतेंकाई ॥ देखिलेंहोये७२ यालागींदेखतदेखतपाहीं ॥ दृश्यासीदृश्यत्वनाहीं ॥ आतांदेखिजेतेजेंकांहीं ॥ तेंआपणचिआपणया ॥ ७३ ॥ उक्तंच ॥ कंचनब्रह्मरत्नस्यजगादित्येवयत्स्थितं ॥ तत्तत्कारणकंयसात्तेननव्यतिरि

क्ष्यते ॥ १ ॥ अगाहाचिअंतरार्थशुद्ध ॥ लागलापुढिलेंपदींसंबंध ॥ तेंपदहीआतांविशद ॥ विवरूनसांगों ॥ ७४ ॥

**देखतांचिआपणयातें ॥ आलियेनिदेचेनिहातें ॥**
**तयास्वप्नाऐसेंयेथें ॥ निहाळिता ॥ २०६ ॥**

जैसाएकलाचिपुरुष ॥ स्वप्नींएकुचिजालाबहुवस ॥ तोचियेपरीहीआपणास ॥ आपणचि देखे ॥ ७५ ॥ देखिलेंऐसेंभाविजे ॥ तरीआपणासीचदेखिजे ॥ कांजेनिदेलाठायींदुजें ॥ संचरलें नाहीं॥७६॥आतांहेंजेंदेखिलेंकांहीं ॥ तेंदेखिलेंचिकींनाहीं ॥ ह्मणोनहेंचिपाहीं ॥ पुढेंहीबोले ७७

**निद्रिस्तुसुखासनीं ॥ वाहिजेअनुवाहाणीं ॥ तोसाचकायते सणीं ॥ दशापावे ॥२०७॥ कींशिशेवीणएकएकें ॥ दाविलीं राज्यकरितीरंकें ॥ तैसींचितियेंसतुकें ॥ आथीकाई ॥२०८॥ तेनिद्राजेव्हांनाहीं ॥ तेव्हांजोजैसाजियेठायीं ॥ तैसाचिस्व प्नींकांहीं ॥ नदविजेचिकीं ॥ २०९ ॥**

अगानिद्रिस्तुजोआपण ॥ आपणचिहोऊनसुखासन ॥ आपणचिआरोहण ॥ करितांजाला ॥ ७८ ॥ आणिसुखासनाचेवाहक ॥ तेहीदिसतीप्रत्यक ॥ तरीकायसकळिक ॥ यथार्थजाले ॥ ७९ ॥ किंवारंकेंराज्यपावलीं ॥ सिरेंचिवीणएकेंदेखिलीं ॥ तेनिदजेव्हांसरली ॥ तेंअघवेंचि नाहीं ॥ १५८० ॥ अहोहेंआतांह्मणावेंकाई ॥ देखतांचदेखिलेंनाहीं ॥ मानिद्राचिनसेपाहीं ॥ ते थेंहेंकैंचें ॥ ८१ ॥ तैसेंचिहेंदृश्यपाहीं ॥ दिसतचिदेखिलेंनाहीं ॥ आणिनदेखेजरीकांहीं ॥ तरी सहजचिनसे ॥ ८२ ॥ अहोआपलियालीळावसें ॥ आपणचिदृश्यत्वविलासे ॥ तेथेंआपणचिपा हातसे ॥ आपणयासी ॥ ८३ ॥ तेंदेखिलेंऐसेंआवडे ॥ परीएकपणजरीनविघडे ॥ तरीदेखिलेंचि नघडे ॥ देखिलेंऐसें ॥ ८४ ॥ मापाहावेंहेंजैंआवडे ॥ तैंदेखिलेंतेंहीबुडे ॥ तेथेंमागुतेंकेवींघडे ॥ देखणेंत्यासी ॥ ८५ ॥ एवंदृश्यहेंजेंकांहीं ॥ तेंदेखतांचिदेखिलेंनाहीं ॥ नदेखिजेतरीपाहीं ॥ सह जचिनसे ॥ ८६ ॥ ह्मणोनपुढलेंपदींजाण ॥ दाविलीदृष्टांताचीखूण ॥ तेआतांसावधान ॥ परि सावेंहोजी ॥ ८७ ॥

**तान्हेलयामृगतृष्णा ॥ नभेटलयासिणुजेसणा ॥**
**माभेटलयाकोणा ॥ कायभेटलें ॥ २१० ॥**

अगामृगांभसिंधुअंतरला ॥ ह्मणोनतृषार्तासिणुजाला ॥ तोथडियेसीहीआला ॥ तैंलाभक वण ॥ ८८ ॥ एवंभेटतांनभेटतांपाहीं ॥ मृगजळींजळबिंदुनाहीं ॥ तेवींदृश्यहेंलटिकेंकांहीं ॥ दे खतांनदेखतां ॥ ८९ ॥ अहोहेंदेखतांचदेखिलेंनाहीं ॥ नदेखतातंवनसेचिपाहीं ॥ आतांऐसेंचि कांहीं ॥ पुढेंहीबोले ॥ १५९० ॥

**कींसाउलीचेनिव्याजें ॥ मेळविलेंजेणेंदुजें ॥**
**तयाचेंकरणेंवांझें ॥ जालेंजैसें ॥ २११ ॥**

अगाआपलीसावली ॥ आपणेनसींदुजीभाविली ॥ भाऊनिमांडिली ॥ कौतुकेंक्रीडा ॥ ९१ ॥ तेंदेखिजेक्रीडाऐसी ॥ परीआलीनाहींक्रियादशेसी ॥ तेवींदेखतांदृश्यासी ॥ देखणेंमृषा ॥९२॥

अगादेखतांचिसावलीवाव ॥ तेथेंमानिलासाचभाव ॥ तोभावचिअभाव ॥ जाहालापाहा॥९३॥ तेथेंभावनेसीभाषणादिक्रिया ॥ तेआपलीचपावलीआपणया ॥ आतांकरणीचगेलीवायां ॥ जालीतेकीं ॥ ९४ ॥

**तैसेंदृश्यकरूनियां ॥ द्रष्टयातेंद्रष्टया ॥**
**दाऊनधाडिलेंवायां ॥ दाविलेंपणही ॥ २१२ ॥**

तैसेंदृश्याचेनिमिशें ॥ दृश्यचिद्रष्ट्यादेखतसे ॥ तेंदेखिलेंतैसें ॥ देखिलेंनोहे ॥ ९५ ॥ कांजें द्रष्टेंमात्रआपण ॥ तेंआपलेंचिदेखेद्रष्टेपण ॥ तयासीचिजालीजाण ॥ दृश्यसंज्ञा ॥ ९६ ॥ अहो द्रष्ट्यासीद्रष्टृत्वपाहीं ॥ देखावेंलागलेंनाहीं ॥ ह्मणोनदृश्यदशाकांहीं ॥ आलीचनाहीं ॥ ९७ ॥ ह्मणोनदेखिलेंनवीण ॥ दृश्यद्रष्टाचिअसेजाण ॥ ऐसेंचिनिरूपण ॥ पुढेंहीबोले ॥ ९८ ॥

**जेंदृश्यद्रष्टाचिआहे ॥ मादावणेंकासाहे ॥**
**नदविजेतरीनोहे ॥ तयातोकाई ॥ २१३ ॥**

अगाद्रष्टेपणद्रष्ट्याचें ॥ तेंचिहेंदृश्यसांचें ॥ तरीदृष्टेपणठायींचें ॥ द्रष्टाचिअसे ॥९९॥ तेंअवलोकनेंवीण ॥ द्रष्टाचिअसेजाण ॥ अवलोकनकारण ॥ नव्हेकींतया ॥ १६०० ॥ तेआपुलियेलीळावशें ॥ आपणयापाहोंबैसे ॥ तेव्हांचआपणादेखतुसे ॥ ऐसेंनाहीं ॥ १ ॥ अहोतेंजेव्हांनपाहे॥ तेंचित्याचेंपहाणेंहोये ॥ एवंदज्ञात्रदृष्टीसीनोहे ॥ कधींचिलोपु ॥ २ ॥

**आरिसापापानपाहे ॥ तरीमुखचिवायांजाये ॥**
**तेणेंवीणआहे ॥ आपणपेकीं ॥ २१४ ॥**

अगाआरिसापाहिलानाहीं ॥ तरीमुखचिगेलेंकाई ॥ तेंआरिसेवीणपाहीं ॥ ठायींचअसे ॥ ३ आतांपाहातांहीआरिसा ॥ मुखचिमूळमुखभासा ॥ कारणनव्हेचिसहसा ॥ आरिसातेथें॥४॥ ह्मणोनकारणांतरेंवीण ॥ द्रष्टृत्वींअसेद्रष्टेपण ॥ देखतांनदेखतांजाण ॥ द्रष्टृत्वनचुके ॥ ५ ॥ किंबहुनाद्रष्टेनिआपणया ॥ पाहिजेहेंचिवायां ॥ ह्मणोनिचिबोलिजेमाया ॥ मिथ्याअघवी ॥ ६ ॥ ह्मणोनिमागिलेदृष्टांतानुसारें ॥ पुढेंबोलतसेविस्तारें ॥ तेपरिसतुचतुरे ॥ महानुभाव ॥ ७ ॥

**तैसेंआत्मयातेंआत्मया ॥ नदवीचिपैंमाया ॥**
**तरीआत्मावावोकिंवायां ॥ तेचिकींना ॥ २१५ ॥**

देखणाआपेंआप ॥ नाहींदेखावयाचासंकल्प ॥ कांजेंसंकल्पाचैंस्वरूप ॥ नाडलेंस्वरूपीं ॥८॥ नाहींमायेचासांघातु ॥ ह्मणोनद्रष्टाअसेद्रष्टृत्वाअतीतु ॥ यालागींदेखिजेहेमातु ॥ हारपोनगेली ॥ ९ ॥ अहोआत्मादेखिलापाहीं ॥ जाणोदेखिलेंचिकांहींनाहीं ॥ कांजेदेखणयानसेकांहीं ॥ दशा दुसरी ॥ १६१० ॥ अगादेखणेंअसेसंचलें ॥ येथेंदेखतेपणनाहींआलें ॥ तरीकायजालें ॥ आत्मत्वमिथ्या ॥ ११ ॥ अहोआत्मत्वमिथ्यानाहीं ॥ हेमायाचिमिथ्यापाहीं ॥ ह्मणोनपाहावयाचेसोई॥ उभानठाके ॥ १२ ॥ किंबहुनादेखणाआपेंआप ॥ तरीमायाचिजालीखपुष्प ॥ अहोमायाहाजल्प॥ वृथाचिअसे ॥ १३ ॥ अगामायेचेनिगुणें ॥ आत्मयासीघडेदेखणें ॥ तरीआत्माकायजडपणें ॥ मोदळाअसे ॥ १४ ॥ आत्माचिन्मात्रपूर्ण ॥ सर्वदाआपणाआपण ॥ अवलोकनेंवीण ॥ अवलोकितअसे ॥ १५ ॥ आयिताशुद्धबुद्ध ॥ तेथेंदेखावयाचाउपरोध ॥ मानूनकरावेंसिद्ध ॥ कारणांतर ॥ १६ ॥ हेंयेथेंनलगेकांहीं ॥ देखणाठायींच्याठायीं ॥ पुढेंईयेविषईं ॥ मूळपदअसे ॥१७

**ह्मणोनिआपणापैंद्रष्टा ॥ नकरितांअसेपैठा ॥**
**आतांजालाचिदिठा ॥ कांकरावा ॥ २१६ ॥**

अगाद्रष्टयाचेंद्रष्टेपण ॥ असेकारणांतरेंवीण ॥ येथेंसंबंधउपपादून ॥ देखणाकरावा ॥ १८ ॥ हेंअवघेंअसंबद्धपाहीं ॥ देखणेंमात्रअसेठायीं ॥ तोदृश्यास्तवकाई ॥ देखणाहोये ॥ १९ ॥ दृश्य द्रष्टृत्वविलास ॥ ह्मणोनदेखणेंचदेखणयास ॥ पाहेतरीवास ॥ पाहिलीचनाहीं ॥ १६२० ॥ येथें देखिलेंऐसेंआवडे ॥ तरीआवडीचिदिठीमाजींबुडे ॥ ह्मणोनदेखतांचनघडे ॥ देखिलेंऐसे ॥२१ ह्मणोनद्रष्टेचद्रष्टयास ॥ देखतांनयेभेदास ॥ पुढेंऐसेंसविलास ॥ बोलतअसे ॥ २२ ॥

**नानामागुतेंदाविलें ॥ तरीपुनरुक्तजालें ॥**
**येणेंहीबोलेंगेलें ॥ दावणेंवृथा ॥ २१७ ॥**

द्रष्टेंदेखेद्रष्टेपणा ॥ ह्मणोनदेखोनजालादेखणा ॥ ऐसेंह्मणालतरीजाणा ॥ पुनरुक्तजालें ॥२३ बोलिलाअर्थमागुताबोले ॥ तरीबोलाअर्धीचअसेबोलिलें ॥ पुनरुक्तीसआलें ॥ व्यर्थपणयेथें ॥ २४ ॥ प्रथमशब्दासीअन्यथानसे ॥ तरीमागुताबोलतोरितादिसे ॥ ह्मणोनद्रष्टयातैसें ॥ द्र ष्टेपण ॥ २५ ॥ अगाद्रष्टेनद्रष्टृत्वदेखिलें ॥ येथेंदेखिलेपणचिगेलें ॥ द्रष्टेंअसेसंचलें ॥ ठांयींचा ठायीं ॥२६॥ केवळद्रष्टेंजेंदृङ्मात्र ॥ आपणचिआपणयापात्र ॥ तेथेंपरस्परतेचेंचित्र ॥ उठलेंकैसें ॥ २७ ॥ ह्मणोनदृश्यविलासेंसीजाण ॥ देखणेंचिनदेखतेपण ॥ कांजेंनिर्विकारनिर्गुण ॥ विक रेनाकधीं ॥ २८ ॥ ह्मणोनदृश्यभासा ॥ विकरलानाहींसहसा ॥ पुढेंदृष्टांतऐसा ॥ देऊनबोले २९

**दोरासर्पाभासा ॥ साचपणेंदोरुकांजैसा ॥**
**द्रष्टादृश्यातैसा ॥ द्रष्टासाचु ॥ २१८ ॥**

दोरींसर्पाचाआरोप ॥ तऱ्हींदोरुचिआपेंआप ॥ दोरासीअन्यथारूप ॥ जालेंचिनाहीं ॥१६३० अंगेंअंगजोदोरु ॥ तेथेंकैंचासर्पाकारु ॥ अन्यबुद्धिवेव्हारु ॥ सर्पारोपु ॥ ३१ ॥ दोरींदुसरेंनाहीं तेथेंसर्पकैंचाकाई ॥ तेवींद्रष्टयाचाठाई ॥ द्रष्टेंचिअसे ॥ ३२ ॥ द्रष्टृत्वींदुसरेंअसे ॥ तरीअन्यथा दृश्यभासे ॥ ह्मणोनदृश्यनिःशेषनसे ॥ द्रष्टेंचिसाच ॥ ३३ ॥

**दर्पणेंआणीमुखें ॥ मुखदिसेहेंनचुके ॥ परीमुखींमुखसतुकें ॥**
**दर्पणींनाहीं ॥ २१९ ॥ तैसेंद्रष्टादृश्यादोहो ॥ साचकींदेख**
**ताठावो ॥ ह्मणोनदृश्यतेंवावो ॥ देखिलेंजऱ्हीं ॥ २२० ॥**

दर्पणाचेनिमिशें ॥ मुखचिमुखासीदिसे ॥ तऱ्हींदर्पणींमुखनसे ॥ निश्चयेंसी ॥ ३४ ॥ एवं मुखप्रत्ययोप्रत्यईचिअसे ॥ दर्पणवाउगेंचिजैसें ॥ तेवींदृश्याचेनिमिशें ॥ द्रष्टेंचिअसे ॥ ३५ ॥ तऱ्हींदृश्यींद्रष्टेंनाहीं ॥ द्रष्टेंद्रष्टयाच्याचिठायीं ॥ ह्मणोनदृश्यासीदेखतांही ॥ नव्हेदृश्य ॥ ३६ अगादृङ्मात्रद्रष्टेंजेंकांहीं ॥ तेंचिहेंदृश्यप्रवाहीं ॥ आपणासीचआपणपाहीं ॥ भासवितअसे ३७ एवंभास्यआणिभासकता ॥ हेवस्तुमात्रचितत्वता ॥ तरीदृश्यभागपाहातां ॥ सहजचिमृषा ॥ ३८ ॥ द्रष्टाजरीठायेठावो ॥ तरीदृश्यहेंअंगेंचिवावो ॥ उभयतांअभिप्रावो ॥ देखणाएकु॥३९॥ ह्मणोनिकेवळदेखणाठावो ॥ दृश्यत्वेंदेखतांचवावो ॥ येथेंअज्ञानाचाभावो॥ कोठूनअसे॥१६४० पुढेंपूर्वपक्षैकपद ॥ असेतेंविवरूंविशद ॥ अनुभवाचास्वाद ॥ लाधेलजेणें ॥ ४१ ॥

**वावोकीरहोये ॥ तऱ्हींदिसततंवआहे ॥**
**येणेंबोलेंहोये ॥ आथीऐसें ॥ २२१ ॥**

द्रष्टेंअसेएकलें ॥ दृश्यहेंवावजालें ॥ तऱ्हींनसतेंचिदेखिलें ॥ हेंतंवसाच ॥ ४२ ॥ नाहींआणि देखिलें ॥ यासीअज्ञानकारणजालें ॥ याआक्षेपासीकेलें ॥ परिहरणअसे ॥ ४३ ॥

**तरीआनआनातें ॥ देखोनहोयदेखतें ॥ तरीमानूंयेतें ॥ देखिलेंऐसें ॥ २२२ ॥ येथेंदेखोनिकांनदेखोनि ॥ ऐक्यकांनाना होऊनि ॥ परीहायेणेंवांचूनि ॥ देखणेंअसे ॥ २२३ ॥**

द्रष्टेंआनदृश्यआन ॥ ऐसेंजरीघडतसेजाण ॥ तरीसुखेंअज्ञान ॥ कारणहोतें ॥ ४४ ॥ आपुले प्रवाहवशें ॥ मार्गेहीक्रमिलाऐसेंदिसे ॥ उदकदुसरीयेदशे ॥ आलेंचिनाहीं ॥ ४५ ॥ आहोमुळींचेंउदकपण ॥ कायगेलेठायींजालेंआन ॥ किंवामूळआणिअवसान ॥ वाढेपडिलें ॥ ४६ ॥ एवंप्रवाहाच्यापाउलीं ॥ गंगानाहींवोहटली ॥ रेखानसेमोडली ॥ उदकाचीतेथें ॥ ४७ ॥ एक उदकएकावरीआलें ॥ हेंतंवनाहींघडलें ॥ तेवींद्रष्टेननाहींदेखिलें ॥ विपरीतकांहीं ॥ ४८ ॥ अगाहादृश्यविलास ॥ द्रष्टेंचिअसेसावकाश ॥ आतांकोणेंकोणास ॥ देखिलेंकाई ॥ ४९ ॥ आतां देखिलेंजेंजेंकांहीं ॥ तेंद्रष्टेंचिदृश्यासीपाहीं ॥ येथेंकारणतंवनाहीं ॥ दुसरेंआलें ॥ १६५० ॥ श्रुतिः ॥ आत्मैवह्यात्मनोबंधुरात्मैवरिपुरात्मनः ॥ ह्मणोनिजियातियाप्रवाहीं ॥ दुसरेंकारण नाहीं ॥ यालागींजैसेंतैसेंपाहीं ॥ संचलेंब्रह्म ॥ ५१ ॥ अगाहेंजेंभगवद्वचन ॥ तेणेंसाधकास घडेसाधन ॥ आणिसिद्धासीहीखूण ॥ येथेंचिआतुडे ॥५२॥ सिद्धांचेंसमाधान ॥ साधकासउपदेशुजाण ॥ ऐसीकांहींखूण ॥ एकिचअसे ॥ ५३ ॥ ह्मणोनसाध्यसाधनप्रवाहीं ॥ सिद्धवस्तूसीअन्यथानाहीं ॥ एवंसंधीवीणपाहीं ॥ विलासेवस्तु ॥ ५४ ॥ आतांएकिअनेकिपाहीं ॥ एकपणाहानीनाहीं ॥ ह्मणोनिजियेतियेसोई ॥ आपणयादेखे ॥ ५५ ॥ येथेंदृश्यआणिदेखतें ॥ वस्तु इतुकियानाहींपुरतें ॥ ह्मणोनदेखतदेखतदृश्यातें ॥ गिळोनिअसे ॥ ५६ ॥ अगाहेंजेंदृश्यदिसे ॥ तेंगिळूनिचदावितसे ॥ ह्मणोनिचपालटनसे ॥ वस्तूसीकांहीं ॥ ५७ ॥ अगाहाजोदृश्यप्रभव ॥ हाद्रष्टृत्वाआंतीलहावभाव ॥ येणेंद्रष्टृत्वाचीसिव ॥ देखिलीचनाहीं ॥ ५८ ॥ अगाअळंकारासी कांहीं ॥ सुवर्णाबाहेरजाणेंनाहीं ॥ मांसुवर्णासीकाई ॥ निहाळीजेतेणें ॥ ५९ ॥ ह्मणोनवस्तूच्याठाई ॥ परस्परतासंभवलीनाहीं ॥ नावेकदिसेजेंकांहीं ॥ तेंत्यासीचतेंकीं ॥ १६६० ॥ ह्मणोनआपणाआपणदेखे ॥ याचेंचिनांवनदेखे ॥ किंवानदेखेतऱ्हींअसकें ॥ देखतेपणचि ॥ ६१ ॥ अहोदेखणेमात्रजेंकांहीं ॥ तेंदेखावयापुरतेंनाहीं ॥ आतांनदेखवेंतरीकाई ॥ आंधळेंअसे ॥ ६२ ॥ आतांऐसाठाईंजाण ॥ एकानेकअवघेंशून्य ॥ याअर्थासीनचुकोन ॥ विलासलेंहीदिसे ॥ ६३ ॥ अथवाआपणअनेकहोयिजे ॥ तरीचअनेकतासाजे ॥ ह्मणोनअनेकभावेंदुजें ॥ आलेंचिनाहीं ॥६४॥ आणिऐक्यभावेंतरीएकुचि ॥ ह्मणोनएकानेकहाचि ॥ येथेंद्रष्टृत्वानव्हेचि ॥ सर्वथालोपु ॥ ६५ ॥ ह्मणोनदेखणेंनदेखणें ॥ मिळोनएकलेंदेखणें ॥ आणिएकत्वेंनानापणें ॥ आपणचिअसे ॥ ६६ ॥ पुढेंयाचेंचिविशेषण ॥ करावयाचेमिशजाण ॥ उभविलेंअसेआन ॥ मुळींचेंपद ॥ ६७ ॥

**आरिशानेंहोकांदाविलें ॥ तऱ्हींमुखचिमुखेंदेखिलें ॥ तोनदवीतऱ्हींसंचलें ॥ मुखींचिमुख ॥ २२४ ॥ तैसेंदावितेंनाहीं ॥**

**तरीहाचियथाचाठाईं ॥ नादाविलातऱ्हींही ॥ हाचियया ॥ २२५ ॥**

मुखासीदावीदर्पण ॥ तऱ्हींमुखचिमुखासीकारण ॥ तेंअसेदर्पणेंवीण ॥ आपलाठाईं ॥ ६८ ॥ अहोदर्पणचिजरीनाहीं ॥ तरीमुखचिनसेलकाई ॥ एवंआरिसाचपाहीं ॥ अप्रयोजक ॥ ६९ ॥ तेवींदेखणेंदेखतेंठाईं ॥ तेंआणीककोठेंचिनाहीं ॥ ह्मणोनआपलाचिपाहीं ॥ देखणाआपु ॥ १६७० ॥ अहोदृश्यसंबंधनाहीं ॥ तऱ्हींदेखणाहाचिपाहीं ॥ आणिदृश्यहीदेखिलेंकाहीं ॥ हाचिद्रष्टा ॥ ७१ ॥ ह्मणोनकारणांतरेंवीण ॥ देखेआपणयाआपण ॥ अज्ञानशब्देंचिजडजाण ॥ तेंकारणकेवीं ॥ ७२ ॥

**जागृतीदाविला ॥ कांनिदाहारविला ॥**
**परीजैसाएकला ॥ पुरूषपुरुषीं ॥ २२६ ॥**

पुरुषाचेंसाचपण ॥ निद्राआणिजागेंहोणें ॥ तोदुसरेंनिकारणें ॥ देखिलानाहीं ॥ ७३ ॥ निदे निवांतजाला ॥ तऱ्हींपुरुषअसेसंचला ॥ आतांजागाजालियाआला ॥ नवाकाई ॥ ७४ ॥ तेवींदे खावयानदेखावया ॥ कारणहाचिकींगाययया ॥ देखिलेनवायां ॥ गेलानाहीं ॥ ७५ ॥

**कांरायातेंतूंरावो ॥ ऐसादाविजेप्रत्ययो ॥ तऱ्हींठायेठावो ॥ राजाचिअसे ॥ २२७ ॥ नातरीरायपणेंराया ॥ नाणिजेकीं प्रत्यया ॥ तऱ्हींकांहींउणेंतया ॥ माजींअसे ॥ २२८ ॥ तैसें दावितांनदावितां ॥ हाययापरौता ॥ चढेनातुटेआयिता ॥ असतचिअसे ॥ २२९ ॥**

जऱ्हींअसतांहीनेणेंकोण ॥ तऱ्हींनतुटेचिराजेपण ॥ किंवाराजेपणस्फुरतांहीजाण ॥ राजा चिकींतो ॥ ७६ ॥ तेवींआपुलेनिचप्रत्ययें ॥ आपणादेखावयाचीसोये ॥ नलगेचितरीकाये ॥ द्रष्टेनव्हेतें ॥ ७७ ॥ किंवाद्रष्टेपणजेंआपुलें ॥ द्रष्टेनआपणादाविलें ॥ तरीकायउणेंजालें ॥ द्रष्टृत्व तेथिचें ॥ ७८ ॥ ह्मणोनआवलोकेंवीण ॥ द्रष्टाचिअसेआपण ॥ किंवाआपलेंद्रष्टेपण ॥ आपणचि देखे ॥ ७९ ॥ आपलेनिद्रष्टेपणें ॥ द्रष्टृत्वदुणावोंनेणें ॥ नानदेखतांउणें ॥ पडणेंनाहीं ॥ १६८० ॥ आपलाअसतांआपण ॥ निमित्तांतरअघटमान ॥ ऐसेंचिपुढेंजाण ॥ बोलतअसे ॥ ८१ ॥

**तरीकांनिमित्यपिसे ॥ हाययादाऊंबैसे ॥**
**देखतेंनाहींतैंआरिसे ॥ देखावेकोणें ॥ २३० ॥**

यालागींद्रष्टयाचेंद्रष्टेपण ॥ द्रष्टयासीचअसेजाण ॥ तरीनिमित्यांतरअज्ञान ॥ कासयायेथें ॥ ८२ ॥ अहोआपणचिद्रष्टेंअसे ॥ तरीकासयानिमित्यपिसें ॥ तेंनिमित्यैंवीणसरिसें ॥ ठायींच असे ॥ ८३ ॥ अगाद्रष्टेंभंगोनदृश्यहोतें ॥ तरीदेखावेंयादृश्यातें ॥ निमित्यमानूयेतें ॥ आणीक यासी ॥ ८४ ॥ द्रष्टेंजरीआच्छादतें ॥ तरीदृश्यचिकेवींअसतें ॥ मुखनसतांप्रतिमुखातें ॥ देखतें कवण ॥ ८५ ॥ प्रतिमुखेंसीदर्पण ॥ देखतेंनिचप्रकाशिलाजाण ॥ ह्मणोनदेखतांचिकारण ॥ देखावयाहोये ॥ ८६ ॥ आणीकहीदृष्टांत ॥ देऊनिहेंचिबोलत ॥ जेंनिमित्यांतरयेथें ॥ सर्वथा नघडे ॥ ८७ ॥

**दीपुदावितयातेंरची ॥ कींतेणेंचिसिद्धिदीपाची ॥**
**तैसीसत्तानिमित्ताची ॥ येणेंसाच ॥ २३१ ॥**

अगादीपजेणेंलाविला ॥ तोकायदीपेंप्रकटकेला ॥ ऐसेंनव्हेतोदाविला ॥ दीपचितेणें ॥ ८८॥ तेवींवस्तूच्याठायीं ॥ निमित्यमानावेंजेंकांहीं ॥ तेंवस्तुचिनसतांपाहीं ॥ रूपासीचनयेतें ॥८९॥ कींद्रष्ट्याचेविलासें ॥ द्रष्टेंचिद्रष्ट्यादिसे ॥ तेणेंदृश्येंकैसें ॥ देखणेंद्रष्टें ॥ १६९० ॥ एवंदृश्याचे निसंबंधें ॥ वस्तुत्वींदेखणेंनांदे ॥ इयेबोलणींअबद्धें ॥ अवघींयेथें ॥ ९१ ॥

**वन्हितेवन्हिसिखा ॥ प्रकाशीकीरदेखा ॥**
**परीवन्हिनहोऊनिलेखा ॥ येईलकाई ॥ २३२ ॥**

अहोनावेकभावावेंऐसें ॥ जेवन्हिशिखेचेमिषें ॥ प्रकटझालादिसे ॥ परीअघटमान ॥ ९२ ॥ कांजेंअग्निचजरीनाहीं ॥ तरीज्वालाकवणियेठायीं ॥ ह्मणोनज्वाळेसहितपाहीं ॥ संचलाअग्नि ॥ ९३ ॥ आतांज्वाळेचेनिमिशें ॥ अग्नीचकारणअग्नीसअसे ॥ येथेंकारणांतराचेंपिसें ॥ व्यर्थचि कींगा ॥ ९४ ॥ तेवींद्रष्टृत्वेंवीणपाहीं ॥ दृश्यहेंरचलेंनाहीं ॥ येथेंनिमित्यांतरकांहीं ॥ कासया आलें ॥ ९५ ॥

**आणिनिमित्यजेंबोलावें ॥ तेंयेणेंदिसोनिदावावें ॥**
**देखिलेंतरीस्वभावें ॥ दृश्यहीहा ॥ २३३ ॥**

अगावस्तुदेखणीअसे ॥ ह्मणोनिनिमित्याचातर्कुदिसे ॥ तरीदेखणीवस्तुदेखतसे ॥ आपणया सीचि ॥ ९६ ॥ आपणादेखेआपण ॥ तेंचिहेंदृश्यभान ॥ ह्मणोनदृश्यहीजाण ॥ वस्तुचिअसे ॥ ९७ ॥ अगावस्तूसीवस्तूचेंदेखणें ॥ तेंयेथेंमानावेंदुजेंकारण ॥ तरीवस्तुकायआन ॥ देखणया हूनि ॥ ९८ ॥ किंबहुनानिमित्याचेंअनुमान ॥ तेंअनुमानचिनाहींवस्तुवीण ॥ तरीनिमित्यांतर वलगण ॥ सहजचिमृषा ॥ ९९ ॥ एवंवस्तूसीलोपनाहीं ॥ तरीनिमित्ययेथेंकाई ॥ आपणाआ पलेठाईं ॥ आपलेंनिमित्यें ॥ १७०० ॥

**ह्मणोनस्वयंप्रकाशायया ॥ आपणापेदेखावया ॥**
**निमित्तहावांचूनिया ॥ नाहींचिमा ॥ २३४ ॥**

स्वप्रकाशआत्मापूर्ण ॥ प्रकाश्यप्रकाशकआपण ॥ ह्मणोननिमित्यनाहींआन ॥ यावांचूनि॥१॥ अगादेखणेंमात्रजेंकांहीं ॥ आत्माऐसेंतेंचिपाहीं ॥ तरीतेंआपणाकाई ॥ नदेखतेंहोय ॥ २ ॥ अहो हेंजेंदेखणेंकांहीं ॥ जाणावेंदेखतचिनाहीं ॥ आतांदेखिलेंऐसेंपाहीं ॥ भाविजेजरी ॥ ३ ॥ तरी देखितेंनिविलासें ॥ दृश्यहीहाचिअसे ॥ येथेंभावनाहीनसे ॥ दुजीआली ॥ ४ ॥ ह्मणोनआपआ पणादिसावया ॥ कारणनसेवांचूनिया ॥ भासवीदशाभलतिया ॥ आपआपणा ॥५॥ जियाति याप्रवाहीं ॥ वस्तुवीणदुजेंनाहीं ॥ तेथेंनिमित्यांतरकाई ॥ बोलणेंघडे ॥ ६ ॥ स्मृतिः ॥ अतःका रणविज्ञानात्सर्वेविज्ञानमास्तिकाः ॥ सुतरामुपपन्नंहिनसंदेहोस्तिकश्चन ॥ इतिब्रह्मगीतायां ॥ एवंवस्तूसीकांकारणवस्तु ॥ येथेंनाहींदुजाहेतु ॥ बहुहोऊनिअसतु ॥ किंवाकांहींचनसो ॥ ७॥ ह्मणोनपुढेंनिरोपण ॥ ऐसेंचिकीजेतसेजाण ॥ संतवृंदांचेंअवधान ॥ अपेक्षितअसे ॥ ८ ॥

**भलतेनविन्यासें ॥ दिसततेणेंचिदिसें ॥**
**हावांचूननसे ॥ येथेंकांहीं ॥ २३५ ॥**

अगादेखणेंचिवस्तुअसे ॥ त्याचिदेखणीयाचेनिमिशें ॥ भलतेंहीदिसे ॥ तेणेंचिदेखें ॥ ९ ॥ तेणेंचिदेखतेपणें ॥ दृश्यत्वतेणेंचिअसणें ॥ किंवादृश्यावीणदेखणें ॥ तेंचिनचुके ॥ १७१० ॥ ह्मणोनदृश्यत्वेंफांको ॥ किंवाआपणपेंचिदेखो ॥ परीहावांचूनिविखो ॥ यासीनाहीं ॥ ११ ॥ अगा उपाधिकांहींनसोन ॥ वस्तुस्वसंवेद्यसर्वदांजाण ॥ येथेंदुजेंकारण ॥ कासयालागे ॥ १२ ॥

**लेणेंआणिभांगारें ॥ भांगारचिएकस्फुरे ॥ कांजेंयेथदुसरें ॥ नाहींचिह्मणोनि ॥ २३६ ॥ जळतरंगींदोन्हीं ॥ जळावांचूनि नाहीं ॥ ह्मणोनआनकांहीं ॥ नाहींनानोहे ॥ २३७ ॥**

अगासुवर्णाचेंप्रकाशक ॥ सुवर्णचिकींआयिक ॥ किंवाकटककुंडलादिक ॥ तेणेंचिहोती॥१३॥ एवंसुवर्णमात्रजेंकांहीं ॥ आपलेंचिभासकपाहीं ॥ तेंकटककुंडलादिप्रवाहीं ॥ विभागींनपडे १४ किंवाउदकाच्याठायीं ॥ तरंगाचीमातनाहीं ॥ आणितरंगदेखिलयाहीं ॥ उदकनचुके ॥ १५ ॥ ह्मणोनभलतेनप्रकारें ॥ वस्तुचिअसेस्वाकारें ॥ आतांयेथेंनिमित्यांतरें ॥ काजकाई ॥ १६ ॥ कां जेंभलतेंहीप्रवाहीं ॥ वस्तूसीपालटनाहीं ॥ दृष्टांतऐसाचिकांहीं ॥ देऊनिसांगे ॥ १७ ॥

**होकांघ्राणानुमेयो ॥ येवोकांहातींघेवो ॥ लाभोकांदिठीपा हो ॥ भलतैसा ॥ २३८ ॥ परीकापुराच्याठाईं ॥ कापुरावां चूनिदुजेंनाहीं ॥ तैसारीतिभलतयाही ॥ हाचियया ॥ २३९ ॥**

अगापरिमळाचासुरवाड ॥ पुरवीघ्राणाचेंकोड ॥ उजाळपणेंगोड ॥ नेत्रासीलागे ॥ १८ ॥ आणिमार्दवाचागुण ॥ हस्तेंद्रियेंनिववीजाण ॥ परीइतुकाठाईंनहोन ॥ कापूरएकु ॥ १९ ॥ ज न्हींतोषलींइंद्रियेंअशेखें ॥ तरीकापूरमात्रनचुके ॥ तेवींनानादिठीएकें ॥ देखणेंनिपूर्ण ॥१७२०॥ स्मृतिः ॥ वेदैश्चसर्वैरहमेववेद्योवेदांतकृद्वेदविदेवचाहं ॥ इतिभगवद्वचनं ॥ अगासकळांहीजाण नयांचीधांव ॥ पाविजेएकुचिगांव ॥ असोत्यागांवाचेंचिनांव ॥ जाणतीसकळें ॥ २१ ॥ असो सकळींनाहींसकळपण ॥ जाणणेंमात्रचिएकजाण ॥ असोत्यासजाणावयाआन ॥ त्याहूनकैंचें ॥ २२ ॥ यालागींजयातयापरी ॥ ययासच्चिदानंदसागरीं ॥ दुसरेंअणुहीभरी ॥ सांठवेनाकीं॥२३

**आतांदृश्यपणेंदिसो ॥ कींद्रष्टाहोऊनिअसो ॥ परीहावांचू निअतीसो ॥ नाहींयेथें ॥ २४० ॥ गंगागंगापणेंवाहो ॥ कीं सिंधुहोऊनिराहो ॥ परीपाणीपणानवलावो ॥ हेंनदेखोंकीं ॥२४१॥ थिजावेंकींविघरावें ॥ हेंअप्रयोजकअघवें ॥ घृतपणन व्हे ॥ अनारिसें ॥ २४२ ॥ ज्वाळाआणिवन्हि ॥ नलेखिजती दोन्हीं ॥ वन्हिमात्रह्मणोनि ॥ आननव्हेचिकीं ॥ २४३ ॥ तै सेंदृश्यकांद्रष्टा ॥ यादोन्हींदशावांझटा ॥ पाहतांएकिकाष्टा ॥ स्फूर्तिमात्रतो ॥ २४४ ॥**

अहोद्रष्टेंजेंदृङ्मात्रअसे ॥ तेंचिकींतयासीदिसे ॥ दृश्यद्रष्टाऐसें ॥ इतुकाचिभागु ॥२४॥ ह्मणो नययावांचूनिकांहीं ॥ दृश्यद्रष्टृत्वाठावनाहीं ॥ किंबहुनायेथेंपाहीं ॥ उभयताचिनाहीं ॥ २५ ॥

थाहेतूचेंमूळ ॥ विचारितांतोहेतुचिटवाळ ॥ यालागींसंचलेंसरळ ॥ आत्मस्वरूप ॥ ५ ॥ ह्मणो नगुरुराजेंठेविलेंठाईं ॥ असणयांचाअतिसोनाहीं ॥ कांजेपदार्थुचिकांहीं ॥ नहोआह्मी ॥ ६ ॥ यालागींतियेठाईं ॥ आपेआपसंबंधनाहीं ॥ आतांज्ञानेंज्ञानपाहीं ॥ कायकाज ॥ ७ ॥ अगामुळीं अज्ञानचिनाहीं ॥ तरींज्ञानाचापाडकाई ॥ ह्मणोनपदद्वयेंपाहीं ॥ बोलतुपुढां ॥ ८ ॥

**तेथसमोरहोआवया ॥ अज्ञानाचापाडुकासया ॥**
**केउतेंमेलीयामाया ॥ होऊंपाहिजे ॥ ९ ॥**

तेंआपआपणासन्मुख ॥ केलियावीणआहेदेख ॥ तेथेंअज्ञानाचातर्क ॥ कासयाकीजो ॥ ९ ॥ अगास्वरूपाससन्मुख ॥ अज्ञानकरूनदेख ॥ तेथूनहेंजगसकळिक ॥ रूपासीआलें ॥ ११० ॥ तरीमुळींजेंअज्ञान ॥ तेंस्वरूपासीदेऊनिज्ञान ॥ स्वरूपपाहेआपण ॥ आपणयासी ॥११॥ मगपाहतांआपणयाआपण ॥ विस्तारलेंहेंजगभान ॥ एवंअवघयासीकारण ॥ अज्ञानजालें ॥ १२ ॥ तरी अंगेंअज्ञान ॥ तेंजरीएसेंजाण ॥ तरीमृतमातेसंतान ॥ जाहालेंपाहा ॥ १३ ॥ मायमेलीमगलेंकु ॥ तरीअज्ञानाचाहाअवलोकु ॥ एवंअज्ञानाचातर्कु ॥ अबद्धअघवा ॥ १४ ॥ आतांअज्ञानजरीनाहीं ॥ तरीज्ञानतेंआतांकाई ॥ ओवीद्वयेविषई ॥ मुळींचीपेका ॥ १५ ॥

**अज्ञानाचाप्रवर्तु ॥ नाहींजयागांवांआंतु ॥**
**तेथेंज्ञानाचीतऱ्हींमातु ॥ कोणजाणे ॥ १० ॥**

अगाहेंचिन्मयानंदनगर ॥ येथेंअज्ञानासीथार ॥ तरीतृणेंघेतलेंबिढार ॥ चंडाग्निमाजीं ॥१६॥ ह्मणोनइयागांवींपाहीं ॥ अज्ञानाचीवार्ताचिनाहीं ॥ परीज्ञानासीहीकांहीं ॥ नपुसेकोण्ही ॥ १७ ॥ अगापाणियासीकांहीं ॥ पाणियाचीचाडनाहीं ॥ तेवींइयेनुसुधेचिन्मयडोहीं ॥ ज्ञान कासया ॥ १८ ॥

**रात्रिह्मणोनिदिवे ॥ पडतीकींलावावे ॥**
**वांचोनिसूर्यासवें ॥ सिणणेंहोये ॥ ११ ॥**

रात्रिचिजरीनाहीं ॥ तरीदीपेंकाजकाई ॥ लाविजेसूर्योदई ॥ तरीश्रमुचिवाढे ॥ १९ ॥ तेवीं इयेस्वरूपींजाण ॥ उगउचिनेघेअज्ञान ॥ तरीअज्ञानेंवीण ॥ ज्ञानतेंकाई ॥ १२० ॥ यालागींआपणयाआपण ॥ जाणावेंनलगेजाण ॥ तेथेंजेंजाणतेंपण ॥ तेंश्रमुचिवाढे ॥ २१ ॥ अगाआपणजरीनेणतअसतें ॥ तरीजाणावेंहेंकांस्फुरतें ॥ ह्मणोनिजाणोनिजाणतें ॥ जालेंनाहीं ॥ २२ ॥ आतांपेसियेठाईं ॥ नेणीवकधींचिनाहीं ॥ तरीजाणिजेजेंकांहीं ॥ तेंव्यर्थनव्हेकां ॥ २३ ॥ जेवींगूळगुळाचाखोंपाहे ॥ तरीअर्धींकायतोविषआहे ॥ तेवींजाणीवेजाणोंजाये ॥ तोकायनेणुअसेगा २४ ह्मणोनिशुद्धस्वरूपींजाण ॥ ज्ञाननाहींनाअज्ञान ॥ पुढेंहीहेंचिखूण ॥ बोलतुअसे ॥ २५ ॥

**ह्मणोनअज्ञाननाहीं ॥ तेथेंचिगेलेंज्ञानही ॥**
**आतांनिमिषोन्मिषादोहीं ॥ ठेलीवाट ॥ १२ ॥**

अहोइयेआत्मत्वींकांहीं ॥ अज्ञानासीवाढीनाहीं ॥ इतुकेंचिजाणतांपाहीं ॥ जाणीवनुरे ॥२६॥ वांचूनअज्ञानकाढूनटाकिलें ॥ ज्ञानउपसोनिसांडिलें ॥ ऐसेंकरणिचेंकेलें ॥ आत्मत्वकाई ॥२७॥ अगाआत्माजोह्मणिजेकांहीं ॥ ज्ञप्तिमात्रचिपाहीं ॥ तयासीज्ञानाचेंकाई ॥ काजअसेपां ॥ २८ ॥

याज्ञप्तिमात्राच्याठाईं ॥ धर्मुधर्मित्वनाहीं ॥ ह्मणोनतेथैंकाजकाई ॥ ज्ञातेपणाचें ॥ २९ ॥ परीज्ञ भावनाहींआला ॥ निखळज्ञप्त्यंशुअसेसंचला ॥ असणयानसणयाचाराहिला ॥ अतिसोआतां ॥ १३० ॥ त्याज्ञप्तीसीनाहींज्ञानता ॥ किंवाउगेपणाचीकथा ॥ निमिषोन्मिषतेंआतां ॥ ठेलेंपैसें ॥ ३१ ॥ शुद्धशबळभाग ॥ किंवाप्राप्ताप्राप्तिचेलाग ॥ नसोनिएकलैंअभंग ॥ वस्तुमात्र ॥ ३२ ॥ असोउघडीज्ञापीनसेंकांहीं ॥ वस्तुसर्वदाऐसीचिपाहीं ॥ होणेंजाणेंनाहीं ॥ चिन्मात्रींद्दये ॥ ३३ ॥ येथैंकैंचेंअज्ञान ॥ निखळदृङ्मात्रद्रष्टेंजाण ॥ अज्ञानसंबंधेंवीण ॥ ज्ञानत्वानये ॥ ३४ ॥ आतांनाथिलाअज्ञानवाद ॥ करीज्ञानासीहीअबद्ध ॥ इयेविषयींप्रबंध ॥ पुढाराअसे ॥ ३५ ॥

**येऱ्हवींतऱ्हींज्ञानअज्ञानें ॥ दोहींचिअभिधानें ॥**
**अर्थाचेनिअनानें ॥ विह्रावलीं ॥ १३ ॥**

काळत्रयींअविच्छिन्न ॥ एकलेंअसेचिदुघन ॥ आतांअज्ञानासीजाण ॥ अर्थचनाहीं ॥ ३६ ॥ आतांअज्ञानशब्दजोकांहीं ॥ तेथेंज्ञानचिविलासलेंपाहीं ॥ तरीज्ञानशब्दासीकाई ॥ अर्थताउरले ॥३७॥ ज्ञानअज्ञानींवर्तलें ॥ आतांज्ञानशब्दाकायउरलें ॥ ज्ञानयेणेंबोलें ॥ वृथाचिवादु ॥३८॥ अज्ञानाचीचुकोनखूण ॥ जालेंअज्ञानअभिधान ॥ यावरीशब्देंबोलिजेज्ञान ॥ तेंकांज्ञानहोये ३९ अज्ञानाह्लनिआणीक ॥ ज्ञानआहेएक ॥ ऐसेंहोतांनिरर्थक ॥ दोन्हींहीजालीं ॥ १४० ॥ एवंनसतें भावितांअज्ञान ॥ तेंज्ञाननव्हेनाअज्ञान ॥ इयेविषयींजाण ॥ पुढेंहीबोले ॥ ४१ ॥

**जैसींदंपत्येंपरस्परें ॥ तोडूनिपालटिलींसिरें ॥**
**पालटुनाहींतेथेंसरे ॥ दोहींचेंजिणें ॥ १४ ॥**

पुरुषाचेंसिरच्छेदिलें ॥ तेंस्त्रीदेहासीलाविलें ॥ स्त्रियेचेंसिरजोडिलें ॥ पुरुषदेहासी ॥ ४२ ॥ तेंस्त्रीनापुरुषजाली ॥ परीदोन्हींजीवेंगेलीं ॥ तैसीदशाआली ॥ ज्ञानअज्ञाना ॥ ४३ ॥ नसतेंअज्ञाननाशितां ॥ ज्ञानासीआलीज्ञानता ॥ तरीहेकायनव्हेपैंआतां ॥ ज्ञानाचीचुकी ॥ ४४ ॥ अज्ञानतों पहिलेंचिनाहीं ॥ परीज्ञानहीभांबावलेंपाहीं ॥ ह्मणोनहेतुसधेवादचिकांहीं ॥ परीनिकेनव्हती ॥ ४५ ॥ ह्मणोनअनुभवेवीण ॥ सिद्धचिपरीव्यर्थजाण ॥ इयेविषयींनिरूपण ॥ दृष्टांतेंसी ॥४६॥

**कांपाठीलाविलाहोये ॥ तोदीपुचिवायांजाये ॥**
**दिठीअंधारेंपाहे ॥ तैंतेचिवृथा ॥ १५ ॥**

दीपजऱ्हींप्रकाशकर ॥ परीदृष्टीनकीजेसमोर ॥ तैंप्रकाशुचिअंधार ॥ भोगिजेपुरुषें ॥ ४७ ॥ पाठीकडेपाजळिला ॥ तोप्रकाशुचिवायांगेला ॥ तेवींआत्माअसेसंचला ॥ परीहातवटीहोआवीलागे ॥ ४८ ॥ किंवादिठीदिठीपणानचुके ॥ तऱ्हींअंधारेंकरीनतोखे ॥ देखतचिठाके ॥ अदेखणेंपैं ॥४९॥ तेवींआत्मत्वजऱ्हींनभंगे ॥ तऱ्हींअनुभवहोआवालागे ॥ येऱ्हवींअसतचिवाउगें ॥ अनुभवेंवीण ॥१५०॥ अगाअनुभवेंवीणकांहीं ॥ आत्माअन्यथानाहीं ॥ तरीसुखाचीचिपाहीं ॥ सिराणीजाली ॥ ५१ ॥ ह्मणोनआत्मत्वेंचीकरून ॥ आत्माअनुभवींजेंपूर्ण ॥ ऐसेंनव्हतांजाण ॥ सुखचिअसुख ॥ ५२ ॥ आतांआत्मत्वींदेखिजेअज्ञान ॥ हेचिचुकीचीखूण ॥ असोचुकतांहीन चुकेजाण ॥ परीअनुभवनव्हे ॥ ५३ ॥ ह्मणोनअज्ञानचिनघडे ॥ ऐसेंबोलतोपुढें ॥ अवधानाचे निनिवाडें ॥ अवधारावें ॥ ५४ ॥

**तैसेंनिपटूनजेंनेणिजे ॥ तेंअज्ञानशब्दें बोलिजे ॥**
**आतांसर्वहीजेणेंसुजे ॥ तेंअज्ञानकैसें ॥ १६ ॥**

अहोहेंजेंजगदेकज्ञान ॥ यासह्मणतसाअज्ञान ॥ तरीअज्ञानाचेंचिन्ह ॥ असेंनव्हेकीं ॥ ५५ ॥ निपटूनजेंनेण ॥ तयाह्मणाअज्ञान ॥ तरीअवघेंजगभरून ॥ ज्ञानमात्र ॥ ५६ ॥ अहोज्ञानकळेरहित ॥ प्रपंचअथवापरमार्थ ॥ पाहतांदुजाअर्थ ॥ असेनाकीं ॥ ५७ ॥ असोयाज्ञानाच्याठाईं ॥ पदार्थासीचिवाडीनाहीं ॥ अंतर्बाहीजेंकांहीं ॥ दुसरेंचिनसे ॥ ५८ ॥ अगाअज्ञाननाथिलेंमानिलें ॥ हेंहीजेणेंप्रकाशलें ॥ तेंअज्ञानयेणेंबोलें ॥ बोलुचिविटंबे ॥ ५९ ॥

**ऐसेंज्ञानअज्ञानाआलें ॥ अज्ञानज्ञानेंगेलें ॥ येदोन्हीहीवांझौलें ॥**
**दोन्हीजालीं ॥ १७ ॥ आणिजाणेंतोचिनेणें ॥ नेणेंतोचिजाणें ॥**
**आतांकेंअसणेंजिणें ॥ ज्ञानाज्ञाना ॥ १८ ॥**

ऐसेंजेंकांज्ञान ॥ तयाह्मणिजेअज्ञान ॥ तरीदोहींसीहीजाण ॥ व्यर्थताआली ॥ १६० ॥ ज्ञानीं अज्ञानवादु ॥ तोवादकरीज्ञानाचाबाधु ॥ यालागींअज्ञानासीसत्यवादु ॥ तोहीनयेकीं ॥ ६१ ॥ अहोज्ञानअसेसंचलें ॥ परीअज्ञानशब्दींगिवसलें ॥ ह्मणोनिनावेंकझकवलें ॥ युक्तिचेडोळे ॥ ६२ ॥ शेवटअज्ञानहीतेंनोहे ॥ आणिज्ञानाचीहीचुकेसोये ॥ आतांदोन्हींशब्दपाहे ॥ अर्थहीन ॥ ६३ ॥ जेवींचित्रींचेंगंगाजळ ॥ किंवाहुताशनाचीज्वाळ ॥ दिसतचिपोकळ ॥ अर्थहीन ॥ ६४ ॥ तेवीं अज्ञानभाविलें ॥ तरीज्ञानासीकायउरलें ॥ ह्मणोनिज्ञानशब्दासीआलें ॥ व्यर्थत्वथितें ॥ ६५ ॥ किंवाअर्थतानाहींअज्ञान ॥ त्यासीशब्दआणीलसाचपण ॥ हेंहीनघडेजाण ॥ ह्मणोनदोन्हींटवाळ ॥ ६६ ॥ अज्ञानाचेंदुसरें ॥ तेंज्ञानहीनव्हेसाचोत्कारें ॥ आणिअज्ञानतरीखरें ॥ पहिलेंचिनाहीं ॥ ६७ ॥ एवंअज्ञानआणिज्ञान ॥ हेंशब्दअनुभवहीन ॥ ज्ञानाज्ञानविहीन ॥ तेथेंहेंकैंचि ॥६८॥ तयादृढ्मात्रासीहानीनाहीं ॥ तऱ्हींप्रत्ययाआणिजेपाहीं ॥ जऱ्हींअप्रत्ययोकधींही ॥ देखिलानाहीं ॥ ६९ ॥ तेथेंअप्रत्ययोनाहीं ॥ हेंतंवपाडावेंठाईं ॥ एवंप्रत्ययासीचकांहीं ॥ प्रत्ययोघडतो ॥ १७० ॥ ह्मणोनिऐसाप्रत्ययोपाहीं ॥ प्रत्ययासींचपडेठायीं ॥ तरीज्ञानाज्ञानादोहीं ॥ ठावोचिमोडे ॥ ७१ ॥ जेवींकंठींचामणी ॥ असोनिचिपडेचिंतवणी ॥ सेवटआपणचिआपणाआणी ॥ प्रत्ययांसी ॥ ७२ ॥ तरीतोकायनवाआला ॥ परीसुखासीठावोझाला ॥ मागुताउतरोनिगेला ॥ सुखाचाफुंजु ॥ ७३ ॥ मगआतांआणिपहिलें ॥ समानचिहोऊनठेलें ॥ तेवींप्रत्ययरूपचिआलें ॥ प्रत्ययासी ॥ ७४ ॥ तैंप्रत्ययासीआलें ॥ हेंहीसरोनिगेलें ॥ ज्ञानाज्ञानावीणसंचलें ॥ स्वरूपमात्र ॥ ७५ ॥ आतांज्ञानाज्ञानेंवीण ॥ स्वरूपमात्रचिजेंजाण ॥ याप्रकरणाचेंउपसंहरण ॥ करिजेत आहे ॥ ७६ ॥

**एवंज्ञानाज्ञानेंदोन्हीं ॥ पोटींसूनींअहनि ॥**
**उदैलाचिद्गगनीं ॥ चिदादित्युहा ॥ १९ ॥**

एवंरजनीआणिदिवसु ॥ जोकींज्ञानाज्ञानभासु ॥ चिद्गगनींग्रासु ॥ चित्सूर्येंकेला ॥ ७७ ॥ चिदंबरींनिर्मळा ॥ चित्सूर्येंउदोकेला ॥ जेवींआरिसेनवीणजाला ॥ मुखप्रत्ययोमुखा ॥ ७८ ॥ मुखप्रत्ययोस्वतःसिद्ध ॥ जेणेंकेलादर्पणसंबंध ॥ तेणेंचिदेखिलाबोध ॥ दर्पणाचा ॥ ७९ ॥ त्याबोधासीहानीनाहीं ॥ तेणेंमुखबोधठेविलाठायीं ॥ एवंमुखबोधेंचिपाहीं ॥ मुखबोधजाला ॥ १८० ॥

तेवींचिन्मात्रेंचिद्गगनीं ॥ उदेलाचिन्मात्रतरणी ॥ ह्मणिजेप्रत्ययानसोनहानी ॥ प्रत्ययोआला ८१ नमोड्डनिनित्यानंद ॥ सुखेंचिसुखाचास्वाद ॥ चाखेपरीद्वंद्व ॥ उपजेनाकीं ॥ ८२ ॥ वस्तुएकि परिपूर्ण ॥ काळत्रयींअविच्छिन्न ॥ आदिआणिअवसान ॥ दोन्हींहीनसती ॥८३॥ परीसद्गुरुपा दस्मरण ॥ हेंनिरावसानींअवसान ॥ करूनिपावलोंजाण ॥ प्रकर्णांतयेथें ॥ ८४ ॥ दृश्यसंबंधें वीण ॥ दृङ्मात्रजेंद्रष्टेंपूर्ण ॥ अज्ञानेंसीज्ञान ॥ हरपलेंयेथें ॥ ८५ ॥ येथेंपूर्वापरतानाहीं ॥ प्रत्ययोचअसेठायीं ॥ तेणेंप्रत्ययेंपाहीं ॥ प्रत्ययोहोये ॥ ८६ ॥ हेंचिकरूनिअवसान ॥ संप विलेंयेथेंप्रकर्ण ॥ ज्ञानाज्ञानाचाजाण ॥ फिटलापांगु ॥ ८७ ॥ आतांचिन्मात्रींनित्यबुद्ध ॥ तेंस्वतासीअसेंसिद्ध ॥ साधनाचासंबंध ॥ नधरूनिअसे ॥ ८८ ॥ इयासोलिंवसुखाचीचि खाणी ॥ श्रीसद्गुरूच्याचरणीं ॥ ह्मणोनतेथेंशरणरिघोनि ॥ स्वीकारावें ॥ ८९ ॥ त्याशरण रिघणियाआड ॥ असेलजेंदुवाड ॥ तेंबुद्धिकरूनिवाड ॥ उल्लंघावें ॥ १९० ॥ मगगुरुपाद पावतखेवो ॥ अवघेंसुखचिसोलिंव ॥ तेथेंदुवाडाचेंनांव ॥ उरलेंचिनाहीं ॥ ९१ ॥ हेअनुभवा चीमात ॥ ह्मणोनिहेंअनुभवामृत ॥ ग्रंथाचार्यमूळभूत ॥ श्रीज्ञानदेवा ॥ ९२ ॥ ज्ञानमात्रईश्वरु असे ॥ ह्मणोनिज्ञानेश्वरऐसें ॥ अनुभवामृतमिशें ॥ उपलविलेंसुख ॥ ९३ ॥ यासुखाचापाहें स्वाद ॥ तंवनिखळचिनित्यानंद ॥ जेणेंहेंविशद ॥ वाइलेंसुख ॥ ९४ ॥ ग्रंथींचाग्रंथार्थु ॥ आरं भआणिप्रकर्णांतु ॥ अवघाएकतंतु ॥ नित्यानंदु ॥ ९५ ॥ काळत्रयींअविच्छिन्न ॥ स्वस्वरूपेंसर्व दापूर्ण ॥ यालागींशिवकल्याण ॥ एकचित्स्वरूप ॥ ९६ ॥ आतांलाधलियाअनुभवखूण ॥ ज्ञान नव्हेनाअज्ञान ॥ किंबहुनाअनुभवहीजाण ॥ नमिरवीअंग ॥ ९७ ॥ येणेंसुखजेंसंपन्न ॥ तयाचें असेतेंलक्षण ॥ तियेविषईंनिरूपण ॥ पुढिलेप्रकर्णीं ॥ ९८ ॥ त्याचेंहीविवरण ॥ कर्तानित्यानंद जाण ॥ श्रोतादीजेअवधान ॥ कृपेचेनिवारसें ॥ ९९ ॥ ॥ इतिश्रीअनुभवामृतविवरणेश्रीनित्या नंददीपिकायांज्ञानाहंताखंडणंनामअष्टमप्रकरणंसमाप्तं ॥

---

## प्रकरण नवम.

ॐपरमात्मनेनमः ॥ जयजयजीआद्या ॥ जयजयजीसुखवेद्या ॥ प्रभूस्वसंवेद्या ॥ कल्याणरू पा ॥ १ ॥ जयजयजीजगदेकधामा ॥ जयजयजीआत्मारामा ॥ जयजयजीनिरुपमा ॥ चिन्मात्रा जी ॥ २ ॥ जयजयजीभावातीता ॥ जयजयजीभावभरिता ॥ जयजयजीअद्भुता ॥ अद्वयानंदा ॥ ३ ॥ जयजयजीसुधासिंधु ॥ जयजयजीजगद्बंधु ॥ तूंअवघेंचिहोऊनिसंबंधु ॥ अवघाचिना हीं ॥ ४ ॥ जयजयजीनित्यबुद्धा ॥ जयजयजीस्वतःसिद्धा ॥ जयजयजीनित्यानंदा ॥ करुणाल याजी ॥ ५ ॥ प्रभुतुझीतुजआवडी ॥ तेंचिमीपणासवडी ॥ त्यामीपणाचीकुरवंडी ॥ तुझ्यापाईं ॥६॥ तेंमीपणपऱ्हांसांड्डन ॥ तुझेंनिचितुझेंनमन ॥ तेंचिहेंविवरण ॥ अनुभवामृतैक ॥७॥ ज्ञाना ज्ञानशून्य ॥ स्वरूपजेंसर्वदापूर्ण ॥ जेंप्राप्ताप्राप्तविहीन ॥ नित्यप्राप्त ॥ ८ ॥ तयाआडकांहींचिना हीं ॥ एकाकीस्वरूपचिपाहीं ॥ ऐसाप्रत्ययोरसुजिहीं ॥ स्वीकारिलाजरी ॥ ९ ॥ ऐसियेसुखींअ भिराम ॥ पावलेजेआत्माराम ॥ तियेस्वरूपस्थितीचेंवर्म ॥ सांगिजैलआतां ॥ १० ॥ त्यासुख रूपाचीखूण ॥ मागांसांगितलेंविवरण ॥ आतांप्राप्तांचेंलक्षण ॥ सांगतोंपुढें ॥ ११ ॥ तेंअनुभ वामृतींचीखूण ॥ ज्ञानेश्वरोदितजाण ॥ तेचिनित्यानंदेंविवरण ॥ कीजेलकांहीं ॥ १२ ॥ तेनि त्यानंदैकपदें ॥ स्वीकारितीसंतवृंदें ॥ तेथेंमीहीकांहींलाभें ॥ उच्छिष्टभागु ॥ १३ ॥ हेचाडध

निजिवीं ॥ संतांसआतांविनवी ॥ जेंअवधानेजागवावी ॥ नावेकस्वामी ॥ १४ ॥ मागिलेंप्रकर्णा वसानीं ॥ जैंचित्सुर्येंचिद्गगनीं ॥ रजनीदिवसुदोन्हीं ॥ ग्रासियेली ॥१५॥ सांगीतलेंइयादशा॥ आतांयावरीकैसीदशा ॥ तेंआतांपरियेसा ॥ सांगतुअसे ॥ १६ ॥

## आतांआमोदसुनासजालें ॥ श्रुतिसीश्रवणरिघालें ॥
## आरिसेंउठिलें ॥ लोचनेसी ॥ १ ॥

राहिलेंक्रियाकर्तेंपण ॥ तुटलेंविषयीविषयभान ॥ क्रियाभागानयोन ॥ प्रवाहेंअसिजे ॥१७॥ सर्वीरसांचारस ॥ आपणचिजालेंसावकाश ॥ ह्मणोनिविषयाचारस ॥ तुटोनिगेला ॥ १८ ॥ सर्वीआमोदाचाठेवा ॥ नासिकचविनटलेंअघवा ॥ नासिकेंआमोदघ्यावा ॥ हेंउरलेंनाहीं ॥ १९ ॥ ह्मणोनआमोदसुनासजालें ॥ आतांघेणेंदेणेंचिराहिलें ॥ किंबहुनासर्वाआमोदाचेंघडलें ॥ आपणचिस्वयें ॥२०॥ अथवाअवघ्राणकेलेंनिवीण ॥ आमोदुचिआमोदाचेंघ्राण ॥ तोआमोदजाण ॥ आपणचिजालें ॥ २१ ॥ एवंआमोदचिजरीआपण ॥ तरीअभिलाशुचितुटलाजाण ॥ आतांश्रुतीसीरिघालेंश्रवण ॥ ह्मणिजेऐसें ॥ २२ ॥ वक्तव्यार्थजितुकाअसे ॥ तोआपणेंवीणदुजानसे ॥ ह्मणोनश्रवणाचियेआशे ॥ मनचिनुठी ॥ २३ ॥ श्रुतीचश्रुतीचेंश्रवण ॥ ह्मणिजेश्रवणइंद्रियेंवीण ॥ श्रुतिचजाण ॥ श्रुतिचअसे ॥ २४ ॥ एवंश्रवणेंसीश्रुतिसंबंधु ॥ जालयाउठेआनंदु ॥ ऐसेंनव्हेशब्दार्थेंसिद्धु ॥ आपणचिजालें ॥ २५ ॥ यावरीश्रवणशब्दप्रवाहीं ॥ असोनअतिसोनाहीं ॥ त्रिपुटीवीणकांहीं ॥ सुखमात्रअसे ॥ २६ ॥ आतांरूपाचीचवी ॥ नेत्रिंकरीचाखावी ॥ हे हीठेवाठेवी ॥ राहिलीअघवी ॥२७॥ नेत्रचिआरिसाजाला ॥ पाहावेंहाअतिसोराहिला ॥ एवंनेत्राचानेत्रभला ॥ आपणचिअसे ॥ २८ ॥ एवंसकळरूपाचीचवी ॥ नेत्रचिजालेअघवी ॥ आतां पाहावेंहेगोवी ॥ तुटोनगेली ॥ २९ ॥ नातरीआपलियाज्योति ॥ नयनेंसीआरिसेउजळती ॥ आतांदर्पणाचीगुंती ॥ तुटोनगेली ॥ ३० ॥ जेवींरविआपणाप्रती ॥ कायपाहावयालावीवाती ॥ तेवींआरिसेंनसरती ॥ इयेठाईं ॥ ३१ ॥ एवंविषयजेणेंसुरस ॥ तोसकळरसाचारस ॥ त्यापकरसाचीमूस ॥ आपणजालें ॥ ३२ ॥ ह्मणोनिबुध्यादिकांच्यावृत्ति ॥ बाहेरिपाऊलनघालिती ॥ जालीआत्मरसींतृप्ती ॥ तेंवोहटीचनपडे ॥ ३३ ॥ किंबहुनातोचिन्मयानंदु ॥ तेथेंबुध्यादिकांकेंचाभेदु ॥ आतांविषयांचाछेदु ॥ कोणासीअसावापैं ॥ ३४ ॥ अथवाविषयइंद्रियप्रवाहीं ॥ तेचिभोक्तींत्याचीपाहीं ॥ आतांआपणासीकांहीं ॥ कामवावेंनलगे ॥ ३५ ॥ एवंविषयसंबंधेंवीण ॥ भोगींआपणयांआपण ॥ नेणोनियाकर्तेंपण ॥ क्रियाऐसी ॥ ३६ ॥ अहोआपणयापरती ॥ उरली नाहींत्रिजगती ॥ आतांभोग्यभोक्तृत्वखंती ॥ कासयाअसे ॥ ३७ ॥ इयेंखुणेंबोलिलें ॥ पुढेंहीऐसेंचिबोले ॥ चिन्मात्रएकलें ॥ विलासतसे ॥ ३८ ॥

## आपुलेनिसमीरपणें ॥ वेल्हावतीविंजणें ॥
## कींमाथेचिचांपेपणें ॥ बहकताती ॥ २ ॥

अहोविंजणेडोलती ॥ तोवायुआपलीप्रतीती ॥ आतांविंजणयांचीगुंती ॥ कासयाआली ॥३९ आपलेनसमीरपणें ॥ आपणकांडोलणेंघेणें ॥ आपलेनिशांतपणें ॥ आपणचिनिवावें ॥ ४० ॥ अथवाआपलेंयाचीगती ॥ आपणावरीविंजणेढळती ॥ आतांविंजणयांच्याठाईंरति ॥ धरीलकवण ॥ ४१ ॥ आतांचंपकआणिमस्तक ॥ दोहींचास्वादएक ॥ तरीचंपकाचीअटक ॥ कासयापडे४२ अगाचंपकींचंपकपण ॥ तेंअवघेंअसेआपण ॥ आणिमस्तकाचामाथाजाण ॥ आपणचिजरी॥४३

तरीतुरंबिलियाच्चवीण ॥ मस्तकचिचांपेजाण ॥ येथेंचांपियासीकोण ॥ पुसैलआतां ॥ ४४ ॥ आतांनपुसतनमागत ॥ यदृच्छेनेजैंप्राप्त ॥ परीनव्हेअभिलाषभूत ॥ प्राप्तपुरुषु ॥ ४५ ॥ कांजैंस्वात्मारामरमण ॥ तोकायबुभुक्षितअसेजाण ॥ मातोकरूनिविषयग्रहण ॥ सुखियाहोये ॥ ४६ ॥ एवंभोग्यभोक्तृत्वेंविहीन ॥ क्रियाअथवाउगेपण ॥ ऐसैंचिकांहींनिरूपण ॥ पुढेंहीबोले ॥ ४७ ॥

**जिव्हालोधलीरसें ॥ कमळसूर्यपणेंविकाशे ॥**
**चकोरचिजैसें ॥ चंद्रमाजाला ॥ ३ ॥**

सकळरसांचेंआयतन ॥ जिव्हाचिजालीआपण ॥ तरीआतांरसग्रहण ॥ अतीसोकासया ४८ किंवाविकाशावयाचीखूण ॥ कमळचिलाधेआपण ॥ तरीसूर्योदयाचाकोण ॥ अतीसोत्यासी ॥ ४९ ॥ अथवाचंद्रींचेअमृतकण ॥ त्याचाचकोरजालाआयतन ॥ मगचंद्रोदयाचीकोण॥ वाटपाहे ॥ ५० ॥ तेवींविषयजेणेंरसाळ ॥ त्याचेंआपणचिजालामूळ ॥ मगविषईकहळहळ ॥ चुकलीत्याची ॥५१॥ एवंआत्मानुभवाचीखूण ॥ लाधलियाऐसेंजाण॥ आपणेंवीणआन ॥ उरलेंनाहीं ॥ ५२ ॥ ह्मणोननपावतांबाहिरनरिघे ॥ पावलियाअतीसोनघे ॥ द्वंद्वाचियेलगबगें ॥ पडणेंचिनाहीं ॥ ५३ ॥

**फुलेंचिजालींभ्रमर ॥ तरुणीचिझालीनर ॥**
**जालेंआपुलेंशेजार ॥ निद्राळूचि ॥ ४ ॥**

फूलचिभ्रमरजालें ॥ तरीभोगणेंकांलागलें ॥ भ्रमरयेणेंबोलें ॥ भोक्तापुरुषु ॥५४॥ त्याभोक्त्यासीपाहीं ॥ भोग्यजातदुसरेंनाहीं ॥ ह्मणोनिआपुल्याठाईं ॥ अभिरतअसो ॥५५॥ संमतिः ॥ यस्त्वात्मरतिरेवस्यादात्मतृप्तश्चमानवः ॥ आत्मन्येवचसंतुष्टस्तस्यकार्यंनविद्यते ॥ १ ॥ इतिभगवद्वचनं ॥ किंवानराचीनारी ॥ नरुचिजरीअवधारी ॥ तरीभोगावयाचीकुसरी ॥ आपुल्याठाईं ॥ ५६ ॥ अहोजेणेंसुखेंसुरत ॥ तियेसुखचिअसतांरत ॥ सुरताचाकायतेथ ॥ पाडअसेपां ५७ किंवातरुणीचानर ॥ तरुणीचिअसेसधर ॥ तरीनकरितांव्यभिचार ॥ भोगिजेभोगु ॥ ५८ ॥ अगादुसरयाचानसोनपांगु ॥ भोक्ताचिभोग्यअभंगु ॥ हानवलराजयोगु ॥ सांगितलाअसे ॥५९॥ किंवानिद्राळुयाचीसेज ॥ निद्राळुचिअसेसहज ॥ आतांयेथेंसेजवाज ॥ कैंचीआणावी ॥ ६० ॥ एवंहेंअवघेंचरित्र ॥ तेंआपलेंचिअसेचित्र ॥ अवघयाचेंसूत्र ॥ आपणापैंअसे ॥६१॥ आतांयाचें दृढीकरण ॥ करावयानिरूपण ॥ पुढिलियेपदींजाण ॥ दावितअसे ॥ ६२ ॥

**दिठीवियाचारवा ॥ नागरुइयाठेवा ॥**
**घडिलाकाकोरिवां ॥ परीजैसा ॥ ५ ॥**

दृष्टिचेतिमिर ॥ उगाचिउठिलाआकार ॥ नागरुह्मणिजेसुंदर ॥ कोरिवापरी ॥६३॥ तेथेंदृष्टीवांचूनिकांहीं ॥ दुसराअर्थुचिनाहीं ॥ भोग्यभोक्तृत्वप्रवाहीं ॥ एकचिदिठी ॥ ६४ ॥ तेवींहेंविषयभान ॥ अवघेंज्ञातयाचेंज्ञान ॥ येथेंभोक्तातोकवण ॥ आणिभोग्यतेंकाई ॥ ६५ ॥ असोहादृश्यविलासअघवा ॥ केवळदिठीचाचिकींरवा ॥ कांजेद्रष्ट्यानेंजेव्हां ॥ अवलोकिलेंकीं ६६ तेव्हांहेंअवघेंदृश्यभान ॥ द्रष्टाचिविलासलाआपण ॥ एवंभोग्यभोक्ताजाण ॥ द्रष्टाचिएकु ॥६७ ऐशीलाधतांखूण ॥ सकळभोग्यजाताचेंआयतन ॥ आपणचितरीजाण ॥ अभिलाषकासया ६८ जेवींमूतिचेरवा ॥ नागराचियाठेवा ॥ कोरिलाबरवा॥ आपुलीयेकुसरी ॥६९॥ तेणेंकीजेपृथ्वीवि

लेखन ॥ तरीस्वतातोचिपृथ्वीआपण ॥ तेवींहेंभोग्यभोक्तेपण ॥ प्राप्तपुरुषा ॥७०॥ अहोयापदाचेंविवरण ॥ केलेंआपलेमतिप्रमाण ॥ यावरीयाचाअर्थसुजाण ॥ काढितीआणीक ॥ ७१ ॥ तरीयेथेंयेईलवैगुण ॥ तेंक्षमाकरितीसज्जन ॥ आणिमजतेंहीप्रमाण ॥ अर्धीचआहे ॥ ७२ ॥ असोहातात्पर्यार्थुऐसा ॥ अनुक्रमेंक्रियाठसा ॥ परीभोग्यभोक्तृत्वदशा ॥ उमसुनेघे ॥ ७३ ॥ इयेविषयींपुढेंवचन ॥ तेंहीआतांसांगोंजाण ॥ श्रोतादीजोअवधान ॥ कृपाकरूनि ॥ ७४ ॥

**तैसेंभोग्यआणिभोक्ता ॥ दिसेआणिदेखतां ॥**

**हेंसरलेंअद्वैता ॥ अफुटामार्जी ॥ ६ ॥**

स्फुरणमात्रवस्तुजेंकांहीं ॥ तेंफुटेऐसेंजडनाहीं ॥ मगभोग्यतेथेंकाई ॥ आणिभोक्ताकवणु ॥ ७५ ॥ आतांजेंदिसेभोग्यभोक्तेपण ॥ किंवादृश्यआणिदेखताजाण ॥ तेंचिन्मात्रनफुटोन ॥ विलासतअसे ॥ ७६ ॥ हाहीविलासजोनावेक ॥ पहातयाचेंकौतुक ॥ वांचोनितत्वदर्शिअनोळख ॥ भोग्यभोक्तृत्वासी ॥ ७७ ॥ येचिविषयींबहुतांपरी ॥ दृष्टांताचियाकुसरी ॥ विलासेंविलासवरी ॥ परीवस्तुएक ॥ ७८ ॥

**सेवंतेपणाबाहेरी ॥ ननिगतांचिपरी ॥**

**पांतीसहस्रवरी ॥ उपलविजे ॥ ७ ॥**

पातींउकललींसहस्र ॥ परीसेवंतीचेंपुष्पमात्र ॥ तेवींजाणीवेचेंचित्र ॥ जाणीवपक ॥ ७९ ॥ अहोपरिमळमात्रजोकांहीं ॥ सहस्रपांतियांच्याठायीं ॥ सहस्रधाजालानाहीं ॥ सगळाअसे ॥८० तेवींनानाभावांचाआकार ॥ परीएकलेंहेंचिन्मात्र ॥ तेंजालेंनाहींविचित्र ॥ नानाकारी ॥ ८१ ॥

**तैसेंनवांनवांअनुभवीं ॥ वाजतांबाधावीं ॥**

**अक्रियेच्यागांवीं ॥ नेणिजेतें ॥ ८ ॥**

अगावर्ततियेस्वभावें ॥ एकलेनिचअनुभवें ॥ नवेनवेहेलावे ॥ राहाटिचेयेती ॥ ८२ ॥ वर्ततांदिसेचपळ ॥ बैसतांदिसेनिश्चळ ॥ बोलतांशब्दजाळ ॥ उदंडचिदिसे ॥ ८३ ॥ मौनींमौनाचिसारिखा ॥ भोजनींभोक्ताचिहोयेदेखा ॥ जैसियाक्रियाअशेखा ॥ तैसाचिहोये ॥ ८४ ॥ भजनमार्गीचाभक्तजाण ॥ तोचिभक्ताचेंपूजास्थान ॥ तोचिविधिकिंकरआपण ॥ विधिमाजींदिसे ८५ असोक्रियेचेंउच्छवें ॥ वाद्येलाऊनिमिरवें ॥ परीअक्रियेत्वाचियेसिवें ॥ उल्लंघणेंनाहीं ॥ ८६ ॥ आपणविधीमाजींपडे ॥ तरीह्मणीविधिकिंकरत्वजोडे ॥ इयेशंकेचेंवेडे ॥ नाहींतया ॥ ८७ ॥ एवंनमोडोनऐक्यानुभव ॥ नवांनवांअनुभवाचीठेव ॥ वर्ततेथेंतैसाचिभाव ॥ निशाणाचापडे ॥ ८८ ॥ असोजियेस्वभावींजैसापडे ॥ तैंतेथिलचऐसाआवडे ॥ परीअक्रियत्वाचीनमोडे ॥ रेखाकांहीं ॥ ८९ ॥ एवंयेणेंप्राप्तपुरुषें ॥ पतितप्रवाहाचेनिमिशें ॥ जेंजेंकेलेंतेंजैसें ॥ केलेंचिनाहीं ॥ ९० ॥ अक्रियेचेंगांव ॥ ह्मणिजेसिद्धस्वरूपानुभव ॥ तेथेंकर्ममात्राचेंनांव ॥ जाणिजेचिना९१ उठतांकर्माचेंगाडे ॥ अक्रियत्वाचीरेखानमोडे ॥ कांजेंप्रत्ययोनविघडे ॥ योगीवराचा ॥ ९२ ॥ आतांहेंचिदृढकरण ॥ विषईकजेंनिरूपण ॥ तेंहीकांहींविवरण ॥ कीजेलऐका ॥ ९३ ॥

**ह्मणोनिविषयांचेनिनावें ॥ सुनींइंद्रियांचेथवे ॥ सैंघघेतीधांवे ॥ समोरही ॥ ९ ॥ परीआरिसाशिवेशिवे ॥ तंवदिठीसीदिठीफावे ॥ तैसेंजालेंधावे ॥ वृत्तिचेया ॥ १० ॥**

विषयांचियेमोहरे ॥ आपुलालेअधिकारें ॥ इंद्रियकुळविहरे ॥ राबणुकेसी ॥ ९४ ॥ परीइं द्रियांचीमुळींचीगोडी ॥ तेजालीविषयांयेव्हडी ॥ हेंदेखोनिधडफूडीं ॥ तोषतीचिना ॥ ९५ ॥ ह्मणोनविषयधांवसांडूनि ॥ राहिलींनिजसुखींबुडोनि ॥ बाहिरपाउलझणी ॥ घालूंआवडे ९६ जेवींआरिसाहातींघेऊनि ॥ पाहेनावेकन्याहाळूनि ॥ तंवदिठीदेखणी ॥ दिठीचिजाली ॥ ९७ ॥ अहोतोमुखसुखींचरतजाला ॥ आरिसाविसरोनिगेला ॥ कांजेदिठीनेचिसुकाळकेला ॥ दिठी चाचि ॥ ९८ ॥ तेवींजेणेंआत्मसुखें ॥ विषयलागतीनिके ॥ तयासुखासीवोळखे ॥ योगीजनु ॥ ९९ ॥ ह्मणोननिजसुखाचीयेतृप्ति ॥ मोडलीअसेअवघीवृत्ति ॥ आतांविषयांकडेढळती ॥ प्रवा हेंइंद्रियें ॥१००॥ परीत्याविषयइंद्रियप्रवाहीं ॥ योगीजनाकाजनाहीं ॥ तोआनंदाच्याडोहीं ॥ निम ग्नचिअसे ॥ १ ॥ जेवींएकाधेविषयींरतजाला ॥ तोतेणेंचिअसेसुखावला ॥ तेणेंइतरकाय सांडिला ॥ इंद्रियचाळा ॥ २ ॥ जेवींजारस्त्रीपरपुरषींरत ॥ तेथींचिजडलेंअसेचित्त ॥ मगयेर घरवात ॥ सांडिलेंकांहीं ॥ ३ ॥ तेवींआत्मसुखाचेंपडिभरें ॥ नपडेदुजियेमोहरे ॥ इंद्रियग्राम विहरे ॥ आपलेस्वभावें ॥ ४ ॥ असोआतांआत्मरसें ॥ विषयेंवोडवलींविरसें ॥ आपुलेंनपैसें ॥ विषयजितीं ॥ ५ ॥ मोडोनिआपलेंस्वतंत्रपण ॥ नव्हेविषयांअधीन ॥ आपुलेंनहेंजनवन ॥ मांडलेंअसे ॥६॥ येविषयींदृष्टांत ॥ देऊनिअसेबोलत ॥ स्वानंदेंभरितचित्त ॥ विवरिजैलतेंहीं७

**नागमुदीकंकण ॥ त्रिलिंगींभेदलीखूण ॥**
**घेतांतऱ्हींसुवर्ण ॥ घेइजेकीं ॥ ११ ॥**

कटककुंडलादिभेदीं ॥ सोनयापरतीनाहींअवधी ॥ आणिमोलापासींहीबुद्धी ॥ भेदतोडी॥८॥ अळंकारदिसतीवायिलाले ॥ परीमोलींसुवर्णएकलें ॥ मोलबुद्धींतुटलें ॥ अळंकारध्यानें ॥९॥अ सोजडलेंसुवर्णीमन ॥ तुटलेंअळंकाराचेंध्यान ॥ तेवींस्वरूपींपावतांसमाधान ॥ विषईंविसर११०

**वेंचूनआणूंकल्लोळ ॥ ह्मणोनघांपेकरतळ ॥**
**तेथेंतरीनिखळ ॥ पाणीचिफावे ॥ १२ ॥**

देहाचेनिआकारें ॥ ज्ञानियाविषईंवावरे ॥ परीविषयबुद्धिचेधुरे ॥ नबैसेतो ॥ ११ ॥ इंद्रियें विषईंविचरती ॥ परीहालवेनाआत्मप्रतीति ॥ रागद्वेषासंविती ॥ आतळेनाकीं ॥ १२ ॥ स्मृ तिः ॥ रागद्वेषवियुक्तैस्तुविषयानिंद्रियैश्चरन् ॥ आत्मवश्यैर्विधेयात्माप्रसादमधिगच्छति॥ ॥ इ तिभगवद्वचनं ॥ एवंज्ञानियाविषयाचरण ॥ रागद्वेषविहीन ॥ कांजेंनिजात्मत्वींमन ॥ विरोनि गेलें ॥ १३ ॥ आतांइंद्रियग्रामविहरत ॥ तोसंकल्पेंरहित ॥ आत्मत्वाहूनिविपरीत ॥ देखणेंचि नाहीं ॥ १४ ॥ जेवींउचलोनिघेइजेकल्लोळ ॥ तंवसांपडेनसुधेंजळ ॥ तेवींविषयइंद्रियांचाखेळ॥ परीस्वरूपमात्र ॥ १५ ॥ त्यास्वरूपाहूनिकांहीं ॥ ज्ञानियासीढळणेंनाहीं ॥ तोआत्मरसुतिहीं ॥ चाखिलाअसे ॥ १६ ॥ ह्मणोनजयातयारीति ॥ आत्मसुखाचीप्रतीति ॥ ऐसेंचिकांहींमाशुतीं ॥ बोलतअसे ॥ १७ ॥

**हातांपासीस्पर्शु ॥ डोळ्यांपासीरूपसु ॥ जिव्हेपासीमिठां**
**शु ॥ कोण्हीएकु ॥ १३ ॥ तऱ्हींपरिमळापरौतें ॥ रवेपणना**
**हींकापुरातें ॥ तेवींबहुतांपरीस्फुरतें ॥ तेंचिस्फुरे ॥ १४ ॥**

अगाकापुराहातींघेतां ॥ हस्तींजोडेमृदुता ॥ परीपरिमळाच्यावेळायेतां ॥ तेंभानचिनाहीं १८

किंवाउजाळतातेथीलजाण ॥ नेत्रींउमटेभान ॥ परिमळींरंगलेंमन ॥ तेंनेत्रासीनयेपैं ॥ १९ ॥ किंवापरिमळाचेचिप्रीति ॥ पक्वान्नींतऱ्हींघालिती ॥ जिव्हाहोयचाखती ॥ तेणेंचिमिशें ॥१२०॥ परीसुवासींवेधलेंमन ॥ जिव्हाद्वारेंनरमेजाण ॥ तेवींहोतांविषयग्रहण ॥ आत्मत्वींरत ॥ २१ ॥ अगानानारूपप्रवाहीं ॥ स्फुरणमात्रएकचिजेंकांहीं ॥ तियेस्फुरणमात्रींजिहीं ॥ बुडीदिधली ॥ २२ ॥ तेथेंइंद्रियांचेरीति ॥ वर्ततांहीदिसती ॥ परीतिहींनिजात्मरीति ॥ सांडिलेंनाहीं ॥ २३ ॥ अगाहेबहुतांकरिजेंस्फुरे ॥ तेथेंनाहींचिकींदुसरें ॥ तेंएकचिसर्वदास्फुरे ॥ ज्ञानियासी ॥ २४ ॥ तयाव्यापाराचेप्रवाहीं ॥ कर्तृत्वावरीयेणेंनाहीं ॥ ऐसेंचिपुढेंकांहीं ॥ बोलतुअसे ॥ २५ ॥

**ह्मणोनिशब्दादिपदार्थ ॥ श्रोत्रादिचेहात ॥ घ्यावयाजेथ ॥ उजूहोती ॥ १५ ॥ तेथेंसंबंधुहोयेनहोये ॥ तंवइंद्रियांचेंतेनो हे ॥ मगअसतेंचिआहे ॥ संबंधुना ॥ १६ ॥**

जोआत्मसुखींरमण ॥ तोश्रोत्रादिइंद्रियेंकरून ॥ करीविषयाचेंग्रहण ॥ ऐसेंआवडे ॥ २६ ॥ परीआत्मसुखेंनिवालीं ॥ तेंइंद्रियनव्हेतिचिचेइलीं ॥ आत्मरसेंमंदावलीं ॥ क्षुधितचिनव्हतीं ॥ २७ ॥ असोहोतांविषयइंद्रियसंबंधु ॥ इंद्रियेंनघेतीविषयस्वादु ॥ जेणेंहास्वादसिद्धु ॥ तेचि स्फुरे ॥ २८ ॥ अगाजेणेंविषयींविषयपण ॥ तेंइंद्रियेंकरूनसकतीग्रहण ॥ यालागींतयाचास्वाद जाण ॥ तेंचिभोगी ॥ २९ ॥ यालागींलाधतांआत्मसंपत्ति ॥ इंद्रियांनाहींविषयरति ॥ आतांतें जेंकांहींविचरती ॥ तेपतितप्रवाहें ॥१३०॥ स्फुरेजेंतेंचिस्फुरेपाहीं ॥ इंद्रियाविषयांसंबंधनाहीं॥ येथेंस्फुरणावांचूनिकांहीं ॥ असेनापैं ॥ ३१ ॥ अहोआत्मविदेंकांहीं॥ दुजेंदेखिलेंचिनाहीं ॥ ह्म णोनआत्मसुखासीपाहीं ॥ खंडणचिनसे ॥ ३२ ॥ पुढेंऐसेंचिनिरूपण ॥ दृष्टांतेंसहवर्तमान ॥ असेंतेथेंअवधान ॥ दिजोजिनिकें ॥ ३३ ॥

**जियेंपेरिदिसतीउंसीं ॥ तियेंलाधतीकींरसीं ॥ कांतिजेवींशशी ॥ पुणीवेचिया ॥ १७ ॥**

अगापेरियाचासंबंधू ॥ तोरसाचाचिकींस्वादु ॥ वांचोनिभोगियानव्हेलब्धु ॥ पेरियांसी ॥ ३४ ॥ उजूवक्रवर्णभेदु ॥ हाकांहींनसेछंदु ॥ रसमात्रचिलुब्धु॥ जालासेजरी ॥३५॥ तयापेरि यांचीपरवडी ॥ स्वादींनपडेसवडी ॥ तेवींविषयांचेघडमोडी ॥ काजसरलें ॥ ३६ ॥ अगानाना वर्णनानापरवडी ॥ अवघीएकिगोडी ॥ प्रतीतीसीदुथडी ॥ होऊंचिनसके ॥ ३७ ॥ होतांविष यांचावियोग ॥ रसवृत्तीसीनव्हेभंग ॥ मागुतांलाभतांलगबग ॥ नेघेचिज्ञानी ॥ ३८ ॥ सुखास नीबसतां ॥ जेणेंसुखेंसुखावलाहोता ॥ तेथूनआलाखालुता ॥ तेथेंतेंचिकींसुख ॥ ३९ ॥ सुखा सनाचेनितोलें ॥ भूतळचितयाजोडलें ॥ कांजेंसमविषमतेसीघातलें ॥ पहिलेंचिपाणी ॥१४०॥ असोहेंउंचनिचभरोवरी ॥ आथीनाथीकुसरी ॥ एकल्याकांडोरि ॥ चिन्मयरसासी ॥ ४१ ॥ ह्मणोनरसभोक्तापाहीं ॥ कांडोरियाचाडनाहीं ॥ जयातयाप्रवाहीं ॥ रसमात्रचिलाभे ॥ ४२ ॥ तोरसचिजेंजालेंपाहीं॥ तयाग्रहणत्यागुचिनाहीं ॥ तेंआथीनाथीकांहीं॥ओसरतीअंगें ॥४३॥ कां जेंतयाचियासुखेंकांहीं ॥ खंडणदेखिलेंचिनाहीं ॥ तेंसुखमात्रचिपाही ॥ संचलेंअसे ॥ ४४ ॥ जेवींपौर्णिमेसीपाहीं ॥ कोण्हींहीकवणेठाईं ॥ अस्तुदेखिलानाहीं ॥ चंद्राचाकीं ॥४५॥ ह्मणोनि पुणीवेच्यादिवसीं ॥ अस्तुनाहींचंद्रासी ॥ तेवींनाहींज्ञानियासी ॥ अन्यथाप्रतीति ॥ ४६ ॥ ते

आत्मरसडोहीं ॥ सर्वदानिमग्नपाही ॥ हाइंद्रियग्रामतिहीं ॥ देखिजेनाकीं ॥ ४७ ॥ आतांप्रवाह प्रतीत ॥ इंद्रियेंविषयींविचरत ॥ परीज्ञानियानढळत ॥ आत्मसुखीहूनि ॥ ४८ ॥ जयातया परी ॥ आत्मसुखाचीउजरी ॥ ह्मणोनिअभिलाषाच्याघरीं ॥ येणेंनाहीं ॥ ४९ ॥ असोइंद्रियेंविष यप्रवाहीं ॥ हानीलाभदेखिलानाहीं ॥ दृष्टांतइयेविषईं ॥ पुढेंहीबोले ॥ १५० ॥

पडिलेंचांदावरीचांदिणे ॥ समुद्रींजालेंवरिखणें ॥
विषयाकरणें ॥ भेटतीतैंसी ॥ १८ ॥

चंद्रींचीचंद्रिका ॥ चंद्रावरीपडलियादेखा ॥ लाभनाउपखा ॥ दोन्हींहीनाहीं ॥ ५१ ॥ अ थवामेघाचेनिमिशें ॥ सागरुसागरावरीवरुषे ॥ तैंहानिलाभाचियेदशे ॥ येइजेकोणें ॥५२॥ तेवीं विषयांचेअप्राप्ति ॥ ज्ञानियानघडेखंती ॥ किंवाप्राप्तद्वारातृप्ति ॥ देखिजेना ॥ ५३ ॥ जेवींसमुद्र जळेंसंपन्न ॥ तोकायमेघेंकीजेपूर्ण ॥ अथवाचंद्रप्रकाशघन ॥ तोकायऔपाधिकगुणें ॥५४॥ तेवीं विषयसंबंधेंवीण ॥ आत्मरसेंचिजेंपूर्ण ॥ तयाजालयाहीविषयग्रहण ॥ इंद्रियप्रवाहीं ॥ ५५ ॥ तेथेंजेंसुखउपजोंलाहे ॥ तेंअधींचिआपणआहे ॥ ह्मणोनइंद्रियव्यापारींनोहे ॥ प्रपंचोन्मुख ॥ ५६ ॥ इयेंविषईंनिरूपण ॥ पुढेंहीअसेजाण ॥ द्यावेंश्रोताअवधान ॥ कृपाकरूनि ॥ ५७ ॥

ह्मणोनतोंडाआडपडें ॥ तेंचिवाचावावडें ॥
परीसमाधिनमोडे ॥ मौनमुद्रेचीं ॥ १९ ॥

अगाआपलियासत्ते ॥ वाचाशब्दींप्रवर्ते ॥ तियेआत्मत्वींचजयातें ॥ वस्तिजाली ॥ ५८ ॥ तेणेंआपलेनवीण ॥ देखिजेनाजनविजन ॥ आत्माचिपरिपूर्ण ॥ कोंदाटलाकीं ॥ ५९ ॥ इयेपूर्ण तेमाझारीं ॥ जेंजेंवदेवैखरी ॥ तेंसमाधिहूनिदुरी ॥ गेलेंचिनाहीं ॥ १६० ॥ ज्याज्याअर्थातेंशब्द दावी ॥ तोअर्थुचिवाचेतेंचेतवी ॥ एवंअर्थुचिलाघवी ॥ अर्थाचाआहे ॥ ६१ ॥ ह्मणोनिनसोनिवा च्यवाचकता ॥ मौनमुद्रानमोडतां ॥ अर्थुचिहोयवक्ता ॥ अर्थाचापैं ॥ ६२ ॥ इयेअर्थरूपेंचित्सा गरीं ॥ बुडालीपरेसींवैखरी ॥ येथेंबोलण्याचीसरोभरी ॥ मौनेंसीपडे ॥ ६३ ॥ अगापावतांपे सीखूण ॥ तुष्णींभावासीहीगिळून ॥ अखंडैकमौन ॥ करणीवीण ॥ ६४ ॥ असोजेंजेंवाचावा वडे ॥ तेस्थितिबाहेरीनपडे ॥ ह्मणोनमुद्रानमोडे ॥ मौनाचीआतां ॥ ६५ ॥ अगाऐशियेस्थिती च्याठाईं ॥ आपणेंवीणदुजेंनाहीं ॥ क्रियाउगेपणजिहीं ॥ देखिजेनाकीं ॥ ६६ ॥ ह्मणोनपडिलाप्र वाहनमोडे ॥ आणिकेलेंपणहीनजोडे ॥ ऐसेंचिकांहींपुढें ॥ बोलतुअसे ॥ ६७ ॥

व्यापाराचेगाडे ॥ मोडतांहीअपाडें ॥
अक्रियेचेंनमोडे ॥ पाउलकेंहीं ॥ २० ॥

आपलेनिसुखाडे ॥ प्रवाहाचेनिकोडें ॥ भरलेंदिसतीगाडे ॥ व्यापाराचे ॥ ६८ ॥ वर्णाश्रमा चियेवांटे ॥ केलेनिवीणकर्मउठे ॥ परीअक्रियनफुटे ॥ जालेंनकर्म ॥ ६९ ॥ जेवींपात्राचेंनिसुर वाडें ॥ गंगाजळबहुथोडें ॥ तेवींप्रवाहाचेनिपाडे ॥ व्यापारउठे ॥१७०॥ जयाजयाप्रवाहीं ॥ जे- व्हांजैसेंकांहीं ॥ दिसेतैसानाहीं ॥ प्रत्ययोजाला ॥ ७१ ॥ अथवाजळाचियाचंचळता ॥ चंद्रीं दिसेआंदोळतां ॥ तरीचंद्रकायतत्त्वता ॥ लगबगेंपडिला ॥ ७२ ॥ तेवींदेहाचियाआकारीं ॥ ज्ञानियादिसेव्यापारी ॥ परीअक्रियबाहेरी ॥ पाऊलनघाली ॥ ७३ ॥ आतांकर्मेंकरीजेनिफ जेजाण ॥ तेंअधींचिअसेआपण ॥ तरीकरितचिउगेपण ॥ आलेंनापाहा ॥ ७४ ॥ अगाकर्माचाप्र

वर्तकु ॥ तयासीघडेकर्मपाकु ॥ तरीमृगजळींअर्कु ॥ विंबलापाहा ॥ ७५ ॥ होतांचुंबकसन्नि धान ॥ लोहासीजालेंचळण ॥ परीचुंबकतवजाण ॥ हारुवेना ॥ ७६ ॥ किंवानदीयेवृक्षविंबला॥ तोजेवींपूरेंनाहींगेला ॥ तेवींव्यापारेंनाहींजाला ॥ व्यापारीहा ॥ ७७ ॥ असोस्वरूपदृष्टिकांहीं ॥ दुसरेंदेखिलेंचिनाहीं ॥ आतांव्यापारुतोकाई ॥ आणिव्यापारीतोकवणु ॥ ७८ ॥ ह्मणोनऐसियेस्वरूपदृष्टी ॥ जालियाचनाहींसृष्टि ॥ ऐसीचकांहींगोठी ॥ पुढेंहीसांगे ॥ ७९ ॥

**पसरूनिवृत्तिचीवावें ॥ दिठीरूपातेंदेखवें ॥**
**परीसाचाचेनिनांवें ॥ कांहींचनलगे ॥ २१ ॥**

रूपातेंपाहावेंदिठीं ॥ ऐसेंहीयेखादेवेळउठी ॥ तंवदिठिचेचपोटीं ॥ रिगालीदिठी ॥ १८०॥ ते दिठीचेंरूपजालें ॥ पाहावेंहेंतेथेंसरलें ॥ असोदेखतदेखतजालें ॥ देखिलेंमिथ्या ॥ ८१ ॥ जेवीं लेंकुराचाखेळ ॥ भलतैसेंएकदळ ॥ संपदासकळ ॥ तियाचिमाजीं ॥८२॥ वडेमांडेतेंचिजालें ॥ परीदळमात्रचितेंएकलें ॥ तेवींज्ञानियानेंअवलोकिलें ॥ नानारूपांसी ॥ ८३ ॥ अथवाबुद्धिबळा चाखेळ ॥ राजाप्रधानपदातिसकळ ॥ कोरडेंचिकेवळ ॥ काष्ठमात्र ॥ ८४ ॥ खेळतांनहोनिब रळ ॥ संपादींस्वदळपरदळ ॥ तेवींहाजोपाहेतेंकेवळ ॥ आपुलेंकौतुक ॥ ८५॥ तोअसेआपुल्या चिठाईं ॥ ह्मणोनदेखिलेंतेंसत्यनाहीं ॥ आतांदृष्टांतइयेविषईं ॥ पुढेंहीबोलें ॥ ८६ ॥

**तमातेंध्यावया ॥ उचलूनिसहस्त्रबाहिया ॥**
**शेवटींरवीइया ॥ हाचिजैसा ॥ २२ ॥**

रवीस्वतप्रकाशघन ॥ करूंपाहेतमाचेंग्रहण ॥ तरीतयाकायजाण ॥ सांपडेलतम ॥ ८७ ॥ तोतमपाहेकींनपाहे ॥ परीरवीअनारिसानोहे ॥ तमाचीसोये ॥ नसांपडेतया ॥ ८८ ॥ तमासी घेऊंरिघे ॥ तंवप्रकाशुचिहातींलागे ॥ तेवींविषयांचेनिबागें ॥ ज्ञानियानपडे ॥ ८९ ॥ तंवआपु लेंपूर्णपणीं ॥ नेणेंविषयाचीकाहाणी ॥ तोकाळत्रयींहीझणी ॥ अन्यथानदेखे ॥ १९० ॥

**स्वप्नींचियाविलासा ॥ भेटइनइयाआषा ॥ उठिलातंवजैसा ॥ तोचिमातो ॥ २३ ॥ तैसाउदेलयानिविषयें ॥ ज्ञानीविषयींहोंलाहें ॥ तंवदोन्हींनहोनिहोये ॥ कायनेणों ॥ २४ ॥**

अगाजागेजालयावरी ॥ स्वप्नींचीअंतौरी ॥ आलिंगावीऐसेंधरी ॥ कौतुकजरी ॥ ९१ ॥ तंव त्यास्वप्नभासेचेंमुदल ॥ आपणअसेअढळ ॥ तेंसाचयेरटवाळ ॥ भासलेंतें ॥ ९२ ॥ मगतया चीआवडी ॥ साचिदेऊनिबुडी ॥ भोगाचीपरवडी ॥ आपणेंसीचि ॥ ९३ ॥ तेवींस्वरूपानुभव जालियापूर्ण ॥ हरपलेंप्रपंचभान ॥ आतांप्रवाहेंइंद्रियगण ॥ तिष्ठतुअसे ॥ ९४ ॥ तेंकींइंद्रियद ळ ॥ जैसेंकींरोहिणीजळ ॥ आणिगंधर्वनगरीसकळ ॥ विषयवसती ॥ ९५ ॥ त्याविषयांची वृत्ति ॥ इंद्रियेंनावेकखवळती ॥ परीकरणीचीरीति ॥ नुमटेचिकांहीं ॥ ९६ ॥ विषयइंद्रिय प्रवाहीं ॥ उमटलेंजेंकांहीं ॥ चित्रदीपाच्याठाईं ॥ प्रकाशजैसा ॥ ९७ ॥ असोविषयांकडेपाहा तां ॥ आपलीदिसेसत्यता ॥ त्याआपणामाजींतत्वतां ॥ विषयकैंचा ॥ ९८ ॥ आपआपणाविष यआहे ॥ ह्मणोनिभोगावयासमर्थनव्हे ॥ किंवाआपलेसाचिनसंभवे ॥ विषयाचीवार्ता ॥ ९९ ॥ ह्मणोनस्वरूपानुभवप्रवाहीं ॥ केलियाहीकर्तव्यनाहीं ॥ नह्रोनविषयविषईं ॥ कांहींएक ॥२००॥ एकरूपीदोनीजाण ॥ तरीमुळींरूपचिविकारशून्य ॥ चिन्मात्रचिजेंजाण ॥ स्फुरेनानासंकोचे

॥ १ ॥ करणीकडेपाहे ॥ तंवपाहाणेंमात्रचिआहे ॥ तेथेंकर्ताकार्यहें ॥ कैंचेंउरेल ॥ २ ॥ ऐसियास्थिति ॥ ज्ञानियाचिआकृति ॥ पुढेंहीदृष्टांतीं ॥ सहितबोले ॥ ३ ॥

**चंद्रवेंचूंगेलाचांदिणें ॥ तंववेंचिलेंकायकोणें ॥**
**विऊनिवांझेस्मरणें ॥ होतीजैसीं ॥ २९ ॥**

अहोतयासीक्रियाप्रवाहीं ॥ केलेंतैसेंउमटलेंनाहीं ॥ चंद्रमाजेवींपाहीं ॥ चांदिणेंवेंची ॥ ४ ॥ चंद्रजायचांदिणीयालागीं ॥ तंवसांपडेआपलेचअंगीं ॥ करणीचीलगबगी ॥ टवाळजाली ॥ ५ ॥ आतांचांदिणेंचंद्रचिजाण ॥ वेंचिलेंकायकोणें ॥ एवंकेलयावीण ॥ कार्यजालें ॥ ६ ॥ किंवाप्रयोजनेंवीणस्मरण ॥ तैंविऊनवांझजालेंमन ॥ तेथेंचिस्मरतजालेंपण ॥ आलेंनाहीं ॥ ७ ॥ तैसीज्ञानियाच्याठाईं ॥ करणीहीउगलीनाहीं ॥ परीमोडलेंनाहीं ॥ वांझपणतयाचें ॥ ८ ॥ अगाअभिलाषेंवीण ॥ शरीरधर्ममात्रजाण ॥ परीमनाचेंवांझपण ॥ मोडलेंनाहीं ॥ ९ ॥ अगालाधलियाअपरोक्षखूण ॥ मनासीकैंचेंमनपण ॥ आतांमनचिमुरालियाजाण ॥ शरीरकैंचें ॥ २१० ॥ ह्मणोनतयाचेंप्रत्यई ॥ शरीरेंसीमननाहीं ॥ आतांभाविलेंप्रवाहीं ॥ भासुयेरां ॥ ११ ॥ तोअवाप्तसकळकामु ॥ निखळस्वानंदाभिरामु ॥ करणीचाउगमु ॥ दिसतचिनाहीं ॥ १२ ॥ अहोजेंजेंकार्यउपजे ॥ तेंतेणेंकांहींनेणिजे ॥ विऊनिवांझह्मणिजे ॥ यालागींऐसें ॥ १३ ॥ अगाहादेहाचाआभास ॥ निखळकर्माचीचमुस ॥ ह्मणोनकर्मेंवीणयास ॥ असणेंनाहीं ॥ १४ ॥ ॥ ॥ स्मृतिः ॥ ॥ नहिदेहभृताशक्यंत्यक्तुंकर्माण्यशेषतः ॥ यस्तुकर्मफलत्यागीसत्यागीत्यभिधीयते ॥ इतिभगवद्वचनं ॥ परीय ाच्याठाईं ॥ तादात्म्यचिजयानाहीं ॥ आपलेसिद्धप्रत्ययीं ॥ आपणचिअसे ॥ १५ ॥ आतांहाजोभासकांहीं ॥ तोअसेआपलेप्रवाहीं ॥ तोक्रियामूळचिपाहीं ॥ ह्मणोनक्रियाउगवे ॥ १६ ॥ याउगवणीयाहीसहित ॥ तोस्वरूपमात्रइत्थंभूत ॥ स्वरूपेंवीणयेथ ॥ कांहींचनसे ॥ १७ ॥ ह्मणोनअतिसोहीनाहीं ॥ आणिक्रियाहीहोतसेपाहीं ॥ तेक्रियाह्मणालकाई ॥ तरीदेहाभासुचिकींयेथें ॥ १८ ॥ क्रियाकांहींनव्हावी ॥ ऐसेंज्ञानियावाहेजीवीं ॥ तरीअखंडैकरसचवी ॥ चाखिलीनाहीं ॥ १९ ॥ अगाअवघेंसांडून ॥ राहिलादरकुटीपडोन ॥ तेकायनव्हेजाण ॥ करणीजाली ॥ २२० ॥ असोत्यापडणयाहीवरी ॥ असेकोण्हीएकुकाळवरी ॥ तितुकियाचाचव्यापारीं ॥ जालासेंतोकीं ॥ २१ ॥ अथवाहाहीनिरोधसोसून ॥ पावलाजैंमरण ॥ तेकायनव्हेजाण ॥ करणीजाली ॥ २२ ॥ ऐसेंनसीजोमेला ॥ तरीजन्माचापांगलागला ॥ जन्मलियासअसेंठेविला ॥ मृत्युहीमागें ॥ २३ ॥ स्मृतिः ॥ जातस्यहिध्रुवोमृत्युर्ध्रुवंजन्ममृतस्यच ॥ इतिभगवद्वचनं ॥ आतांआनंदाच्याडोहीं ॥ देहासीचठावनाहीं ॥ तेथेंजिण्यामरण्याचिकाई ॥ वार्तासाजे ॥ २४ ॥ तेथेंकरणीकींउगेपण ॥ याचीजातीचनाहींजाण ॥ तोआपणयावांचून ॥ कांहींचिनदेखे ॥ २५ ॥ हेंखूणलाधलेनवीण ॥ उगेंचिअसावेंक्रियाशून्य ॥ तरीदोन्हींहीजाण ॥ अंतरलींतेथें ॥ २६ ॥ क्रियाहीनाहींसरली ॥ सुखाचीहीसिराणीजाली ॥ ऐसीचखूणदाविली ॥ असेपुढें ॥ २७ ॥

**प्रत्याहारादिअंगीं ॥ योगेंअंगटेंकिलेंयोगीं ॥**
**तोजालाइयेमार्गीं ॥ दिहाचाचांदु ॥ ३६ ॥**

अगाआत्मसुखींउपविष्टजाला ॥ तैंजालेंपणहीविसरोनगेला ॥ देहाचाअध्यासुसरला ॥ पहिलेंचिज्याचा ॥ २८ ॥ ह्मणोनिक्रियाअथवाउगेपण ॥ हेदेहअध्यासाचीखूण ॥ तयास्वात्मानु

भवींजाण ॥ हेंकैंचेंअसे ॥ २९ ॥ हेकांहींचतेणेंनेणोन ॥ घडोक्रियाअथवाउगेपण ॥ हेखूणलाध लेनवीण ॥ तूष्णींभूतजेजाले ॥ २३० ॥ तेप्रत्याहारादिमेळें ॥ योगाभ्यासाचेनिबळें ॥ तूष्णींभूत बैसले ॥ तेनसरतीयेथें ॥ ३१ ॥ जेवींचंद्रमादिवसागगनीं ॥ उदेलाचिउपयोगुकोण्हीनमानी ॥ तेवींआकर्षिलीअवघीकरणी ॥ योगीजनीं ॥ ३२ ॥ त्याआकर्षणियाच्यापोटीं ॥ असतीकरणी याच्याकोटी ॥ नकरितांचिउठी ॥ कर्तृत्वतेथें ॥ ३३ ॥ अगाआत्मप्रत्ययेंवीण ॥ नव्हिजेकींकर णीहीन ॥ नकरीतंवतंवदुणे ॥ करणीवाढे ॥ ३४ ॥ जरीसांपडेआपलेंवर्म ॥ मगकोठूनउपजेलक र्म ॥ अगानकरणेंहाधर्म ॥ इंद्रियांचाकीं ॥ ३५ ॥ विषयइंद्रिययोगें ॥ नकरणीयांचेनिहीबागे ॥ करावेंचिलागे ॥ इंद्रियवंता ॥ ३६ ॥ अगाविधीतेंसांडूंपाहे ॥ तेंचिअविधिरूपेंकर्महोये ॥ चा लणेंसांडूंजाये ॥ तंवबैसणेंघडे ॥ ३७ ॥ अगाबोलणेंजैंनावडे ॥ तैंमौनातेंतऱ्हींधरणेंघडे ॥ एवंन करणेंजेंआवडे ॥ तेंचिमांडेकर्मत्वें ॥ ३८ ॥ एवंकर्तृत्वस्थिति ॥ ऐसीनव्हेरीति ॥ आणिकांहींसं मति ॥ पुरातनअसती ॥ ३९ ॥ ॥ संमतिः ॥ विषयाविनिवर्ततेनिराहारस्यदेहिनः ॥ रसवर्ज्यं रसोप्यस्यपरंदृष्ट्वानिवर्तते ॥ इतिभगवद्वचनं ॥ ॥ तत्त्वावबोधएवैकःसर्वाशातृणपावकः ॥ प्रो क्तःसमाधिशब्देननतुतूष्णीमवस्थितिः ॥ इतिवासिष्ठे ॥ एवंज्ञानियाप्रवृत्ति ॥ तेसहजचिघडली निवृत्ति ॥ पुढेंहीहेचिस्थित्ति ॥ स्तविलीअसे ॥ २४० ॥

**येथप्रवृत्तिवोहटेजिणें ॥ अश्रुतिसीबाधावणें ॥**
**आतांप्रत्यक्षुखपणें ॥ प्रचारुदिसे ॥ २७ ॥**

ऐसियेप्रतीति ॥ दिसेजऱ्हींदेहाकृति ॥ तऱ्हींनाहींप्रवृत्ति ॥ विषयइंद्रिययोगें ॥ ४१ ॥ अहो देहाचेनिमिशें ॥ व्यापाराचाप्रचारदिसे ॥ परीप्रपंचोन्मुखनसे ॥ योगीराजु ॥ ४२ ॥ ह्मणोनिप्र वृत्तिवीणजिणें ॥ अश्रुतिशीवाधावणें ॥ ह्मणिजेश्रुतिवीणतेणें ॥ गाजिजेनादें ॥ ४३ ॥ आतांन सोनिश्रुतिसंबंधु ॥ अंगेअंगजोनादु ॥ गिळितबोध्यबोधकभेदु ॥ बोधमात्रजो ॥ ४४ ॥ तेथेंजया चेंबोधावणें ॥ ह्मणिजेतेथचिहीजागणें ॥ मगसहजतयाचेंजिणें ॥ प्रवृत्तिवीण ॥ ४५ ॥ एवंप्रत्य क्षुखजाला ॥ आणिनादींनाहींगुंतला ॥ चिन्मयानंदींबुडाला ॥ अलंबेवीण ॥ ४६ ॥ अहोश्रुति वीणनादु ॥ भेदुनिसेवितीविदु ॥ त्याविदाचास्वादु ॥ आपणचिजाले ॥ ४७ ॥ तेथेंभोग्यभोक्तृ त्वगळालें ॥ ह्मणोनस्वादासीहीविसरले ॥ वर्ततांचिमग्नआनंदींजालें ॥ श्रुतिवीण ॥ ४८ ॥ प हाताअंतरखूण ॥ द्वैतनाहींहेंचिनिपटून ॥ दिसतेंहेंवाचारंभण ॥ बाह्यदृष्टी ॥ ४९ ॥ ह्मणोनद्वै तहेंआंगण ॥ परितत्त्वविदहेंनेणतीजाण ॥ त्याचेदृष्टिपूर्ण ॥ अद्वैतचितें ॥ २५० ॥ त्याचीवर्तती स्थिति ॥ तेमग्नतेचीचसंपत्ति ॥ पुढेंहीमागुती ॥ ऐसेंचबोले ॥ ५१ ॥

**द्वैतदर्शेचेंआंगण ॥ अद्वैतवोळगेंआपण ॥**
**भेदतंवतंवदुण ॥ अभेदासी ॥ २८ ॥**

अगालाधलियास्वानुभवखूण ॥ हेंजेंकांहींद्वैतभान ॥ तेंअद्वैतचिआपण ॥ आंतलेंअसे ॥ ५२ ॥ एवंअद्वैताचेदृष्टी ॥ देखिजेनाहेद्वैतसृष्टी ॥ ह्मणोननिरोधाचीगोष्टी ॥ मोडोनगेली ॥ ५३ ॥ दि सेद्वैताचाछंदु ॥ परीकसींउमटेअभेदु ॥ एवंदेहाकृतितत्त्वविदु ॥ झांकवेना ॥ ५४ ॥ अहोआप लियेचिविलासें ॥ याभेदाचेहीमिशें ॥ नमोडूनमांडलाअसे ॥ अभेदुचिस्वता ॥ ५५ ॥ पाहतां अंतर्खूण ॥ द्वैतनाहींचहेंनिपटून ॥ आतांद्वैतहेंवाचारंभण ॥ बाह्यदृष्टी ॥ ५६ ॥ ह्मणोनद्वैतहेंआं

गण ॥ परीतत्वविदहेंनेणतीचिजाण ॥ त्यांचेदृष्टीपूर्ण ॥ अद्वैतचि ॥ ५७ ॥ जंवजंवउमटेभेदु ॥ तंवतंवदुणावेअभेदु ॥ ह्मणिजेभेदाचेछंदेंस्वादु ॥ आपलाचिलाहे ॥ ५८ ॥ अहोअभेदआयिता स्वभावें ॥ परीभेदेंसंधीदुणावे ॥ विवरणासीपावे ॥ अवसरुअधीक ॥ ५९ ॥ जेवींजंवजंवपडे इंधन ॥ तंवतंववाढेहुताशन ॥ किंवाजंवजंवफांकेकीर्ण ॥ तंवतंवचंद्रमाचिउजळे ॥ २६० ॥ तेवींआत्मविदासीजाण ॥ जंवजंवभेदभासमान ॥ तंवतंवआत्मदर्शन ॥ दुणावतजाये ॥ ६१ ॥ एवंआत्मविदासीजाण ॥ कायसेंक्रियाउगेपण ॥ स्वभावेंसमाचरण ॥ तेंचिनिकें ॥ ६२ ॥ अहोयेणेंआपल्याठाईं ॥ दुजेंदेखिलेंचिनाहीं ॥ असोक्रियाप्रवाहीं ॥ किंवाउगाचिअसे ॥ ६३ क्रियाअथवाउगेपण ॥ हेंदेहसंबंधींभान ॥ तरीदेहभानचीआण ॥ पडलीतयासी ॥ ६४ ॥ याचिन्मयानंदडोहीं ॥ यादेहासीचठावनाहीं ॥ तेथेंउगेपणतेंकाई ॥ आणिव्यापारुतोकवणु ॥ ६५ ॥ आतांनावेकभासाचीउजरी ॥ तेंतेथिलचअसेलहरी ॥ तेंआपलियेकुसरी ॥ भलतैसीअसे ॥ ६६ ॥ अहोचिन्मात्राचारावो ॥ घालोनिनिशाणाघावो ॥ लाहोनिसावावो ॥ विहाळीरिघे ॥ ६७ ॥ अथवाअंतःपुरामाझारीं ॥ स्वसुखाचासेजारीं ॥ सुतलासेहेकांहींजरी ॥ यथार्थअसतें ॥ ६८ ॥ तरीविहारासेजागतें ॥ साचपणकांहींयेतें ॥ तेवींक्रियाउगेपणातें ॥ आत्मविदनेणे ॥ ६९ ॥ परीठसापडलाजैसा ॥ तोनावेकदिसेतैसा ॥ परीआत्मविदसहसा ॥ पालटुनेघे २७० तोविषयांचेहीस्वभावीं ॥ नसंडीकींआत्मचवी ॥ मूळग्रंथींचीहीओवी ॥ ऐसीचआयिका॥७१॥

**कैवल्याहीचढावा ॥ करितिविषयसेवा ॥**
**जालाभृत्युभज्यकालोवा ॥ भक्तिचाघरीं ॥ २९ ॥**

तोभलतैसाभलतियेवेळे ॥ भोगीआत्मसुखाचेसोहळे ॥ विषयसेवनींनमैळे ॥ प्रतीतजयाची ॥७२॥ अगाशब्दस्पर्शरूपरसगंध ॥ येणेंनव्हेहापंचविध ॥ अवधियाचास्वाद ॥ एकचिलागे ७३ अगाविषईंनेघेविषयरस ॥ तरीविषयचिकांनव्हेचिद्रस ॥ कैवल्यकायतयास ॥ दुजेंआथी॥७४॥ अहोकैवल्यह्मणिजेऐसेंजाण ॥ जेंआपलेनेचितृप्तआपण ॥ जेंसर्वदाआपेक्षाहीन ॥ आनंदरूप ॥ ७५ ॥ त्याकैवल्याचीप्राप्ति ॥ तेंक्षुधेसीबोळविलीतृप्ति ॥ ह्मणोनविषयांच्याठाईंरति ॥ विषयत्वेंनेघे ॥ ७६ ॥ नानाविषईंनानारस ॥ ज्ञानीनातळेत्यारसास ॥ सकळरसांचाजोरस ॥ आतुडलाज्यासी ॥७७॥ त्याच्याप्रवाहाआडपडे ॥ तेएकीआवडीआवडे ॥ त्यासीकैवल्याहूनिगाढे ॥ तेंचिहोये ॥ ७८ ॥ अगाविषयांचेसेवनीं ॥ विकारुचित्तुटीमनीं ॥ तरीकैवल्याहूनि ॥ तेंचिनीकें ॥ ७९ ॥ कैवल्याहीचढावा ॥ करितीविषयांचीसेवा ॥ बोलिलासेतोभावबरवा ॥ ऐसाअसेकीं ॥ २८० ॥ देहाचियेआकृति ॥ प्रवाहींपाडिलीजेरीति ॥ परीआत्मविदनढळती ॥ आत्मसुखींहूनि ॥ ८१ ॥ विषयांचियाउजरी ॥ ज्ञानियानव्हेविकारी ॥ कैवल्यासरी ॥ विषईंत्वयासी ॥८२ अगात्रिपुटीचेंस्फुरण ॥ तेंविषईंस्फुरेविषयपण ॥ आतांत्रिपुटीचजालीक्षीण ॥ तेंविषयकिमात्मक ॥ ८३ ॥ ह्मणोनिइहींबोलीं ॥ ज्ञानियाचीस्थितिस्त्तविली ॥ वांचोनिकैवल्याचियाखोली ॥ विषयीचकेंचें ॥८४॥ ह्मणोनिज्ञानियासीकांहीं ॥ त्रिपुटीचेंभाननाहीं ॥ यालागींविषयाच्याठायीं ॥ विषईनव्हेकीं ॥ ८५ ॥ अहोदेहाचिआकारें ॥ देहचिअसेविषयाकारें ॥ तरीयादेहव्याजेंनावरे ॥ कैवल्यसुख ॥ ८६ ॥ असोक्षुधापिपासादिहरण ॥ करावयाकीजेभिक्षाटण ॥ अथवाकोण्हीएकवेव्हारजाण ॥ संपादिजेजो ॥ ८७ ॥ तोविषयाचेरीतिपाहें ॥ तरीतोचिविषयहोऊनिआडठाये ॥ आतांज्ञानियायेथेंनहोये ॥ विषयीआपण ॥ ८८ ॥ ह्मणोनभजतांहीविषयांसी ॥ भज्य

भजकतापडलीग्रासी ॥ येथेंभक्तचिभक्तीसी ॥ भजतसेकीं ॥८९॥ अगाभक्तिह्मणिजेआवडी ॥ येथेंभज्यभजकदुथडी ॥ तुटोनदिधलीबुडी ॥ आपणाचिमाजीं ॥२९०॥ अथवाविषयसेवा नसे ॥ तरीआपणासीआपणभजतुसे ॥ परंतुभक्तिमात्रविलासे ॥ भृत्युभजनेंवीण ॥९१॥ आतांआवडीचपांगुळली ॥ तेथेंविषयवार्ताटवाळजाली ॥ कैवल्यताथोकली ॥ सहजचितेथें ॥९२॥ अगाकैवल्यह्मणिजेमोक्ष ॥ तरीबद्धतेचाहापक्ष ॥ येऱ्हवींआत्माअपरोक्ष ॥ नित्यमुक्त कीं ॥९३॥ ह्मणोनआत्मानुभवाठाईं ॥ बद्धतेसीमोक्षनाहीं ॥ हाआपलाआपणपाहीं ॥ उभयातीत ॥९४॥ हाकैवल्याहीचढाव ॥ शुद्धबुद्धमुक्तस्वभाव ॥ आपणेवीणदुजाठाव ॥ येथेंकैंचा ॥९५॥ ह्मणोनत्याज्यग्रहणेवीण ॥ सिद्धस्वभावानुसारजाण ॥ असेआक्रोशहीन ॥ योगिराजु ॥९६॥ तेंचिकरावयादृढीकरण ॥ आत्मविदांचेंलक्षण ॥ पुढेंहेंचिनिरूपण ॥ अवधारीजोजी ॥९७॥

**घरामाजींपायें ॥ चालितांमार्गुहीतोचिहोये ॥**
**नाबैसेतरीआहे ॥ पावणेंचि ॥ ३० ॥**

घरामध्येंपादचळणकरणें ॥ तेंचिघडलेंमार्गक्रमणें ॥ किंवाबैसलातेंचिपावणें ॥ मार्गप्रांतातें ॥९८॥ कांजेपायाचीक्रियानचुके ॥ पृथ्वीतळहेंतेंचिअसके ॥ ह्मणोनिबैसकेसारिखें ॥ चालणें जालें ॥९९॥ असोआपलेपूर्णपणीं ॥ सरलीदेशकाळादिकाहाणी ॥ ह्मणोनआक्रोशह्मणी ॥ आठवेयया ॥३००॥ असोबैसकआणिचालतीदशा ॥ तत्वविदुदोहींसीसरसा ॥ बैसकेचिऐसा ॥ चालतुअसे ॥१॥ तोचालतांवेगींनपडे ॥ किंवाबैसतांपैसनाआखुडे ॥ तोजेणेंतेणेंपाडें ॥ निश्चळअसे ॥२॥ ह्मणोनदावितसेक्रियाभास ॥ ज्ञानियानदेखेकर्तव्यअंश ॥ येविषईंनिरूपण दंश ॥ मूळग्रंथींचा ॥३॥

**तैसेंभलतेंकरितां ॥ येथेंपाविजेकांहींआतां ॥**
**ऐसेंनाहींनकरितां ॥ ठाकिजेना ॥ ३१ ॥**

तैसेंचिभलतेप्रवाहीं ॥ करणीसीसेवटनाहीं ॥ कांहींकेलियापाहीं ॥ पावणेंनसे ॥४॥ कर्मीं नदेखेफळितार्थु ॥ नसोनकर्तृत्वाचाहेतु ॥ क्रियाप्रवाहप्रतीतु ॥ होतचिअसे ॥५॥ अमुकव्यवहारकरीन ॥ अमुकेंकार्यसाधीन ॥ हेंकांहींचनसोन ॥ उगाचिवर्ते ॥६॥ किंवाक्रियादेखोन गौण ॥ धरिजेयेणेंउगेपण ॥ ज्ञानियाऐसेंनजाण ॥ उगाचिनठाके ॥७॥ एवंनदेखतुक्रियाफळातें ॥ ज्ञानीपतितप्रवाहेंवर्ते ॥ किंवाउगाचिठाकतांकुंठितें ॥ तेंतेंपावणेंनाहीं ॥८॥ तोजियात यापरी ॥ असेआत्मसुखाचिभीतरीं ॥ तयासीदुसरीयेघरीं ॥ जाणेंचिनाहीं ॥९॥ पुढेंऐसेंचि निरूपण ॥ बोलिलादशाअसाधारण ॥ परिसावेंसावधान ॥ कृपाकरूनि ॥३१०॥

**आठउआणिविसरु ॥ तयातेंहीघेऊंनेदीपसरु ॥**
**दशेचावेव्हारु ॥ असाधारणु ॥ ३२ ॥**

येणेंविसरोनिजेंकांहींकेलें ॥ तेंयाचिपसरेंगिळिलें ॥ एवंविसराचियेवेळे ॥ पसरुचिअसे ११
अगाआत्मसुखाचियासुरवाडें ॥ विसरतांविसरींनपडे ॥ आठवतांहीनघडे ॥ आठउतयातें १२
एवंआठवाविसराहून ॥ दशाबाणलीअसाधरण ॥ तेंआठवेंविसरेंकरून ॥ कुंठितनव्हे ॥१३॥
ह्मणोनइयेदशेचावेव्हारु ॥ नसंडेआपलापसरु ॥ विसरतांविसरु ॥ देखिजेनायेणें ॥१४॥ यं

णेंविसरोनजेंजाणावें ॥ तरीजाणणेंचिहास्वभावें ॥ एवंयाचापैसिसामावे ॥ विसरेंसीआठउ ॥ १५ ॥ विसरोनअन्यथाव्हावें ॥ हेंसाचाठाईंनसंभवे ॥ असोनिआपलेस्वभावें ॥ भलतैसा १६ तेद्शाअसाधारण ॥ करणीनव्हेनाउगेपण ॥ कोण्हीएकवर्मजाण ॥ अक्रत्रिम ॥ १७ ॥

## जालीस्वेच्छाचिविधि ॥ स्वैरजालासमाधी ॥
## दशेयेमोक्षऋद्धि ॥ बैसोंघापें ॥३३॥

अगाहाआत्मविदनरु ॥ नहोनिविधिचाकिंकरु ॥ स्वेच्छायथाचारु ॥ वर्ततुअसे ॥ १८ ॥ हा करीतोचिविधिजाला ॥ वर्ततांचिसमाधिजोडला ॥ मोक्षहीराहिला ॥ वायिलायेथें ॥ १९ ॥ लाधलीआत्मानुभवखूण ॥ तेणेंआत्मरूपचिअवघेंपूर्ण ॥ आतांयेथेंपराधीनपण ॥ कैंचेंआलें ॥ ३२० ॥ ह्मणोनिस्वेच्छाचियेणेंवर्तिजे ॥ तेंविधिहोऊनिआपजे ॥ यालागींयेणेंआचरिजे ॥ तो चिविधि ॥ २१ ॥ ॥ संमतिः ॥ शिवरूपतयासर्वयस्यभातिस्वभावतः ॥ स्वेच्छाचारसमाचारंत स्यसार्चाचशूलिनः ॥ इतिसूतसंहितायां ॥ ॥ एवंशिवानुभवेंजाण ॥ शिवचिअसेपरिपूर्ण ॥ तेथेंअन्यथाभान ॥ तुटोनचिगेलें ॥ २२ ॥ तोहर्षविषादाअतीत ॥ कर्तव्याभिमानरहित ॥ करी आतांयेथ ॥ अविधितोकाई ॥२३॥ अहोविधीचाहाद्योतक ॥ ह्मणोनविधीचानव्हेपायिक ॥ आ तांयाचीस्वभावेंवर्तणुक ॥ तोचिविधि ॥ २४ ॥ यापासूनस्वभावेंघडे ॥ तेकांहींचिअविधिन पडे ॥ वर्ततांविधिसांगडें ॥ परीविधीचानव्हे ॥२५॥ ॥ संमतिः ॥ द्वेषबुध्योभयातीतोनिषेधा न्ननिवर्तते ॥ गुणबुध्याचविहितंनकरोतियथार्भकः ॥ ॥ ॥ ह्मणोनविधिनव्हेनाअविधि ॥ स रळदशाहेंचिसमाधि ॥ आतांइयेदशेमोक्षऋद्धि ॥ ह्मणिजेऐसें ॥२६॥ हाकाळत्रयींअविच्छिन्न॥ येथेंकैंचेंहोतेंबंधन ॥ आतांमोक्षहाशब्दजाण ॥ बंधाचिसारिखा ॥ २७ ॥ ह्मणोनहेदशाअगाध ॥ येथेंमोक्षहीहोयअवरोध ॥ हासरळसच्चिदानंद ॥ येथेंमोक्षनमिरवे ॥२८॥ हाभक्तनव्हेनादेवो ॥ ऐसाकोणीएकठावो ॥ जेथेंआत्मानुभवो ॥ लाधलाऐसा ॥ २९ ॥ एवंलाधतांआत्मानुभवखूण ॥ संकोचचिगेलातुटोन ॥ ऐसेंचिकांहींनिरूपण ॥ पुढेंहीबोले ॥ ३३० ॥

## जालादेवोचिभक्तु ॥ ठावोचिजालापंथु ॥
## होऊनठेलाएकांतु ॥ विश्वचिहें ॥ ३४ ॥

भक्तासीजोप्रत्ययो ॥ तोचिअंगेंआपणदेवो ॥ आणिभक्तपणाचानिर्वाहो ॥ प्रत्ययमात्रचि ॥ ३१ ॥ त्याप्रत्ययाचास्वाद ॥ प्रत्ययोचिलाहेविशद ॥ नानाडुणावेआनंद ॥ आपेआप ॥ ३२ ॥ नातरीआनंदाचाठावो ॥ तोआपलाचिकींअनुभवो ॥ आतांयाहूनिकायदेवो ॥ आनआहे ॥३३॥ नातरीआपणआपणाआवडे ॥ तेंदिसेदेवभक्तपणाचेनिपाडें ॥ ह्मणोनिभक्तासीचिहोणेंघडे ॥ स्वयेंदेवो ॥ ३४ ॥ आतांभेदतंवतुटलापाहीं ॥ आणिआवडीसतुटीनाहीं ॥ ह्मणोनभक्तदेवाच्या ठाईं ॥ आपणभजे ॥ ३५ ॥ किंबहुनाउपरोधसरोनिगेला ॥ आणिगोडीचाहीसुकाळजाला ॥ आपणआतला ॥ भक्तचिदेवो ॥ ३६ ॥ आतांऐसेंजेंदेवपण ॥ तेंचिकींभक्तांचीबैसकास्थान ॥ यालागींमार्गक्रमिलेंनवीण ॥ पावलेठावो ॥ ३७ ॥ ह्मणोनठावोचिजालापंथ ॥ तुटलाचालिबैस केचाहेत ॥ हेंविश्वचिएकांत ॥ होऊनिठेला ॥ ३८ ॥ विश्वाकडेपाहातांकांहीं ॥ आपणेंवीणडु जेंनाहीं ॥ यालागींसहजचिपाहीं ॥ एकांतअसे ॥ ३९ ॥ अगाजालयाआत्मानुभव ॥ विश्वास चिनाहींठाव ॥ ह्मणोनपैंशून्यतावाव ॥ सहजचिजाली ॥ ३४० ॥ आतांहेंकांहींअळुमाळभान ॥

तेंआपुलेंस्वात्मैकज्ञान ॥ त्याज्ञानींनिपटून ॥ ज्ञेयभागनाहीं ॥४१॥ तेंज्ञानाज्ञानविहीन ॥ केवळद्ध ज्ञात्रद्रष्टेपण ॥ त्याचेंनिअनुभवेंजाण ॥ तेंचिजालें ॥४२॥ तेथेंलोकांतनाएकांतु ॥ तुटलाआपपर तेचाहेतु ॥ यालागींविश्वचिएकांतु ॥ सहजचिजाला ॥ ४३ ॥ जेवींमृगांभभानजेंकांहीं ॥ सूर्यासीदुसरेंनाहीं ॥ तेवींविश्वेंसीपाहीं ॥ एकांतुजाला ॥४४॥ जेवींरज्जूच्याअंगींउरग ॥ नव्हेचिरज्जूसतयाचासंग ॥ तेवींआपलेअंगींजग ॥ लोकांतनव्हे ॥ ४५ ॥ किंवाखांबींजालेंपुरुषभान ॥ तोखांबासीनव्हेपैपिशुन ॥ तेवींविश्वचिहेंजाण ॥ एकांतजाला ॥४६॥ असोऐसीलाधतांखूण ॥ सरोनगेलेंभेदभान ॥ ह्मणोनिविश्वचहेंजाण ॥ एकांतजाला ॥ ४७ ॥ एवंनसोनिविश्वपणाचा हेतु ॥ विश्वचिजालाएकांतु ॥ कींभक्तपणेंवीणभक्तु ॥ देवोचिजाला ॥ ४८ ॥ किंवापावावया प्रांतु ॥ धरावाकोण्हीएकपंथु ॥ तंवथिताडुऱ्हावतु ॥ जवळिचअसोनि ॥ ४९ ॥ तोआपलाठावसांपडे ॥ तैंठाईंचिपंथुमुरडे ॥ नचालतांचिजोडे ॥ पंथाप्रांतु ॥३५०॥ ह्मणोनपंथप्रांततुटोन ॥ मोडलीदेवभक्तपणखूण ॥ आतांजेंकांहींभजन ॥ तेंआपेंआप ॥ ५१ ॥ कांजेंआपआपणासीवाल्हें ॥ हेंतंवनाहींउगवलें ॥ ह्मणोनभेदेंवीणचालिलें ॥ भजनकांहीं ॥ ५२ ॥ इयेविषईचेंनिरूपण ॥ दाविलीअभेदाचीखूण ॥ लाहूनसंतांचेंअवधान ॥ बोलिजैलपुढां ॥ ५३ ॥

**भलतेंउतेनिदेवें ॥ भलतेनभक्तहोआवें ॥**
**बैसलातेथेंराणीवें ॥ अकर्मुहा ॥ ३५ ॥**

अगादेवाचियेपूर्णत्वींपाहीं ॥ देवपणासीनिर्देशनाहीं ॥ आतांआवडीच्याप्रवाहीं ॥ निर्देशउमटे ॥ ५४ ॥ तेथेंजेथूनउमटेदेवपण ॥ तोठावचिदेवजाण ॥ उठलेंतेंभक्तपण ॥ सुखेंचिघडो॥५५ अथवादेवपणेंजेंस्फुरण ॥ तेंस्फुरणचिघडोदेवपण ॥ आणिस्फुरताठावोजाण ॥ भक्तपणेंमांडो ॥ ५६ ॥ ह्मणोनभलतेंउतेनदेवें ॥ ह्मणिजेभक्तेंचिदेवोहोआवें ॥ आणिदेवेंचिअंगीकारावें ॥ भक्तत्वस्वयें ॥५७॥ असोनसोनिदेवभक्तपण ॥ कांहींएकप्रेमाजोजाण ॥ ह्मणोनिउमटलेंसेभजन॥ देवभक्तत्वें ॥ ५८ ॥ येथेंदेवेंदेवासीभजोनि ॥ स्वयेंभक्तत्वअंगिकारोनि ॥ चालवावीवेल्हावणी॥ भजनमार्गाची ॥ ५९ ॥ किंवाभक्तेंआपलेंभक्तपण ॥ देवत्वेंविलासूनजाण ॥ आपणभराडाहोऊन ॥ भजतसेकीं ॥ ३६० ॥ एवंआवडीसीहानीनाहीं ॥ तेविलासेंसीदोठाईं ॥ नहोनिनांदवीपाहीं ॥ देवभक्तपणऐसें ॥ ६१ ॥ ह्मणोनभलतैसेंअसोन ॥ संपादुभलतैसेंभजन ॥ परीआपलीराणीवनसंडोन ॥ अकर्मुचिहा ॥ ६२ ॥ निजकर्माचेंसुरवाडे ॥ अकर्माचिरेखानमोडे ॥ स्वसाम्राज्येंपहुडे ॥ स्वात्मशय्येसी ॥ ६३ ॥ इयाजनाचेनिपाडें ॥ शांतमुद्रानमोडे ॥ ऐक्यमुद्रेचीनविघडे ॥ राणीवकधीं ॥ ६४ ॥ आतांऐसीजेराणीव ॥ तोपूर्णात्मापरदेव॥ तेथेंआणिकांसीठाव॥ होयेचिनाकीं ॥६५॥ ऐसेंहेंसमाधान ॥ ज्ञानियाचीजेखूण ॥ तियेविषींचेंनिरूप ॥ पुढेंहीबोले६६

**देवाचियादाटणी ॥ देउळाजालीआटणी ॥**
**देशकाळादिवाहाणी ॥ येईचना ॥ ३६ ॥**

अवघादाटलादेवो ॥ तेथेंदेउळाकैंचाठावो ॥ देशकाळादिप्रभवो ॥ कैंचातेथें ॥ ६७ ॥ अगाअनुभवलियादेवपण ॥ देवोचिभरलासंपूर्ण ॥ त्याअनुभवींमोडलीखूण ॥ अनुभवाचीही ॥६८॥ अहोअनुभवाच्याराउळीं ॥ जालीदेवाचीदिवाळी ॥ त्यादेवाचिमाजींबुडाली ॥ देउळाचीखूण ॥ ६९ ॥ किंवाह्रदिस्थजेंप्रकटला ॥ तेंह्रदयासीचअवगमजाला ॥ असोसंकेतचिमोडला ॥ या

चराचराचा ॥ ३७० ॥ तेंजेंसंपूर्णदेवपण ॥ देशकाळादिपरिच्छेदविहीन ॥ देवोचिदेवींजाण ॥ दाटलाजेव्हां ॥ ७१ ॥ अहोविकारेंवीण ॥ चिन्मात्रसर्वदापूर्ण ॥ आतांयेथेंकोठून ॥ देशकाळादिजालें ॥ ७२ ॥ यालागींदेशकाळादिवाहाणीं ॥ चिन्मात्रींयेवोंसकेझणी ॥ कांजेंतियेरूपीं निपटूनि ॥ दुसरेंचिनाहीं ॥ ७३ ॥ ह्मणोनिदेवभक्तपणेंवीण ॥ देवोचिदाटलासंपूर्ण ॥ ऐसेंकांहींनिरूपण ॥ पुढेंहीबोलें ॥ ७४ ॥

देवींदेवोचिनमाये ॥ मादेवीकेअन्वयोआहे ॥
तेथपरिवारुबहुयें ॥ अघडताकीं ॥ ३७ ॥

अहोदेवाचेपूर्णत्वींजाण ॥ देवासीचनाहींदेवपण ॥ कांजेनामरूपाचीखूण ॥ तेथेंनाहीं ॥ ७५ ॥ अगानामरूपाविहीन ॥ तियेवस्तूसीकैंचेंवस्तुपण ॥ नानाअन्यसंबंधेंवीण ॥ कौंदाटिलीवस्तु ॥ ७६ ॥ असोदेवपुरोनठावउरता ॥ तरीभक्तपणासीहीअन्वयोहोता ॥ नानादेवाचिपुरता ॥ देवोनाहीं ॥ ७७ ॥ कांजेदेवाचियेनिबिडपणीं ॥ नशिरेदेवपणाचीमिरवणी ॥ ह्मणोनिनसमाय देवपणीं ॥ देवपणचिथितें ॥ ७८ ॥ तेथेंदेविकासीअन्वयोकोण ॥ निखळढळढळितदेवपण ॥ आणिनानाउपकरण ॥ परिवारकैंचा ॥ ७९ ॥ एवंनिखळेंचिन्मात्रींचिपाही ॥ भक्तेसीपरिवार नाहीं ॥ ऐसियानसीकांहीं ॥ पुरविजेकोड ॥ ३८० ॥ तरीऐक्यासीनुलंघोन ॥ करावीअवघीसंपादन ॥ येविषईंनिरूपण ॥ पुढेंहीबोले ॥ ८१ ॥

ऐसाहीस्वामीभृत्यसंबंधा ॥ लागींउठतीश्रद्धा ॥
तैंदेवोचिनुसुधा ॥ कामविजे ॥ ३८ ॥

अगादेवाचियेनिबिडता ॥ ठावनाहींदेवभक्ता ॥ तेथेंसहजचिअघडता ॥ परिवारजाला ॥ ८२ ॥ आतांभेदकांहींनसोन ॥ स्वसंवेद्यमुळींचीखूण ॥ हेतंवकथींचिजाण ॥ लोपातेंनपवे ॥ ८३ ॥ ह्मणोनिआनंदासीआनंदु ॥ स्वामिभृत्युसंबंधु ॥ लाऊनरिघिजेसाधु ॥ भजनप्रकारु ॥ ८४ ॥ तरीएकलेंनिदेवें ॥ नावेकतैसेंचिनटावें ॥ देवभक्तआणिबहुवे ॥ भजनविधि ॥ ८५ ॥ अगाआप आपणाआवडे ॥ हेंदिसेभेदासांगडें ॥ तेवींभक्तीचेंनिसुरवाडें ॥ भजनविधि ॥ ८६ ॥ जेवींआपलेनिभरें ॥ कल्लोळहोयिजेसागरें ॥ तेवींदेवपणचिवावरे ॥ भजनपाडें ॥ ८७ ॥ एवंज्ञानियाच्याठाईं ॥ भेदाचाउगउच्चिनाहीं ॥ आपलीयेसुखप्रवाहीं ॥ भजतुचअसे ॥ ८८ ॥ चिन्मात्रतानविकरोन ॥ आपुलेविलासेंकरून ॥ भज्यभजकताभजन ॥ घडतसेकीं ॥ ८९ ॥ येणेंअनुभवेंपाहीं ॥ ज्ञानियाच्याठाईं ॥ ऐक्यतेचीयाडोहीं ॥ भजनलहरिया ॥ ३९० ॥ येविषईंनिरूपण ॥ पुढेंहीअसेगहन ॥ तेंआतांसविवरण ॥ सांगिजैलऐका ॥ ९१ ॥

अवघयाउपचारा ॥ जपध्याननिर्धारा ॥
नाहींआनसंसारा ॥ देवेवीण ॥ ३९ ॥

अगाभजनाचेउपचार ॥ जपध्याननिर्धार ॥ उपपादूनिआचार ॥ वर्णाश्रमयुक्त ॥ ९२ ॥ श्रवणमनननिदिध्यासन ॥ आणिसर्वदानामसंकीर्तन ॥ सबाह्यअभ्यंतरपूजन ॥ श्रीगुरुपादपद्म ॥ ९३ ॥ ऐसाजोकांहींस्वभावो ॥ ज्ञानियाच्याठाईंनिर्वाहो ॥ येथेंऐक्यतेचाअनुभवो ॥ विकरलानाहीं ॥ ९४ ॥ इत्यादिधर्मप्रवाहीं ॥ देवावांचूनिआननाहीं ॥ ऐसीदेवाच्याठाईं ॥ भजनसिद्धि ॥ ९५ ॥ ऐसेंदेवातेंचिदेवें ॥ देवपणेंभजकव्हावें ॥ इयेविषयींबरवें ॥ आणीकवचन ॥ ९६ ॥

**आतांदेवातेंचिदेवें ॥ देववरीभजावें ॥**
**अर्पणाचेनिनावें ॥ भलतिया ॥ ४० ॥**

अगावस्तूसीनाहींदुसरें ॥ तरीवस्तुचिहेंअवघेंखरें ॥ स्फुरणमात्रस्फुरे ॥ ऐसियास्फूर्ति ९७ देवपणेंस्फुरावें ॥ भक्तहीतेणेंचिहोआवें ॥ उपचाराचेनिनांवें ॥ आपणचिहोइजे ॥ ९८ ॥ आपणानहोनिखंडण ॥ संपादेजरीभजन ॥ तरीभजतांकायआन ॥ होआवेंलागे ॥९९॥ नचुकेआपलापाड ॥ तरीभजतांकायआड ॥ नभजोनियांनिचाड ॥ कासयाव्हावें ॥४००॥ अगानमोडूननिश्चळता ॥ पंथुहोयजरीचालतां ॥ तरीसंकोचामाजींपडतां ॥ विशेषकाई ॥ १ ॥ अगाआपलेनिस्वभावें ॥ देवत्वआपणींफावे ॥ तरीभक्तहीकांनव्हावें ॥ आपणचितेव्हां ॥ २ ॥ एवंभजतांनाअभिभवे ॥ नभजतांनाविशेषवें ॥ नभजावेंकांभजावें ॥ आपणानचुकोन ॥ ३ ॥ अगाहेंअंतरींचीखूण ॥ जाणतीअनुभवीजन ॥ पुढेंहीनिरूपण ॥ ऐसेंचिअसे ॥ ४ ॥

**देवदेउळपरिवारु ॥ कीजेकोरूनिडोंगरु ॥**
**तैसाभक्तीचावेव्हारु ॥ कांनव्हावा ॥ ४१ ॥**

देवदेउळादिप्रवाहीं ॥ पर्वततितुकेजालानाहीं ॥ आणिआवडीचेंकांहीं ॥ नपुरवीचिकोड ५ अगासगळाचिपर्वत ॥ कोरिजेदेवदेवालयसमस्त ॥ तेवींसंपादतांभजनजात ॥ सगळीचिवस्तु ॥ ६ ॥ अहोअनुवाचीखूण ॥ अनुभउचिवस्तुपूर्ण ॥ तोअनुभउमात्रचिजाण ॥ भजनवेव्हारू ॥ ७ ॥ चिन्मात्राचियासत्ता ॥ चिन्मात्रयेऊनिभजनपंथा ॥ भक्तिवेव्हारुचालितां ॥ तेणेंचिहोय ॥ ८ ॥ अगाहुताशनाचेंवदन ॥ स्वताचिहोऊनिहुताशन ॥ ज्वाळींकरीशोभायमान ॥ आपणचिहोये ॥ ९ ॥ तेवींआपलाआपण ॥ आनंदुचिआनंदायमान ॥ होतांकायआन ॥ संबंधलागे ॥४१०॥ आतांभजावेंकांनभजावें ॥ आपणयाचुकीनजावें ॥ तरीनभजतांहीस्वभावें ॥ भजनचिवाढे ॥ ११ ॥

**अहोमुगींमृगमात्रजैसें ॥ घेतांनघेतांनवलनसे ॥**
**केलेंदेवपणेंतैसें ॥ दोहींपरी ॥ ४२ ॥**

अगामुगींमात्राचापाहीं ॥ सांडितांनसांडितांकांहीं ॥ हानिलाभनाहीं ॥ तैसेंजालें ॥ १२ ॥ अहोभजतांकांहींनतुटे ॥ नानाभजतांएकवाटे ॥ तरीसंकलपाचियावाटे ॥ कासयाजावें ॥ १३ ॥ संकलपावाइलेंअसोन ॥ नमोडोनियास्वभावाचीखूण ॥ त्यास्वभावेंघडोभजन ॥ कींनभजोहीसुखें ॥ १४ ॥ अगास्वरूपींचीस्वसंवेद्यखूण ॥ तेंचितेथीलभजन ॥ त्याखुणेंसीकायआन ॥ होइलआतां ॥ १५ ॥ त्यास्वभावासीखंडण ॥ करूनिकीजेमावेचेंपूजन ॥ तरीस्वरूपकायआपण ॥ अपूज्यअसे ॥ १६ ॥ पूजावयानपूजावयाचेमिशें ॥ देवपणचिअसेसरिसें ॥ तेंयादोहींभावांचियेभडसें ॥ पडलेंचिनाहीं ॥ १७ ॥ तेंभजतांकांनभजतां ॥ पूजिलेंचिअसेनपूजितां ॥ इयेविषयींमागुतां ॥ ऐसेंचिबोले ॥ १८ ॥

**अखतांचीदेवता ॥ अखतींचिअसेनपूजितां ॥**
**माआखतींकायआतां ॥ पुजोंजावी ॥ ४३ ॥**

तांदुळींदेवोरेखिला ॥ तोतांदुळींकरीचपूजिला ॥ नपूजिजेतरीकायजाला ॥ अपूज्यदेवो

॥ १९ ॥ अखतींकरींपूजावें ॥ तेंतंवत्याचेअंगींअघवें ॥ नपूजिजेतरीस्वभावें ॥ पूजिलाचिअसे ॥४२०॥ किंवापूजितांहींअन्यथानव्हे ॥ देवपणहीनदुणावे ॥ आतांयथास्वभावेंपूजावें ॥ कींनपूजावें ॥ २१ ॥ तेवींपूजनाचास्वभावो ॥ तोचिनिखळदैविकींभावो ॥ तरीभावमात्रींचिदेवो ॥ आणिभावेंचिभजावें ॥२२॥ भावनव्हेतेंचिन्मात्रखूण ॥ तेथीलतेथेंचिदेवपण ॥ आणितेथींचेंपूजन ॥ तेथेंचिअसे ॥ २३ ॥ तेथेंजरीनसेपूजन ॥ तरीपूजकासीप्रकाशीकोण ॥ एवंतेंचिआपणाआपण ॥ पूजितेंअसे ॥ २४ ॥ तेंपूजितांनपूजितां ॥ कधींचनव्हेअन्यथा ॥ स्वभावाचियाउचिता ॥ असोनियां ॥ २५ ॥

**दीप्तीचींलुगडीं ॥ दीपकळिकेतूंवेढी ॥ हेंनह्मणतांतेंउघडीं ॥**
**ठाकेकाई ॥ ४४ ॥ कांचंद्रातेंचंद्रिका ॥ नह्मणिजेतूंलेका ॥**
**तऱ्हींतोअसिका ॥ तियाचिकींना ॥ ४५ ॥**

दीपासीऐसेंनह्मणिजे ॥ जेंतुवांप्रकाशपरिधानकीजे ॥ तरीतेणेंकायअसिजे ॥ प्रकाशहीन ॥ २६ ॥ कींचंद्रेंचांदिणेंपरिधानकेलें ॥ तेंकायअणीकांचियाबोलें ॥ कोण्हेंजरीनह्मणितलें ॥ तरीकायउघडाचिठाके ॥ २७ ॥ तेवींहेंभज्यभजन ॥ हेंस्वरूपचिसविलासमान ॥ येथेंकेलेंनवीण ॥ आयितेंअसे ॥ २८ ॥

**आगिपणआगी ॥ असतचिअसेअंगीं ॥ माकासयालागीं ॥**
**देणेंनदेणें ॥ ४६ ॥ ह्मणोनिभजतांभजावें ॥ मानभजतांका**
**यनव्हे ॥ ऐसेंनाहींस्वभावें ॥ श्रीशिउचिअसे ॥ ४७ ॥**

याअवघयाचेंतात्पर्यऐसें ॥ स्वभावेंजेंदशाअसे ॥ तेंनव्हावेंकांऐसें ॥ ह्मणावेंकासया ॥ २९ ॥ नकरितांजेंहोऊंपाये ॥ तेंकेलेंनाहींआहे ॥ येणेंअभिप्रायें ॥ बोलिलाउघडें ॥४३०॥ नभजणेंआणि भजणें ॥ हेंशिवाचियेचिपूर्णपणें ॥ अतांनभजावेंकायकोणें ॥ आणिभजावेंतेंकैसें ॥ ३१ ॥ अहो संकल्पाचियेवशें ॥ वाउगाचिअग्रहोदिसे ॥ असोज्ञानियासीज्ञेयदशे ॥ येणेंचिनाहीं ॥ ३२ ॥ एवंभक्तकिंवाअभक्त ॥ दोन्हींहानहोत ॥ ऐशीदशाअद्भुत ॥ पुढेंहीबोले ॥ ३३ ॥

**आतांभक्तिअभक्ति ॥ जालेंताटएकेपातीं ॥**
**कर्माकर्माचियावातीं ॥ माह्लाऊनिया ॥ ४८ ॥**

स्वरूपाचीस्वरूपासीप्रीति ॥ तेस्वरूपींचअसेनिजभक्ती ॥ तेभक्तीनेंभजनस्थिति ॥ वेह्लावत असे ॥ ३४ ॥ किंवानभजोनिअसतांनिवांत ॥ तोमूळभक्तीसीहोऊनिरत ॥ एवंभजतांनढळत॥ मुळींचीभक्ति ॥ ३५ ॥ ऐसीभज्यभजकेवीणआयिती ॥ जेभक्तिचीमूळभक्ती ॥ तेंभक्तिचि जालीआपैती ॥ निजानुभविया ॥ ३६ ॥ एवंनिजानुभवाचेंसुरवाडें ॥ नवाजतांभजनमोडे ॥ आणिभजतांजेंभजनघडे ॥ तेंअधींचिआहे ॥ ३७ ॥ ह्मणोनभक्तिआणिअभक्ति ॥ बुजाविलीपरमशांती ॥ तेशांतीचीस्थिति ॥ विसावलीजेथें ॥ ३८॥ तेशांतीजैंठसावली ॥ जेकर्मीअकर्मींह्लनिवायिली ॥ तेंसहजचिबुजावणीझाली ॥ भक्तिअभक्तिसी ॥ ३९ ॥ अहोकर्मीअकर्माचियावाती ॥ माल्हवोनठसावलीहेस्थिति ॥ तेंहीआतांनिगुती ॥ विवरूनिसांगों ॥ ४४० ॥ अगाकर्मआणिअकर्म ॥ दोहींचेंएकचिवर्म ॥ येथेंएकहीनेम ॥ नसाहेपैं ॥ ४१ ॥ कर्म कर्मत्वेंदेखिजे ॥ तरीटाकितांहीकर्मेनिफजे ॥ ह्मणोनिकरूनिअकर्ममानिजे ॥ तेंचिकर्म ॥ ४२ ॥

आतांऐसेंजेंकर्म ॥ हाअवघाअनात्मधर्म ॥ आत्मनिर्धारींअकर्म ॥ सहजचिवोडवलें ॥ ४३ ॥ ह्मणोनिसिद्धआत्मत्वाचीखूण ॥ तेनव्हेकर्माकर्मजन्य ॥ तयाआत्मप्रकाशींहेंजाण ॥ हरपोनिगेलें ॥ ४४ ॥ अगाकर्मआगमापाई ॥ तेणेंसिद्धआत्मासाधेलकाई ॥ ह्मणोनइयेठाई ॥ नसरेकर्म॥४५॥ संमतिः ॥ ॥ कर्मणानास्तितत्प्राप्तिःसंसारस्यचनाशनं ॥ प्लवाह्येतेसुराह्यज्ञअद्दढाश्चनसंशयः ॥ ह्मणोनिकर्मराहोनिपैलिकडे ॥ आत्माआत्मत्वींचिआंतुडे ॥ तरीअकर्मैंआत्माजोडे ॥ ऐसेंही नव्हे ॥ ४६ ॥ ॥ स्मृतिः ॥ ॥ नकर्मणामनारंभान्नैष्कर्म्यंपुरुषोश्नुते ॥ नचसंन्यसनादेवसिद्धिं समधिगच्छति ॥ इतिभगवद्वचनं ॥ एवंजन्हींसांडिलेंकर्म ॥ तन्हींनलाहिजेआत्मवर्म ॥ आत्मप्र काशींहेधर्म ॥ दोन्हींहीवावे ॥ ४७ ॥ ह्मणोनस्वात्मज्ञानगभस्ति ॥ उदैलयाकर्माकर्मवाती ॥ मा ल्हवोनिजाती ॥ बोलिलेंऐसें ॥ ४८ ॥ एवंआत्मविद्जनीं ॥ करणेंनकरणेंदोन्ही ॥ सांडूनअसि जेरहणीं ॥ प्रवाहरूप ॥ ४९ ॥ केलियाकर्मनुपजे ॥ नकरितांअकर्मनुदैजे ॥ यथाप्रवाहअसिजे॥ आपलेंसांची ॥ ४५० ॥ नकरूनअकर्माहोये ॥ ऐसीहीनव्हेसोये ॥ कींकेलियेनप्रवाहें ॥ कर्ता हीनव्हे ॥ ५१ ॥ ह्मणोनटाकावेंनाघ्यावें ॥ यथास्वभावेंअसावें ॥ त्यागिलियात्यागनव्हे ॥ घेत लियानलभे ॥ ५२ ॥ वस्तुनिखळचिन्मात्रघन ॥ जडाजडभागविहीन ॥ तियेवस्तूच्याठाईंवस्तु वीण ॥ कांहींचनसे ॥ ५३ ॥ आतांजेंकांहींजडाजडभान ॥ त्यासीकैंचेंसाचपण ॥ तत्संबंधीत्या ज्यग्रहण ॥ तेंकायसाच ॥ ५४ ॥ ह्मणोनिमिथ्याचिजेंसहज ॥ तेंत्यागासीनव्हेत्याज्य ॥ अंगि कारितांहीपैंजे ॥ घेतयाचीनुपरे ॥ ५५ ॥ आतांजेंनित्यचिन्मात्र ॥ तेथेंआणीककैंचेंस्वतंत्र ॥ नि षेधग्रहणासीपात्र ॥ तेंहीनव्हेकीं ॥ ५५ ॥ ह्मणोनश्रुतिजयातेंनिंदी ॥ तेंतयातेंचिमागुतेंवंदी ॥ ऐसेंपुढिलियेपदीं ॥ बोलतअसे ॥ ५७ ॥

**ह्मणोनिउपनिषदें ॥ दशेयेतींनिंदे ॥**
**निंदाचिविशदें ॥ स्तोत्रेंहोतीं ॥ ४९ ॥**

इदंनाशब्देंश्रुति ॥ दृश्यासीअसेंनिंदिती ॥ अपरोक्षआत्मस्थिति ॥ आरूढोनि ॥ ५८ ॥ अ होजोजोपदार्थकांहीं ॥ तोदिसेतैसानाहीं ॥ परीआत्मातेथूनपाहीं ॥ दूरस्थनसे ॥ ५९ ॥ श्रुतिः नान्योतोस्तिद्रष्टानान्योतोस्तिमंताइत्यादि ॥ तथाच ॥ आत्मैवेदंसर्वंब्रह्मैवेदंसर्वंइत्यादि ॥ याला गींनिंदेचेनिमिशें ॥ आत्माचिस्तविजेतुअसे ॥ निषेधार्थकांहींनसे ॥ निषेधासीपैं ॥ ४६० ॥ आत्मासद्रूपसंचला ॥ तेथेंनाथिलाअसदारोपजाला ॥ तोनाथिलाचिह्मणोनिनिंदिला ॥ अस दारोपु ॥६१॥ असदारोपुजैंनिंदिला ॥ तैंआत्माचिद्रूपचजोसंचला ॥ तोस्तवनेवीणस्तविला ॥ ऐसेंजालें ॥ ६२ ॥ किंवाइदंनाशब्दें ॥ उपनिषदेंयेतींनिंदे ॥ मागुतीतेणेंचिपदें ॥ सर्वआ त्माह्मणती ॥ ६३ ॥ येथेंकायआतांवंदावें ॥ कोणाअर्थातेंनिंदावें ॥ आपुलेनिस्वभावें ॥ दोन्हींनसती ॥ ६४ ॥ अगाउचितकर्मसांडावें ॥ तैंवेदमुखेंदूषणपावे ॥ आणिआत्माकर्म साध्यनव्हे ॥ हेंवेदुचिबोले ॥ ६५ ॥ अथवाविधीनेंकर्मसांडावें ॥ तोविधिकायकर्मनव्हे ॥ किंवावाक्यश्रवणाचेनिनांवें ॥ तेंचिनिफजे ॥ ६६ ॥ एवंहेंस्तविलेंनानिंदिलें ॥ येथेंवर्मचिअसे वायिलें ॥ निंदास्तुतिसिवंतलें ॥ स्वरूपनाहीं ॥ ६७ ॥ आतांनिंदाआणिजेंस्तविलें ॥ हेंमौनेसी चअसेघडिलें ॥ ऐसेंचिकांहींबोले ॥ पुढिलियेपदीं ॥ ६८ ॥

**नातरीनिंदास्तुति ॥ दोन्हींमौनासाठींजाती ॥**
**मौनींमौनआथी ॥ बोलतांबोलीं ॥ ५० ॥**

अहोवेदजेंकांहींबोलिला ॥ परीमौन्यमुद्रेनाहींचुकला ॥ ह्मणोनिनिंदास्तुतिजाला ॥ एकुचि पाडु ॥ ६९ ॥ बोलोनिबोलिकेंव्हावें ॥ मगनोबोलोनिमौनधरावें ॥ तरीऐसियेननपवे ॥ मौनमुद्रेतें ॥ ४७० ॥ हाबोलतचिबोलिलानाहीं ॥ ह्मणोनअर्धीचिमौनपाहीं ॥ यालागींबोलिलासेजें कांहीं ॥ नोबोलतांचिमौन ॥ ७१ ॥ एवंज्ञानियाचास्वभावजाण ॥ क्रियाकरीनाउगेपण ॥ शब्दु नोबोलेनधरीमौन ॥ ऐसेंकांहीं ॥ ७२ ॥ शब्दासीअसक्तनसेपाहीं ॥ मौनाचाहीअतिसोनाहीं ॥ कर्मउगेपणही ॥ इयेचिखूणें ॥ ७३ ॥ एवंज्ञानियाचीस्थिति ॥ स्तवितुसेमागुति ॥ तेहीकृपाकरूनिसंतीं ॥ अवधानद्यावें ॥ ७४ ॥

घालितांअव्हांसव्हांपाय ॥ शिवयात्राचिहोतीजाय ॥
शिवागेलियाहीनोहें ॥ केंहीजाणे ॥ ५१ ॥

अहोप्रत्ययाच्याराउळीं ॥ शीवरूपेंस्थितिनिडारली ॥ तैंकोठेंनजातांघडली ॥ शिवयात्राशिवा ॥ ७५ ॥ तयाच्याठाईव्यापारभान ॥ तेणेंसीतोशिवरूपजाण ॥ तोस्वभावेंकरीपादचळण ॥ ते शिवयात्राहोये ॥ ७६ ॥ किंवास्वभावाचेनिमिशें ॥ जाणेंघडेयात्रोद्देशें ॥ परीज्ञानियाढळला चिनसे ॥ ठाईंहूनि ॥७७॥ अहोस्वभावेंवर्ततांही ॥ प्रत्ययासीहानीनाहीं ॥ तयाकोठूनकोठेंही ॥ जाणेंचिनघडे ॥ ७८ ॥ ॥ संमतिः ॥ एवंरूपपरिज्ञानंयस्यास्तिपरयोगिनः ॥ कुत्रचिद्गमनंनास्ति तस्यसंपूर्णयोगिनः ॥ ॥ इतिसूतसंहितायां ॥ ॥ एवंलाधतांआत्मसुख ॥ सांडणेंनघडेबैसक॥ तयालोकत्रयींकोण्हीएक ॥ विषयोचिनाहीं ॥ ७९ ॥ आतांजेंकांहींविवरण ॥ तेंचालिबैसका सांडून ॥ पुढेंहीनिरूपण ॥ ऐसेंचिअसे ॥ ६८० ॥

चालणेंआणिबैसक ॥ दोन्हींमिळोनिएक ॥
नोहेऐसेंकौतुक ॥ इयेठाईं ॥ ५२ ॥

लाधतांस्वरूपानुभवखूण ॥ स्वरूपींनाहींस्वरूपेंवीण ॥ हेंजेंवाउगेंउच्चावचभान ॥ तेंआटोन गेलें ॥ ८१ ॥ तेथेंहेंनाथिलेंअध्यासिक ॥ फिटोनगेलेंदेहकंचुक ॥ मगचालणेंआणिबैसक ॥ दोन्हींहीमिथ्या ॥ ८२ ॥ अहोदेहाध्यासुचिनाहीं ॥ तेथेंचालिबेसकतेंकाई ॥ स्थिरताचपळतापाहीं ॥ रज्जुसर्पाचीजेवीं ॥ ८३ ॥ मृगजळाच्यापुरींरिघाला ॥ तोतरोनपैलतीरागेला ॥ कींमध्येंचिबुडाला ॥ दोन्हींहीमिथ्या ॥ ८४ ॥ ह्मणोनदेहाचावाहीं ॥ चालतांचालणेंनाहीं ॥ किंवाबैसतेठाइ ॥ बैसकानव्हे ॥ ८५ ॥ एवंचालीआणिबैसक ॥ दोन्हीसीहाअनोळख ॥ ह्मणोनिदोहींसीहीदेख ॥ सरिसापाडु ॥ ८६ ॥ अगाआत्मविदांच्याठाई ॥ देहाभासुचिनाहीं ॥ ह्मणोनकौतुक काई ॥ इयेविषईंचें ॥ ८७ ॥ अहोचालणेंआणिबैसक ॥ ह्मणालकैसेंनघडेएक ॥ तरीलाधलिया आत्मसुख ॥ नवलनाहीं ॥ ८८ ॥ अगाआपलेंरहणीसकट ॥ शिवरूपचिहाप्रकट ॥ आत्मत्वींसंतुष्ट ॥ तेनदेखतीआन ॥ ८९ ॥ आतांजेंअनुभवीजन ॥ त्यांचेंदेखतेंलक्षण ॥ पुढेंतेंचिनिरूपण ॥ सांगतुअसे ॥ ४९० ॥

येऱ्हवींआडोळलियाडोळां ॥ शिवयात्रेचासोहळा ॥
भोगिजेभलतेवेळां ॥ भलतेणें ॥ ५३ ॥

अगाप्रतीतीचेंनिसुरवाडे ॥ डोळ्यांआडजेंजेंपडे ॥ तोस्वरूपप्रत्ययोचिपुढें ॥ उभाठाके॥९१॥ शिवाचेनिचिप्रत्ययें ॥ शिवरूपचिकोंदलेंसेहें ॥ ह्मणोनिस्वभावेंजेंजेंपाहे ॥ तेंशिवरूपचिअघवें

॥ ९२ ॥ तैंआपणाप्रत्ययोजाला ॥ अप्रत्ययोकोठेंहीउरला ॥ याभेदासीमुकला ॥ प्राप्तपुरुष ९३ ह्मणोनिभलतेणेंभलतेवेळे ॥ नदेखिजेशिवावेगळें ॥ विश्वरूपेंसुरवाडलें ॥ एकलेंसुख॥९४॥ एकबद्धएकमुक्त ॥ हामोडलाअवघासंकेत ॥ यालागींयाचाप्रत्ययोनदेखत ॥ शिवेंवीणकांहीं ॥ ९५ ॥ यालागींभलतैंनभलतेवेळां ॥ भोगिजेशिवयात्रेचासोहाळा ॥ ऐसीखूणलाधला ॥ आपणापैंजो ॥९६॥ कांजेआपल्याप्रत्ययींकांहीं ॥ आपणेंवीणदुजेंनाहीं ॥ तयाआपणाह्नुनिकाई ॥ शिवरूपदुजें ॥ ९७ ॥ दृश्यद्रष्टृत्वाचाकालोवा ॥ तेथेंकोणेंकायदेखिजेकेव्हां ॥ आतांआपलाचिहेलावा ॥ आपणावरीये ॥ ९८ ॥ तरीतेहीपरीजाण ॥ आपणादेखेआपण ॥ इयेपरीदेखतेजन ॥प्राप्तपुरुष ॥९९॥ आतांविधिमुखेंउच्चनीचपण ॥ तेथेंतैसाचिहोयजाण ॥ परीदृश्यद्रष्टृत्वाचेंराण ॥ भरेनातें ॥५००॥ इयेविषईंचेंनिरूपण ॥ पुढिलेपदेंकरून ॥ करीतेथेंअवधान ॥ दीजोस्वामी॥१॥

**नासमोरदिसेशिउही ॥ परीदेखिलेंकांहींनाहीं ॥**
**देवभक्तादोहीं ॥ एकुचिपाडु ॥ ५४ ॥**

कांसगुणहीआकृति ॥ देवाचियाजयामूर्ति ॥ प्रतिपादिलियाअसती ॥ शास्त्रद्वारें ॥ २ ॥ जोकींचिन्मात्रपूर्ण ॥ एकेठाईंआवाहून ॥ विलासिलेंजेभजन ॥ भज्यभजकत्वें ॥३॥ जेंकींऊर्जितें ॥ काश्यादीस्थळींचींदेवतें ॥ किंवाआवडलेंचित्तें ॥ देवपूजादिक ॥४॥ तेथेंहीविद्वज्जन ॥ आपलेप्रवाहेंकरून ॥ विलासेंभजन ॥ चालतेंकरी ॥ ५ ॥ असोशिवमूर्तिसगुण ॥ तेथेंहीदर्शनींहोऊन ॥ स्वभावेंशिवदर्शन ॥ करीहीसुखें ॥ ६ ॥ परीतेंदृश्यआपणदेखतां ॥ याभेदाचीनेणेंवार्ता ॥ किंबहुनातेंदेखिलेंचिआतां ॥ देखिलेंचिनाहीं ॥ ७ ॥ अहोजोयादृष्टीचादेखणा ॥ तेथेंदृष्टीचाजालाउगाणा ॥ आतांदेखावयाजाणा ॥ उरलेंनाहीं ॥ ८ ॥ ह्मणोनजालयाहीशिवदर्शन ॥ देखिलेंचिनाहींजाण ॥ स्वताभक्तुचिआपण ॥ देवोहोये ॥ ९ ॥ अगादेवहीदेखिलापुढें ॥ परीआंतुडलाआपणाचिकडे ॥ एवंदेवाचेनिपाडें ॥ आपणयाभजे ॥ ५१० ॥ अथवाआपलेंनवालंभे ॥ देवींचभक्तत्वलाभे ॥ एवंआपणचिशोभे ॥ आपलियाशोभा ॥ ११ ॥ अगाभक्तिचदेवासीठाव ॥ देवींचिजालाभक्तभाव ॥ गगनचिजालाठावो ॥ गगनासीजेवीं ॥ १२ ॥ एवंएकलाएकवडु ॥ देवाभक्तासरिसाचिपाडु ॥ इयेरीतिउघडु ॥ बोलिलाअसे ॥ १३ ॥ प्रत्ययाचाप्रत्ययोजाण ॥ तैंचिहेंदेवभक्तपण ॥ ह्मणोनदोहींसजाण ॥ एकुचिपाडु ॥ १४ ॥ जैसातैसानटे ॥ परीसरळतानतुटे ॥ नकरितांचिप्रकटे ॥ क्रियाभागु ॥ १५ ॥ एवंसंकलपावीण ॥ स्वभावेंक्रियाचरण ॥ येचिविषयींनिरूपण ॥ पुढेंहीबोले ॥ १६ ॥

**आपणचिचेंडुसुटे ॥ मगआपणयाउपटे ॥ तेणेंउदळतांदाटे॥**
**आपणपांचि ॥ ५५ ॥ ऐसीजरीचेंडुफळी ॥ देखिजेकाकेव्हे**
**ळीं ॥ तरीबोलिजेहेंसरळी ॥ प्रबुद्धांची ॥ ५६ ॥**

अवचिताचेंडुसुटला ॥ आपणचिभूमिउपटला ॥ उपटोनिउदळला ॥ आपलेनिबळें ॥ १७॥ आपणचिविलासला ॥ परीसंबंधनाहींदेखिला ॥ ऐसियारीतिजाला ॥ क्रियाकलापु ॥ १८ ॥ तेवींसंकलपविकलपविहीन ॥ मनाचेंगेलेंमनपण ॥ आतांइंद्रियेंस्वभावेंकरून ॥ अवचितक्रिया ॥ १९ ॥ अगाआत्मनिष्ठेच्याठाईं ॥ अधिष्ठानादिप्रवाहीं ॥ हर्षविषादेंवीणकांहीं ॥ क्रियाउमटे ॥ ५२० ॥ तेक्रियेच्याप्रवाहीं ॥ शुभाशुभउमटेजेंकांहीं ॥ तयासारिखेंहोणेंनाहीं ॥ आत्मतृप्तासी ॥ २१ ॥ कांजेतेणेंकेलेंनवीन ॥ उगेंचिजेंविलासमान ॥ ऐसेंजरीहोयविहरण ॥ तरीमातुआह्मी

॥ २२ ॥ प्रबुद्धाचीहेसरळीं ॥ नकरितांचिजाली ॥ करणीभागाआली ॥ नाहींतया ॥ २३ ॥ नाहेंवर्ततीरीति ॥ हेंकर्मनव्हेआत्मउपास्ति ॥ ऐसेंचिकांहींपुढती ॥ बोलतुअसे ॥ २४ ॥

**कर्माचाहातुनलगे ॥ ज्ञानाचेंहीकांहींनरिघे ॥**
**ऐसिचिहोतसेअंगे ॥ उपास्तिहे ॥ ५७ ॥**

येथेंकरणीसरोनगेली ॥ ज्ञानेज्ञानदशासांडिली ॥ अंगेंअंगलाधली ॥ आत्मउपास्तिहे ॥ २५ ॥ अगाउपास्यउपासकहीन ॥ निखळआत्मउपास्तिहेजाण ॥ आयितीकेलेनवीण ॥ अंगेंचिहोये ॥ २६ ॥ हेंकर्माचेंनव्हेकार्य ॥ हेंज्ञानासीहीनव्हेज्ञेय ॥ प्रमाताप्रमेय ॥ येथेंनाहीं ॥ २७ ॥ अगा जेणेंज्ञानसज्ञान ॥ तेज्ञानासीगम्यकेवींजाण ॥ सिंधूचाठावलवण ॥ काढीलकेवीं ॥ २८ ॥ अहो ज्ञानासीहेंसाध्यजालें ॥ ऐसेंजयाठसावलें ॥ तरीआपणपेंदुऱ्हावलें ॥ आपणयासी ॥ २९ ॥ छा येचेंघेऊनिगणित ॥ आपलानिर्धारुहोत ॥ किंवावृक्षाग्रकायचुंबित ॥ वृक्षमूळासी ॥ ५३० ॥ ते वींजेणेंज्ञानासीवाढी ॥ तेंकायज्ञानाचीजोडी ॥ एवंअंगेंअंगउघडी ॥ आत्मउपास्तिहे ॥ ३१ ॥ एवंहेंआत्मउपासन ॥ पुढेंयाचेंचिदृढीकरण ॥ करावयानिरूपण ॥ सांगतअसे ॥ ३२ ॥

**निफजेनानिमे ॥ अंगेंअंगघुमे ॥**
**सुखासुखउपमे ॥ देववेलयया ॥ ५८ ॥**

हेआत्मउपास्तिऐसी ॥ सर्वकाळअसेसरसी ॥ आरंभअवसानइयेसी ॥ असेनापें ॥ ३३ ॥ हें जेंसमाधानकांहीं ॥ पूर्वीनव्हतेंचिपाहीं ॥ ऐसेंउरलेंकांहीं ॥ प्रत्यइइये ॥ ३४ ॥ अगाहेदशाअ द्भुत ॥ देशकालादिभेदरहित ॥ निफजतनानिमत ॥ ऐसेंकांहीं ॥३५॥ ह्मणिजेसंभवानाशनाहीं॥ सर्वदाऐसेंचिपाहीं ॥ सुखमात्रजेंकांहीं ॥ आपेआप ॥ ३६ ॥ जेंपहिलेंचिसंभवलेंनाहीं ॥ तया नाशहीनघडेपाहीं ॥ जेंकींअनादिचिपाहीं ॥ सुखमात्रअसे ॥ ३७ ॥ तेणेंसुखेंकोण्हींसुखावणें ॥ ऐसीदशातेंनेणें ॥ त्यासुखाचियेआरोगणें ॥ कोण्हीनाहीं ॥ ३८ ॥ त्यासुखमात्राच्याठाईं ॥ सु खेंवीणदुजेंनाहीं ॥ ह्मणोनितेणेंचितेंपाहीं ॥ स्वीकारीजेकीं ॥ ३९ ॥ असोसुखपणाचेंहीउपरमे॥ अंगेंअंगघुमे ॥ भोग्यभोक्तृत्वाचेसीमे ॥ ठाकेनाजें ॥ ५४० ॥ त्यासुखमात्रासीकांहीं ॥ भोगाव याकोण्हींचनाहीं ॥ परंतुसुखकळेसीपाही ॥ लोपुनाहीं ॥ ४१ ॥ ह्मणोनआपेआपघुमे ॥ बोलि लायेणेंसंभ्रमें ॥ तयासीचतेणेंउपमे ॥ देयिजतअसीती ॥ ४२ ॥ अगाप्रत्ययाचेनिवशें ॥ प्राप्तजा लेंऐसेंदिसे ॥ तऱ्हींप्राप्तीचियेदशे ॥ आलेंनाहींकीं ॥ ४३ ॥ अगाइयेआत्मउपास्तिकरून ॥ भ ज्यभजकतेविहीन ॥ सुखेंसुखासीचुंबन ॥ दिधलेंपाहा ॥ ४४ ॥ अहोकल्लोळाचेनिमेळें ॥ पाणी पाणियावरीलोळे ॥ तेवींआपणचिउचंबळे ॥ आपणावरी ॥ ४५ ॥ असोकाळत्रईअविच्छिन्न ॥ संचलेंसुखमात्रजाण ॥ तेणेंचितयाचुंबन ॥ देइजतअसे ॥ ४६ ॥ एवंऐसेंहेंजाण ॥ आत्मउपा स्तीचेंलक्षण ॥ इयेस्थितीचेंस्तवन ॥ करितसेपुढां ॥ ४७ ॥

**कोण्हीएकअकृत्रिम ॥ भक्तीचेंहेंवर्म ॥**
**योगज्ञानादिविश्राम ॥ भूमिकाहे ॥ ५९ ॥**

ऐसीस्वरूपानुभवखूण ॥ लाधलेजेविद्वज्जन ॥ जयांचेंलाधलेपण ॥ मुरालेंस्वरूपीं ॥ ४८ ॥ स्वरूपजेंचिन्मात्रकांहीं ॥ तेथेंलाधावयादुजेंनाहीं ॥ ह्मणोनिचिन्मात्रअसोनिपाहीं ॥ चिन्मात्र जालें ॥ ४९ ॥ गगनगगनींसांठवलें ॥ उदकउदकेंचिप्राशिलें ॥ तेवींचिन्मात्रअसोनिजालें ॥ चि

न्मात्रस्वरूप ॥ ५५० ॥ हेंस्वतांचिशुद्धबुद्धपाहीं ॥ करणीचीअपेक्षानाहीं ॥ ह्मणोनिअकृत्रिम चिपाहीं ॥ भक्तीचेंवर्म ॥ ५१ ॥ येथिलस्वसंवेद्यखूण ॥ तेलोपलीनाहींजाण ॥ तेंचिअकृत्रिमभ जन ॥ वर्मयेथिचें ॥ ५२ ॥ ह्मणोनहेंअकृत्रिम ॥ आत्मभक्तीचेंवर्म ॥ योगाचेंविश्राम ॥ ज्ञानाची शांति ॥५३॥ योगयोगेंपरतला ॥ पूर्वापरतेसीमुकला ॥ आपल्याठाईंपावला ॥ विश्रांतीतें ॥५४॥ योगआणिज्ञान ॥ चिन्मात्ररचलेंआपण ॥ श्रांततेसीनदेखोन ॥ विश्रांतिजाली ॥ ५५ ॥ ऐसियें सुखींस्वाभाविका ॥ सुखावलेंजेंआयिका ॥ हेचिविश्रामभूमिका ॥ योगज्ञानाची ॥५६॥ योगा चावेगुतुटला ॥ ज्ञानाचाफुंजउतरला ॥ त्रिपुटीचापुसला ॥ ठावुचियेथें ॥ ५७ ॥ येथेंनानात्व तुटलें ॥ एकएकपणामुकलें ॥ पूर्वापरतेंदेखिलें ॥ नाहींयेथें ॥ ५८ ॥ अहोएकपणाहानीनाहीं ॥ परीनामरूपाच्याप्रवाहीं ॥ नावेकभासलेंतेंही ॥ तुटलेंयेथें ॥ ५९ ॥ याचेंचिविशेषण ॥ पुढिले पदींचेंविवरण ॥ कीजेलतेथेंअवधान ॥ मागतुसे ॥ ५६० ॥

**अंगेंकीरएकजालें ॥ परीनामरूपाचेंमासलें ॥**
**होतेंतेंहीआटलें ॥ हरीहरयेथें ॥ ६० ॥**

चिन्मात्रएकलेंआयितें ॥ परीनामरूपेंनानात्वातें ॥ देखिलेंतेंयेथें ॥ आटलेंपाहा ॥ ६१ ॥ स्व रूपअसोनिसंचलें ॥ नामरूपनानात्वजालें ॥ तेंअवघेंआटलें ॥ प्रल्ययार्णवींइये ॥६२॥ अहोनाम रूपाच्याठाईं ॥ वास्तववांटलेंनाहीं ॥ तेंनामरूपहीपाहीं ॥ स्वतंत्रनसे ॥ ६३ ॥ यास्वरूपासी सोडूनी ॥ नुमटतीनामरूपाचियावाणी ॥ ऐसीयेथेंखाणी ॥ उघडलीदेखा ॥ ६४ ॥ अहोआ च्छादलेंकधींनाहीं ॥ आणिउघडलेंतरीनदिसेपाहीं ॥ आतांबोलावेंतेंकाई ॥ हरीहरयेथें ॥६५॥ हेअनुभवाचीखूण ॥ नव्हेबोलिजेऐसीजाण ॥ यालागींउगेंचिहरिस्मरण ॥ करूनिअसावें ॥६६॥ एवंहेअनुभवखूण ॥ गिळोनिराहिजेआनंदींमग्न ॥ तयाचेंवर्ततेंलक्षण ॥ तेंहेंऐसें ॥ ६७ ॥ नदे खोनिदेहाकृति ॥ स्तविलीअसावयाचीरीति ॥ उत्तरोत्तरउक्ति ॥ इयेचिखूणे ॥ ६८ ॥ तेंउत्तरो त्तरबोलिलेंकैसें ॥ हेंचिपुढेंदावितसें ॥ अवधानाचेपैसे ॥ तेंहीऐका ॥ ६९ ॥

**अहोअर्धनारीनटेश्वरें ॥ गिळीतगिळीतपरस्परें ॥**
**ग्रहणजालेंएकसरें ॥ सर्वग्रासें ॥ ६१ ॥**

सत्ताप्रकाशयाकुसरी ॥ अर्धनारीनटेश्वरी ॥ प्रकृतिपुरुषाचियेपरी ॥ स्तविलीअर्धी ॥५७०॥ त्याउभयांचानिर्धारकरितां ॥ एकातेंएकगिळितां ॥ तुटोनगेलीपरस्परता ॥ बोधमात्रीं ॥ ७१ ॥ त्याबोधाचेंबोधेंविवरण ॥ करितांतुटलेंअनुसंधान ॥ तियेस्थितीचेंअवसान ॥ येथवरीआलें॥७२॥ अहोबोधबोधींसामावला ॥ एकसरेंसर्वग्रासजाला ॥ बोधहीनाहींउरला ॥ बोधेंसहित ॥ ७३ ॥ तेथेंबोधकाकैंचीसवडी ॥ चिदर्णवचिहाएकथडी ॥ ऐसीदशाउघडी ॥ सांगितलीयेथें ॥ ७४ ॥ अगाहेअपरोक्षखूण ॥ दृश्यदशाहारपोन ॥ शब्दासहीग्रासून ॥ बोलिलेंहें ॥ ७५ ॥ आपलेंजें कांहींसाच ॥ तेंनव्हेवाचेसीवाच्य ॥ ह्मणोनशब्दाचेंकवच ॥ झांकोंचनसके ॥ ७६ ॥

**वाच्यजातखाऊनि ॥ वाचकत्वहीपिऊनि ॥**
**ठाकलीनिदैजोनि ॥ परायेथें ॥ ६२ ॥**

हेजेंकांहींअपरोक्षखूण ॥ येथेंवाच्यजातआटलेंजाण ॥ आतांशब्दाचेंशब्दपण ॥ सहजचिस रलें ॥ ७७ ॥ ह्मणोनवाचकताहीनघडे ॥ नबोलतांचिअसेंउघडें ॥ परादिकांचेंमेहुडें ॥ नवरि

खतगेलें ॥ ७८ ॥ नानापरेपासूनिवखैरी ॥ निमालीचिन्मात्रसागरीं ॥ आतांकोणरूपकरी ॥ चिन्मात्रायया ॥ ७९ ॥ परीरूपेंवीणजोआहे ॥ तोआहेपणाहीनसाहे ॥ एकलाप्रत्यये ॥ प्रमेयहीन ॥ ५८० ॥ अनुहीनाहींतयावीण ॥ केवळप्रत्ययमात्रचिपूर्ण ॥ गुरुकृपास्पर्शन ॥ जालेंजेव्हां॥८१॥ आतांवाच्यवचनतासरली ॥ निरूपणाचीवारीहरली ॥ निखळगुरुकृपाचिसंचली ॥ प्रत्ययमात्र ॥ ८२ ॥ ह्मणोनवाचकतापिऊन ॥ कीजतसेसद्गुरुस्तवन ॥ स्तऊनियांप्रकरण ॥ संपविजैलपुढां ॥ ८३ ॥ कांजेंसद्गुरुकृपारस ॥ त्यासीहोणेंनाहींकींविरस ॥ ह्मणोनतोचिकींतयास ॥ आस्वादितअसे ॥ ८४ ॥ तेंआपेआपस्तवन ॥ नहोनिचिहोतसेजाण ॥ तेंचिअवधारकेंवीणअवधान ॥ तेचिदेतया ॥ ८५ ॥

**शिवशिवसमर्थास्वामी ॥ येवढीयेआनंदभूमी ॥**
**घेपेंदीजेएकेंआह्मी ॥ ऐसेंकेलें ॥ ६३ ॥**

नानारहस्येंनानाविलासें ॥ आनंदुचिउपलवलाअसे ॥ येथेंआह्मावीणनसे ॥ दुजीमातु ॥८६॥ तेंआह्मीह्मणसीकोण ॥ तरीतुवांजेदाविलीखूण ॥ जेंकींमीतूंपणेंवीण ॥ तूंचिआह्मा ॥ ८७ ॥ तोजोतूंगुरुराजसमर्थु ॥ त्यामजवीणनाहींदुसरीमातु ॥ मीचिमीसततु ॥ ऐसेंजालें ॥ ८८ ॥ अगा ग्राह्यआणिग्रहण ॥ वक्तृत्वआणिश्रवण ॥ भोक्ताभोक्तृत्वजाण ॥ कार्यकर्तृत्वजें ॥ ८९ ॥ हेंमाझें चिआनंदचित्र ॥ मीचिअवघ्यांचेंपात्र ॥ मजवीणस्वतंत्र ॥ अनुहीनाहीं ॥ ५९० ॥ असोहेंआनंदाचेसौरसें ॥ विलासलेंऐसेंभासे ॥ परीआह्मावीणनसे ॥ दुजेंकांहीं ॥ ९१ ॥ अवघेंआह्मीच संचलें ॥ दुसरेंअवघेंचिवावजालें ॥ तेथेंआमचेंगेलें ॥ आह्मीपणजी ॥ ९२ ॥ ह्मणोनिकृपेचेआथिलेपणें ॥ स्वामीतुमचेंचिकींहेंकरणें ॥ तुझेनिचिपूर्णपणें ॥ ऐसेंजालें ॥ ९३ ॥

**चेतविमाचेवविलें ॥ निदैलेंचिमानिदविले ॥**
**आह्मीचिआह्माआणिलें ॥ नवलजीतुझें ॥ ६४ ॥**

अगाअहंप्रत्ययाचेनिमिशें ॥ आह्मीऐसेंह्मणितलेंअसे ॥ त्याप्रत्ययावीणनसे ॥ काळत्रयींही ॥ ९४ ॥ तोप्रत्ययोनाहींखंडला ॥ ह्मणोनत्यासीचप्रत्ययोजाला ॥ जेव्हांतोनटला ॥ तुझेनिरूपें ॥ ९५ ॥ ह्मणोनतुझियाकृपाअधिष्ठिलें ॥ तेंजागेंचिजागविलें ॥ बोधरूपासीआलें ॥ आपणबोधा ॥९६॥ अगास्वात्मबोधाच्याठाईं ॥ जागेंचिजागविलेंपाहीं ॥ आणिअनात्मत्वजेंनाहीं ॥ तेंचिनिराशिलें ॥ ९७ ॥ किंवास्वात्मानुभवलाधतांखूण ॥ तेंचिनिद्रातेंचिजागेपण ॥ तोचिबोधतेंचिजाण ॥ शांतिसेज ॥ ९८ ॥ बोधबोधत्वासीनाहींसांपडला ॥ तोबोधजागाचिजागाजाला ॥ शांतरूपचिसुरवाडला ॥ स्वशांतीसी ॥ ९९ ॥ बोधआणिशांतपण ॥ यादोहींचीएकिचखूण ॥ यालागींजागृताचेंजागेपण ॥ तेचिनिद्रा ॥ ६०० ॥ तोबोधशांतिसकट ॥ ठाईंचाचिअसेजुनाट ॥ तोप्रकटतचिप्रकट ॥ केलाजीतुवां ॥१॥ ह्मणोनजागेंचिजागविलें ॥ निदैलेंचिनिदविलें ॥ आह्मीचप्रत्ययाआणिलें ॥ आह्मीचिपाहा ॥२॥ आह्मीजैसेंतैसेंचिपाहीं ॥ आतांमागेंअनारिसेंनाहीं ॥ ऐसेंतंवकृपापाडिलेंठाईं ॥ हेंचिनवल ॥ ३ ॥ तेंचिजेंआह्मीजाण ॥ तेथेंतुजहीकैंचेंआनपण ॥ ऐसें असतांकरिसीअवलोकन ॥ हेंचिनवल॥४॥ आतांहेंहीयेथेंनवलनाहीं ॥ तेंहीबोलेनआतांकांहीं ॥ अवधानतुझ्यापाईं ॥ असावेंनिकें ॥ ५ ॥

**आह्मीनिखळमातुझें ॥ वरीलोभेंह्मणसीमाझें ॥**
**हेंपुनरुक्तसाजे ॥ तूंचिह्मणोन ॥ ६५ ॥**

अगागोडीजेवींगुळाची ॥ तेवींआह्मीनिखळतुझेंचि ॥ अथवाआर्द्रताउदकाची ॥ उदकीं जेवीं ॥ ६ ॥ किंवाकापुराचापरिमळु ॥ तेवींमीतुझाचिगासकळु ॥ येथेंमीतूंपणाचाविटाळु ॥ लागलाचिनाहीं ॥ ७ ॥ जेवींकापुराचारवा ॥ तेवींतुझाचिमीगादेवा ॥ कार्यकारणभावा ॥ आलोंचिनाहीं ॥८॥ एवंतूंचिअवघाआनंदघन ॥ लेलोपोनेणेंआनंदखूण ॥ ह्मणोनितूंचिआवडसीतुजजाण ॥ तैंचिआह्मी ॥ ९ ॥ नानातुजवालंभअसेतुझें ॥ ह्मणोनतूंतुजचिह्मणसीमाझें ॥ येथेंभेदाचेंवोझें ॥ आलेंनाहीं ॥ ६१० ॥ ह्मणोनआह्मीनिखळगातुझें ॥ आणितूंहीह्मणसीमाझें ॥ ह्मणिजेतूंचिपरीमाझें ॥ वंचेहीतूंचि ॥ ११ ॥ तूंचिअसोनितुवां ॥ माझेंजरीह्मणितलेंदेवा ॥ तरीपुनरुक्तजालेंकिंवा ॥ भेदुजाला ॥ १२ ॥ अगाबोललियाअर्थासिबोलिलें ॥ तरीकायअर्थासीभागपडिलें ॥ तेवींआवडीतुवांह्मणितिलें ॥ माझेंतुह्मी ॥ १३ ॥ अगाआवडीतुटीनाहीं ॥ तरीनवलतें येथेंकाई ॥ भेदुनसोनिचपाहीं ॥ भोगिसीगौरव ॥ १४ ॥

**कोण्हाचेंकांहींनघेसी ॥ आपुलेंहीतैसेंचिनदेसी ॥**
**कोणजाणेंभोगिसी ॥ गौरवकैसें ॥ ६६ ॥**

शिष्याचेंजडत्वनघेसी ॥ आपलेंअजडत्वनेदिसी ॥ परीआमुचातंवहोसी ॥ स्वामीखरा १५ त्वांजीवदशेसीपाहीं ॥ कधींहीदेखिलेंनाहीं ॥ माकेवल्यत्वकांहीं ॥ देणेंलागे ॥ १६ ॥ ह्मणोनकनिष्ठत्वनाहींफेडिलें ॥ उत्तमत्वनाहींवोपिलें ॥ आणिगौरवतरीमिरवलें ॥ ऐसेंचिपाहे ॥ १७ ॥ तुझेंस्वरूपसर्वदासंचलें ॥ हेंतुजचितूंअससीवाल्हें ॥ हेंनचोजवतचिचोजवलें ॥ गौरवहेंचि ॥ १८ ॥ हेंहीतुजनसेकांहीं ॥ परीकोणजाणेकैसेंपाहीं ॥ सामान्यविशेषतंवनाहीं ॥ तुजमाजीं देवा ॥ १९ ॥

**गुरुत्वेंजेव्हडाचांगु ॥ तेव्हडाचितारुनिलघु ॥**
**गुरुलघुजाणेंजोपांगु ॥ तुझाकरी ॥ ६७ ॥**

नेणिजेगुरुलघुता ॥ ह्मणिजेनेदेखिजेउत्तमकनिष्ठता ॥ गुरुत्वेंआतां ॥ इतुलेंचिस्वामी॥६२०॥ यासीतंवअनारिसेंनाहीं ॥ आणिस्वरूपानंदडोहीं ॥ नेणोंकितीतरतीपाहीं ॥ प्रत्ययोन्मुखें॥२१॥ ऐसेंहीहोतअसतां ॥ तुजमाजींनसरेगुरुलघुता ॥ तुझियाकृपातुषारेंनभिजतां ॥ गुरुलघुता दिसे ॥ २२ ॥ तुवांआपुलेनिअपांगपातें ॥ स्पर्शिलेंनाहींजयातें ॥ गुरुलघुताहेतयातें ॥ वाउगीचदिसे ॥ २३ ॥ जतुस्पर्शेनेनस्पर्शेनेनाहीं ॥ परीतुजवीणकायअसेपाहीं ॥ आतांजेंजियेप्रवाहीं ॥ तैसाचितूंगा ॥ २४ ॥ ह्मणोनतुझापांगुघडे ॥ तयागुरुलघुताआवडे ॥ येऱ्हवींतुजमाजींनघडे ॥ सामान्यविशेष ॥ २५ ॥ अगातूंतरीअससीसमान ॥ परीत्याचात्यासीदुवाडजाण ॥ जोनकरी अग्निसन्निधान ॥ तोचिहिवौजे ॥ २६ ॥ ह्मणोनप्रत्ययमात्रजोतूंजाण ॥ तेथेंनव्हतांसावधान ॥ गुरुलघुताहेंभान ॥ साचोकारेंदिसे ॥ २७ ॥ यालागींतुझाजयापांगु ॥ तयासीचादिसेगुरुलघु ॥ एऱ्हवींतूंअभंगु ॥ तुजमाजींहेंकैंचें ॥ २८ ॥

**शिष्यादेतांवाटे ॥ अद्वैताचासमोफुटे ॥**
**तरीकाय्याहोतीभाटें ॥ शास्त्रेंतुझीं ॥ ६८ ॥**

शिष्यासीहोतांबोधु ॥ घडतांगुरुशिष्यभेदु ॥ तरीकासयावेदु ॥ अद्वैतस्तविता ॥ २९ ॥ सद्गुरूसीशरणआला ॥ स्वरूपबोधेंशिष्यधाला ॥ परीभागनाहींपडला ॥ गुरुशिष्यमिशें ॥६३०

शिष्यासीबोधहोतां ॥ अद्वैतयेतेंभेदपंथा ॥ तरीभाटहोऊनिस्तविता ॥ कासयावेदु ॥ ३१ ॥ श्रुतिः ॥ पूर्णमदःपूर्णमिदंपूर्णात्पूर्णमदुच्यते ॥ पूर्णस्यपूर्णमादायपूर्णमेवावशिष्यते ॥ ॥ एवं हेगुरुकृपासुरवाडें ॥ शिष्यास्वरूपबोधघडे॥ परीतुझ्यारूपींनघडे ॥ गुरुशिष्यभागु ॥३२॥ तुझें नविघडोनसंचलेपण ॥ पूर्णत्वेंचिहोयउद्धरण ॥ शास्त्रहीकरीस्तवन ॥ ऐसेंचितुझें ॥ ३३ ॥ स्मृतिः ॥ पूर्णात्पूर्णमुद्धरतिपूर्णात्पूर्णंप्रचक्षते ॥ हरंतिपूर्णात्पूर्णंचपूर्णमेवावशिष्यते ॥ १ ॥ इति महाभारते ॥ ॥ एवंविलासतांऐसेंही ॥ पूर्णत्वाहानीनाहीं ॥ असोआह्मासीतंवतूंपाहीं ॥ येरी तिसखा ॥ ३४ ॥

किंबहुयेदातारा ॥ मीतूंयाचासंसारा ॥
वेंचूनहोसीसोयरा ॥ तेणेंचितोषें ॥ ६९ ॥

स्वामीबहुतेंकाजकांहीं ॥ मीतूंपणाठावनाहीं ॥ तेंनाहींपणहीतुझ्याठायीं ॥ आटलेंआतां ३५ तेंआटोनितूंसैरा ॥ भेदेंवीणआमचासोयरा ॥ परीसोयिरेपणाचाउजिगरा ॥ तुजमाजींनाहीं ॥ ३६ ॥ ह्मणोनआपलाचिआपण ॥ चालविसीसोइरेपण ॥ तेणेंतोषायमान ॥ तूंचिअससी ॥ ३७ ॥ एवंइयेप्रकर्णी ॥ स्तविलीसिद्धरहणी ॥ तेंचिअनुसंधानधरूनि ॥ स्तविलेंगुरुत्व ॥३८॥ अहोलाधतांस्वानुभवखूण ॥ हारपोनिगेलेंजनवन ॥ तऱ्हींआत्मरसुजाण ॥ उलंघलानाहीं ३९ तयाआत्मरसाचेवाहाणीं ॥ सिद्धाचीसिद्धरहणी ॥ वर्णिलीइयेप्रकर्णी ॥ अनुभवामृतीं॥६४०॥ तेंआत्मसुखींसुखावलें ॥ ह्मणोनिआत्मारामतेंचिबोलिलें ॥ नानातेंसुखमुसावलें॥ गुरुपदव्याजें ॥ ४१ ॥ नानाजियेसुखींअभिरमण ॥ तेंसुखनव्हेश्रीसद्गुरुचरण ॥ तेंस्वसुखेंचिआनंदघन ॥ वेल्हावतसे ॥ ४२ ॥ तेंजेंकांहींवेल्हावण ॥ तेणेंचिविलासलेंस्तवन ॥ स्तऊननावेकदाविला जाण ॥ प्रकर्णातुयेथें ॥ ४३ ॥ पुढेंग्रंथमहात्मरचना ॥ रचिलीअसेअनुभवखूणा ॥ अनुभवा मृतींचेंजाणा ॥ सारजेंकांहीं ॥ ४४ ॥ तेंहीआमुचेनिदातारें ॥ नित्यानंदबोधचंद्रें ॥ आपलेनि कृपाकरें ॥ निववविजैलमातें ॥ ४५ ॥ तेथेंचकोरचिचंद्रहोती ॥ निवालीचितेथेंनिवती ॥ भोग्यभोक्तृत्ववृत्ति ॥ मावळोनि ॥ ४६ ॥ प्रकाशेंसीप्रकाशिजैल ॥ धवळलेंचिविश्वधवळैल ॥ ऐसेंकांहींलाहिजेल ॥ आपणापेंमियां ॥ ४७ ॥ तेणेंमीसर्वदाकल्याण ॥ शिवरूपेंशांतसज्ञान॥ नानानित्यानंदींचिमग्न ॥ होऊनिअसें ॥६४८॥ ॥ इतिश्रीअनुभवामृतविवरणेश्रीनित्यानंदैक्य दीपिकायांसिद्धरहणीकथनंनामनवमप्रकरणंसमाप्तम् ॥

---

## प्रकरण दशम.

ॐपरमात्मनेनमः ॥ जयजयाजीपूर्णा ॥ नित्यानंदानित्यकल्याणा ॥ पूर्णापूर्णभागविहीना ॥ चिदैकरूपा ॥ १ ॥ रूपारूपविहीन ॥ पूर्णत्वेंआनंदघन ॥ काळत्रयींअविच्छिन्न ॥ अस्तिक्यता तुझी ॥ २ ॥ ह्मणोननिर्देशासवारित ॥ केलेंचिद्रूपहासंकेत ॥ येथेंह्मणीतुजयेत ॥ स्वरूपाचा आळ ॥ ३ ह्मणोनचिद्रूपाचिदांबरा ॥ चिद्रत्नाचियासागरा ॥ चिदाधिकारियासीपुरा ॥ चिदा नंदतूंगा ॥४॥ तुजआनंदरूपासीनपडोनसवडी ॥ तुझीतूंचिघेतअससीगोडी ॥ यालागींअधिका राचीपरवडी ॥ भोगिसीतूंचि ॥ ५ ॥ अगातूंजोचिदानंदघन ॥ अनुभवलासीआपणयाआपण॥

त्याअनुभवासीकेलीखूण ॥ अनुभवामृतऐसी ॥ ६ ॥ त्याखुणेचेंहीविवरण ॥ तूंचिविलासला सीगाआपण ॥ आणिविवरावयासीजाण ॥ उरलासीतूंगा ॥ ७ ॥ तेंजेंकांहींउरलेंपण ॥ तोनि त्यानंदआमचाजाण ॥ आतांजेंकांहींआह्मीपण ॥ तेंकायदुजेंआलें ॥८॥ अगातुजजेंकांहींतूंपण ॥ तेंचिआमुचेंहीआह्मीपण ॥ एवंभेदतोवाचारंभण ॥ तुजआणिआह्मा ॥ ९ ॥ असोहाहीजोकां हींरोळु ॥ हातुवांनावेककेलाखेळु ॥ वस्तुताहागोंधळु ॥ तुजमाजींकैंचा ॥ १० ॥ आतां खेळाचियामिशें ॥ मजलाविलेंआपुलेंपिसें ॥ लाऊनअनुभवामृतवसे ॥ बोलिलासीकांहीं॥११॥ तेंजेंबोलणेंतुझें ॥ तेथेंमिशकरूनिमाझें ॥ विवरोनियाबोजे ॥ सांगीतलेंस्वामी ॥ १२ ॥ तेथेंआ पलास्वरूपवैभव ॥ तोचिसिद्धांताचास्वभाव ॥ नमोडोनिमौनाचीसिव ॥ दाविलीमातें॥१३॥ते थेंशास्त्राचीकळकळ॥ तुटोनतुजचिदेखिलेंनिश्चनवळ ॥ जाहलेंएकार्णवसलिल ॥ आनंदरूपें॥१४॥ याअमृताचीनव्हाळी ॥ लाधलीइयेग्रंथकल्लोळीं ॥ याकल्लोळाचीवेली ॥ चालिलीकैसी ॥१५॥ अगाआनंदजळगहन ॥ नित्यानंदविकारहीन ॥ आदिसीअवसान ॥ देखिजेनाकीं ॥ १६ ॥ तेथेंग्रं थाचीउत्पत्ति ॥ बहुवेंदिसेअवडती ॥ तरीहेउजळोनिकृपावाती ॥ दावावेंमज ॥ १७ ॥ यावरी माझेनिदातारें ॥ उभारूनिकृपाकरें ॥ ग्रंथमाहात्म्यसविस्तरें ॥ सांगितलेंजें ॥ १८ ॥ त्याचेंही विवरण ॥ तोचिदाविलकरून ॥ यदर्थींचेंप्रकर्णी ॥ दाहावेंहें ॥ १९ ॥ जेकींज्ञानेश्वराचेंहृद्गत ॥ तेंनित्यानंदेंमजदावीत ॥ परीदेखतांनलगेजेथ ॥ दृष्टिचामळ ॥ २० ॥ तेंआतांसंतवृंदेंअवधा रती ॥ तरीग्रंथचालेलपुढती ॥ असोहेंहीआतांवितपत्ति ॥ काजकाई ॥ २१ ॥ यासज्जनांचेचर ण ॥ हृदयराउळींबैसऊन ॥ हृदयस्थासीपुसोन ॥ बोलिजैलें ॥ २२ ॥ आतांमूळपदींचीसंग ती ॥ लाऊनिविवरणवृत्ति ॥ ग्रंथमाहात्म्यस्थिति ॥ वाखाणिजैल ॥ २३ ॥

**परीगाश्रीनिवृत्तिराया ॥ हातातळींसुकरविलेंतुंयां ॥**
**तरीनिवांतचिमिर्था ॥ भोगावेंकीं तें ॥ १ ॥**

जयजयाश्रीनिवृत्तिस्वामी ॥ जाहालोंतुमचाहस्तग्रामी ॥ सुखासुखऊर्मि ॥ मावळल्यातेव्हां ॥ २४ ॥ राहिलेंबोलणेंउगेपण ॥ खुंदलेंबैसकाचळण ॥ मावळलेंध्येयध्यान ॥ हातातळींतुझ्या ॥ २५ ॥ विरालेंज्ञेयज्ञान ॥ राहिलेंविचार्यविवरण ॥ हस्तस्पर्शेंजाण ॥ ऐसेंजालें ॥ २६ ॥ मजहातातळींसामाविलें ॥ आनंदजळींमनमुरालें ॥ मीपणाचेमासुले ॥ मोडूनगेले ॥ २७ ॥ रा हिलेंकर्मकावाड ॥ नदिसेश्रोतव्यकांहींआड ॥ आतांहापवाड ॥ कासयाकीजे ॥ २८ ॥ कास याग्रंथोत्पत्ति ॥ कैंचीकाव्यवितपत्ति ॥ श्राव्यश्रोतव्यस्थिति ॥ पारुपलीजेव्हां ॥ २९ ॥ स्वामी तुझियास्वरूपानुभवें ॥ हेंकांहींचिनबोलावें ॥ निवांतअसोनिभोगावें ॥ स्वरूपानंदासी ॥ ३० ॥ आणियाग्रंथाचेंनिमिशें ॥ कांहींबोलिलेंऐसेंदिसे ॥ तरीयेथेंमजअनिवांतदशे ॥ नघडेचियेथें ३१ हेंचिप्रमेयधरून ॥ पुढेंअसेंनिरूपण ॥ दीजोश्रोताअवधान ॥ कृपाकरूनि ॥ ३२ ॥

**परीमहेशेंसूर्याहातीं ॥ दिधलीतेजाचीसूती ॥**
**तयाभासाअंतर्वर्ति ॥ जगचिकेलें ॥ २ ॥**

प्रसन्नोन्मुखमहेशजाला ॥ तेणेंसूर्यजालातेजागळा ॥ अंगींचिलाधला ॥ तेजकळेतें ॥ ३३ ॥ तितुलेनियाचीकृतकृत्यता ॥ स्वप्नींहीनेणेंतमाचीवार्ता ॥ परीतोप्रकाशजगापुरता ॥ नकरितां चिजाला ॥ ३४ ॥ तोअंगीचिप्रकाशवंतु ॥ तमातेंकांहींचिनेणतु ॥ परीतेणेंफेडूनिफिटतु ॥ ज गाचेंअंध ॥ ३५ ॥ त्यासीतंवकरणेंकांहींचिनाहीं ॥ तेणेंअसिजेआपुलेप्रवाहीं ॥ आणिजगासी

तंवपाहीं ॥ उपयोगजाला ॥ ३६ ॥ तेवींस्वामीचीअवलोकनकळा ॥ आपल्याअंगींमीलाधला ॥ आतांपांगुफिटला ॥ करणीचामज ॥ ३७ ॥ आतांकरणेंआणिउगेपण ॥ हेंकांहींचिनदेखोन ॥ निखळनिवांतुचिजाण ॥ प्रवाहेंसी ॥ ३८ ॥ तोजोकांहींप्रवाह ॥ त्याचाहीनदेखेउगव ॥ केलेन वीणस्वभाव ॥ उगाचिजोअसे ॥ ३९ ॥ मीतेणेंसीअकरणा ॥ मौनेंसीचबोलणा ॥ मौनमुद्रेचि याखूणा ॥ उल्लंघोनेणें ॥ ४० ॥ त्यामौनाचीहीनिवांतस्थिति ॥ तेचिहेग्रंथोत्पत्ति ॥ नकरितांचि त्रिजगतीं ॥ सुखावतअसे ॥४१॥ पाणीपापानदेखे ॥ परीतीर्थेंहोतीपुण्यदायकें ॥ तेवींहेंनबोल णेंपरीश्रवणसुखें ॥ सुखावेजग ॥ ४२ ॥ स्वामीचेअवलोकनेंकरून ॥ बोलतांचिजोडलेंमौन ॥ तरीहेंकायमाझेंनिजाण ॥ निवांतराहे ॥ ४३ ॥ माझेंमौननमोडे ॥ जगतंवसुखेंसुरवाडे ॥ हेंन करितांचिघडे ॥ स्वामीवैभवेंकीं ॥ ४४ ॥ एवंमीअसोनिचाड ॥ कवित्वकळानयोनिआड ॥ उगाचिसुखसुरवाड ॥ सुखासीजाला ॥ ४५ ॥ परीनिरूपणसुखेंकरून ॥ जगहीहोयेसुखघन ॥ हेंमजनकरितांचिजाण ॥ आपणजालें ॥ ४६ ॥ पुढेंऐसेंचिनिरूपण ॥ उपलक्षणेंसहवर्तमान ॥ अवधारावेंसावधान ॥ सज्जनश्रोतीं ॥ ४७ ॥

**चंद्रासीअमृतघातलें ॥ तेंतयाचिकायियेतुलें ॥**
**कींसिंधुमेघांदिधले ॥ मेघाचिभागु ॥ ३ ॥**

अमृताचाजिव्हाळा ॥ चंद्रासीनिजांगींजोडला ॥ तेणेंसर्वांगींजाला ॥ अमृतमयचिकींतो ॥ ४८ ॥ परीचंद्रांचेंनिनिवालेपणें ॥ जगाचेंहीफिटेपारणें ॥ शीतळेचंद्रकिरणे ॥ जगहीनिवे४९ औषधितेणेंजिती ॥ चकोरांचींपारणेंफिटती ॥ हेचंद्रासीनसोनगुंती ॥ उगेंचिहोये ॥ ५० ॥ एवं चंद्रकोण्हासीकांहींनेदि ॥ आणिजगतंवनिवेचित्रिशुद्धि ॥ तेवींनिवांतजालोंनिजपदीं ॥ परी स्वभावोचिऐसा ॥ ५१ ॥ नातरीस्वामीचेंहस्तामृत ॥ लाधलेनिजालोंशांत ॥ येथेंबोलतांचिसा धत ॥ मौनमुद्राकीं ॥ ५२ ॥ अगामौनाचीखूण ॥ बोलींचसांपडेजाण ॥ तरीजगाचेंकान ॥ नायिकतीकाई ॥ ५३ ॥ नानाजयाबोलींचसांपडेमौन ॥ तयाबोलींरिघालेश्रवण ॥ तेणेंश्राव्यश्रो तेपण ॥ जोगावतअसे ॥ ५४ ॥ एवंनिवांतत्वनमोडून ॥ होतसेकथावधान ॥ हेंस्वामीचेंचिम हिमान ॥ मीकायजाणें ॥ ५५ ॥ किंवासिंधुजळप्राशनकरावें ॥ तेणेंजगअवघेंसिंचावें ॥ मेघींऐ सेंनिभावें ॥ धरिलेंनाहीं ॥ ५६ ॥ अहोमेघाचीचाडसरली ॥ आणिजगासीदिवाळीजाली ॥ ते वींमजनिवांतताळाधली ॥ आणिजगासीहीउपयोगु ॥ ५७ ॥ मीएकुपरिच्छिन्न ॥ स्वामीच्यापा यींआलोंशरण ॥ हाबुद्धिवैभवावांचून ॥ स्वामीसहेंनाहीं ॥ ५८ ॥ स्वामीआपलियेलीलें ॥ वर्षो नद्ययेअमृतकळे ॥ तेणेंजगचिअवघेंधालें ॥ माझेनिप्रसंगें ॥ ५९ ॥ हेंमियाकांहींनेणोन ॥ विला सेस्वामीचेंमहिमान ॥ आपलेमतिजाण ॥ जगहीसुखी ॥ ६० ॥ एवंऐसियेरीती ॥ निरूपणअसे पुढती ॥ तेंकृपाकरूनिसंतीं ॥ अवधारावें ॥ ६१ ॥

**दिवाजोउजिवडु ॥ तोघराचाचिसुरवाडु ॥**
**गगनींआथीपवाडु ॥ तोजगाचाचिकीं ॥ ४ ॥**

दीपींप्रकाशुअसेदीपाचिपुरता ॥ परीघराच्यायोगेंहोयवाढता ॥ दिवींनाहींवार्ता ॥ घराची कांहीं ॥ ६२ ॥ जेवढाघराचापवाड ॥ तैसाचिदीपहोयवाड ॥ परीदीपींनाहींचाड ॥ याचीकां हीं ॥ ६३ ॥ किंवागगनआपुलेंपैसेंअसे ॥ जगकायतेथेंनसे ॥ परीगगनइयाशोषें ॥ भरलेंनाहीं ॥ ६४ ॥ तेवींस्वामीकृपाकरून ॥ हेंचिमाझेंनिवांतपण ॥ आणिजगहीसुखघन ॥ येणेंहोये ॥६५॥

नातरीलाधतांस्वात्मखूण ॥ तेथेंजगचिगेलेंहारपोन ॥ आतांस्वामीचेंमहिमान ॥ स्वामिचजाणती ॥ ६६ ॥ नानास्वामीनेंकृपाअवलोकिलें ॥ तेणेंमियाकांहींहेंबोलिलें ॥ येणेंजगानिरूपणवोपिलें ॥ ऐसेंनाहीं ॥ ६७ ॥ कांजेंस्वरूपचिन्मात्रघन ॥ तेंपरंपरागतनव्हेजाण ॥ ह्मणोनऐसेंचिनिरूपण ॥ पुढेंहीबोले ॥ ६८ ॥

**अगाधेंहीउंचंबळतीं ॥ तेचंद्रींचिनाशक्ति ॥**
**वसंतुकरीतेंहोती ॥ झाडांचेदानीं ॥ ५ ॥**

अहोसागरुजेणेंउन्मादें ॥ तेशक्तिकींचंद्रींनांदे ॥ वनश्रीजेणेंआनंदे ॥ तेंवसंतींचिअसे ॥६९॥ अमाचंद्राचीजेशक्ती ॥ येतीसागराचियेहातीं ॥ तरीसागरदर्शनेंउचंबळती ॥ आणिकोण्ही ॥७०॥ किंवावसंतझाडींआला ॥ तींझाडेंविकाशतीआणीकाला ॥ येरीतिनाहींपावला ॥ झाडीं वसंतु ॥ ७१ ॥ एवंहेंजेथींचेंतेथिंचअसे ॥ तेथुनिचिहेंविलासे ॥ उत्तरोत्तरतानसे ॥ येथेंकांहीं ॥ ७२ ॥ स्वामीचेनिपदवैभवें ॥ म्याहीवैभववक्ताव्हावें ॥ मगमजपासूनपावे ॥ सुखरूपता जगीं ॥ ७३ ॥ तरीस्वामीचेंअवलोकन ॥ होतांविरालेंमाझेंमीपण ॥ आतांमियाबोलिलेंतेंजाण॥ असंबद्धअघवें ॥ ७४ ॥ म्यांहेंकांहींबोलिलें ॥ हेंमाझेंनिविलासलें ॥ येणेंमिशेंफावलें ॥ जगासीहें ॥ ७५ ॥ ऐसेंकांहींयेथेंनसे ॥ सुखजेथींचेंतेथेंअसे ॥ तेथूनिचिहोतसे ॥ सुकाळजगा ॥ ७६ ॥ एवंस्वरूपाच्याठायीं ॥ परंपराकांहींनाहीं ॥ आनंदाच्याडोहीं ॥ आनंदुचिअसे ॥७७॥ ह्मणोनि हेंजेंबोलिलेंकांहीं ॥ येथेंमाझेंकांहींच्चिनाहीं ॥ पुढेंहीऐसेंचिपाहीं ॥ बोलतुअसे ॥ ७८ ॥

**ह्मणोनिहेंअसंवर्य ॥ हेंदेवीकेचेऔदार्य ॥**
**वांचूनिस्वातंत्र्य ॥ माझेंनाहीं ॥ ६ ॥**

ह्मणोनिहेंजेंसुखमात्रकांहीं ॥ तेंस्वामीचेंस्वामीच्याठायीं ॥ कोण्हींआवरिलेंच्चिनाहीं ॥ ह्मणोनिअसंवर्य ॥७९॥ तेणेंसुखेंसुखीसकळ ॥ परीतेथेंसकळाचानलगेविटाळ ॥ अंगेंअंगनिर्मळ ॥ निरालेंचिअसे ॥ ८० ॥ ह्मणोनिहेंजेंकांहींबोलिलें ॥ तेंस्वामीचेंचिअसंवर्यत्वसंचलें ॥ अन्यगामीनहोऊनिजालें ॥ विलासलेंऐसें ॥ ८१ ॥ जेवींसूर्यप्रकाशसूर्यीचअसोन ॥ तेथूनचिधवलिजेत असेजनवन ॥ किंवासंचलेंअसोनिगगन ॥ घटमठींव्याप्त ॥ ८२ ॥ तेवींयावोलणियाचेनिमिशें ॥ स्वामीचेंहीअसंवर्यत्वचिविलासलेंअसे ॥ वांचूनिमजकेंचेंऐसें ॥ स्वातंत्र्यपणयेथें ॥८३ ॥ स्वामीचेप्रतापप्रवाहीं ॥ मजस्वतंत्रतानाहीं ॥ हेंऔदार्यत्वकांहीं ॥ देवाचेंचिअसे ॥ ८४ ॥ जऱ्हीं एवढेंहेंप्रकाशलें ॥ तऱ्हींदेवत्वेंनाहींसांडवलें ॥ ह्मणिजेप्रकाश्यप्रकाशातीतसंचलें ॥ तैसेंचि असे ॥ ८५ ॥ एवंग्रंथविस्ताराचेनिमिशें ॥ स्वरूपशब्दासीआलेंचिनसे ॥ तेथेंमियाहेंबोलिलें ऐसें ॥ कोठूनयेईल ॥ ८६ ॥ तस्मातूइयेग्रंथींचाप्रतिपाद्यअर्थ ॥ ठायींचअसेस्वस्थ ॥ उत्तरोत्तरगत ॥ जालानाहीं ॥ ८७ ॥ आणिअर्थुअर्थासीश्रवण ॥ होऊनचालतसेनिरूपण ॥ ह्मणोनमाझें मौन ॥ मोडलेंचिनाहीं ॥ ८८ ॥

**आणिहाएवढाऐसा ॥ परिहारुदेऊंकायसा ॥**
**प्रभुप्रभावविन्यासा ॥ आडठाऊनि ॥ ७ ॥**

स्वामीइयेग्रंथप्रवाहीं ॥ मजबोलणेंघडलेंनाहीं ॥ हेंप्रकटच्चिअसेठाईं ॥ येथेंपरिहारुकायसा ॥८९॥ कांजेंस्वामीमहिमाऐसाचिकांहीं ॥ येथेंपरिहारूउचितनाहीं ॥ जेंजेंहोतसेजयाप्रवाहीं ॥

तेंस्वामीचीशोभाकीं ॥ ९० ॥ तेथेंमीयाआडयावें ॥ नसतेंपरिच्छिन्नत्वघ्यावें ॥ घेऊनिउपपादावें ॥ परिहारातें ॥९१॥ एवंयेथेंकांहीं ॥ बोलाचेंकाजनाहीं ॥ ऐसेंचिपुढेंपाहीं ॥ बोलतुअसे ९२

**आह्मीबोलिलोंजेंकांहीं ॥ तेंप्रकटचिअसेठाईं ॥**
**मास्वयंप्रकाशाकाई ॥ प्रकाशावेंबोलें ॥ ८ ॥**

स्वामीजेणेंप्रकटार्थें ॥ ग्रंथआलाग्रंथदशेतें ॥ तयास्वयंप्रकाशातें ॥ प्रकाशीकवण ॥ ९३ ॥ तें कायअसेआच्छदलें ॥ मांप्रकटलेंमाझेनिबोलें ॥ याबोलासीप्रकाशिलें ॥ जेणेंठाईंचिअसोनि ९४ ह्मणोनबोलणेंमौनघडलें ॥ आतांपरिहाराकायउरलें ॥ कांजेंस्वरूपकधींनाहींजालें ॥ शब्दासी विषय ॥ ९५ ॥

**नानाविपायेआह्मीहन ॥ कीजेतेंपामौन ॥**
**तरीकायजनींजन ॥ दिसतेंना ॥ ९ ॥**

आह्मीहेंजरीनबोलिजेतें ॥ तरीस्वरूपतंवनाछादतें ॥ आछादतेंतरीकायदिसतें ॥ जनासीजन ॥ ९६ ॥ एवंजनहेंजेंकांहीं ॥ देखणीकळाचिपाहीं ॥ हेंप्रकटचिठाईं ॥ संचलेंअसे ॥९७॥ न्याहाळितांजनाचीखूण ॥ निखळद्रष्टाचिजनजनार्दन ॥ तयाजनार्दनींजनपण ॥ अधींचिनाहीं ॥९८॥ जनाचाअर्दन ॥ जनचिअसेजनार्दन ॥ हेअनुभवाचीखूण ॥ अनुभवीचिजाणती ॥ ९९ ॥ असो आह्मासनोबोलतांही ॥ जनतंवदेखणेंचिपाहीं ॥ हेंआमचेनिकाई ॥ नवेंजालें ॥ १०० ॥

**जनातेंजनेंदेखतां ॥ द्रष्टेंचिदृश्यतत्वता ॥**
**कोण्हींनहोनिआयिता ॥ सिद्धांतहा ॥ १० ॥**

जनासीजनपाहे ॥ तंवउभयत्वेंद्रष्टेंचिआहे ॥ दृश्याचीसोय ॥ येथेंकैंची ॥ १ ॥ एवंदृश्यद्रष्टृत्वभेदेंवीण ॥ दृश्यचिद्रष्टापरिपूर्ण ॥ हानकरितांचिजाण ॥ सिद्धांतअसे ॥ २ ॥ येथेंबोलणेंआणिउगेपण ॥ मिळोनएकलेंचिमौन ॥ आतांमाझेंबोलकेपण ॥ आटलेंसहज ॥ ३ ॥ एवंइत्यादि ग्रंथेंकरून ॥ करूनिसद्गुरुस्तवन ॥ पुढेंग्रंथउपसंहरणार्थजाण ॥ बोलतअसे ॥ ४ ॥

**ययापरौतेंकांहीं ॥ सचिद्रहस्यनाहीं ॥**
**आणिहेंतयाअधींही ॥ असतचिअसे ॥ ११ ॥**

हेंजेंकांहींनिरूपण ॥ सचिद्रहस्यतेंइतुलेंचिजाण ॥ येथेंश्रोतव्यार्थजाण ॥ उरलाचिनाहीं ५ जालयाअमृतपान ॥ अमरत्वाचेंसाधन ॥ आणीकजेवींजाण ॥ उपजलेंचिनाहीं ॥ ६ ॥ किंवा जालयाक्षुधाप्रांतु ॥ भोजनींनचलेहातु ॥ तेवींयाअनुभवावरीमातु ॥ दुसरीनचले ॥ ७ ॥ सचिद्रहस्यह्मणिजेकाई ॥ ज्ञानाज्ञानजेथेंनाहीं ॥ तेंज्ञानरहस्यहेंकांहीं ॥ बोलिलेंजेंकीं ॥ ८ ॥ अगा ज्ञानेंचिकैवल्यप्राप्ती ॥ ऐसेंबोलिलीअसेस्मृति ॥ त्याज्ञानाचीरीति ॥ बोलिलीयेथें ॥ ९ ॥ येणें ज्ञानेंकरून ॥ ज्ञानचिगेलेंहारपोन ॥ ह्मणोनकैवल्यासीजाण ॥ उणावोयेथें ॥११०॥ ऐसेंजेंरहस्य कांहीं ॥ हेंनबोलतांचिअसेठाईं ॥ ह्मणोनिनवाईयेथेंनाहीं ॥ बोलणयाची ॥ ११ ॥

**तऱ्हींग्रंथप्रस्तावो ॥ नघडेहेंह्मणोंपावो ॥**
**तरीसिद्धानुवादलाहों ॥ आवडीकरू ॥ १२ ॥**

ह्मणोनहेंकांहीं ॥ नाबोलावेंह्मणेपाहीं ॥ तरीसिद्धानुवादकाई ॥ माझेनिजाला ॥ १२ ॥ हें सिद्धचिअनुवादेंवीण ॥ तेंअवांकिलेंनावेकजाण ॥ तऱ्हींउणेंनव्हेपरीदुण ॥ गोडीचढे ॥ १३ ॥ ऐसीचिकांहींखूण ॥ पुढिलेपदींजाण ॥ दावीतसेतेथेंअवधान ॥ नावेकदीजें ॥ १४ ॥

**पढियंतेंसदातेंचि ॥ परीभोगींनवीरुची ॥**

**ह्मणोनिहाउचितुचि ॥ अनुवादुसिद्ध ॥ १३ ॥**

आपणयाआपणआवडे ॥ त्यासीकधींहीसंधीनपडे ॥ परीभोगींनवाघडे॥ सुखविलासु॥१५॥ आपलीआवडीजीवीं ॥ तेंचिगंधपुष्पादिभावी ॥ पुढेंकरूनियाभोगवी ॥ आपणयाआपण ॥१६ तेंजेंआपआपणाआवडे ॥ हेंतंवनवेंनघडे ॥ परीभोगितांजोडे ॥ नवलावऐसा ॥ १७ ॥ अथवा दुग्धगुडादिपदार्थ ॥ यांतएखादाएखादाआवडत ॥ तेआवडीनिवांत ॥ अंतरींअसे ॥ १८ ॥ तेंतंवसर्वदाआवडे ॥ परीभोगितांविलासवाढे ॥ तेवींहाउचितुचिघडे ॥ ग्रंथप्रस्ताव ॥ १९ ॥ असोआवडेतेंचिआवडे ॥ परीभोगींसुखसुरवाडे ॥ जऱ्हींठायींचिनविघडे ॥ सुखरूपतात्याची ॥ १२० ॥ जेवींराजाराजपदेंसुखघन ॥ परीवैभवीआपणाआपण ॥ तैंराजपदतंवतेंचिजाण ॥ परीसुखदुणावेकीं ॥ २१ ॥ तेवींहोतांगुरुकृपादृष्टि ॥ जाहालीस्वरूपेंसीभेटी ॥ आनंदींपडोनि मिठी ॥ आनंदासी ॥ २२ ॥ भेटीचाहारमोडला ॥ पैसेंचिपैंसुस्थिरावला ॥ आनंदकणुविराला॥ आनंदजळींइये ॥ २३ ॥ तऱ्हींस्वरूपींचीस्वसंवेद्यखूण ॥ हेंतंवलोपोनेणेंजाण ॥ कांजेंस्वरूपकाळत्रयींअविच्छिन्न ॥ चिन्मात्रत्वें ॥ २४ ॥ आनंदकणविरोन ॥ आनंदजळचिपरिपूर्ण ॥ त्याआनंदासीतंवजाण ॥ अनारिसेंनाहीं ॥ २५ ॥ तोचिआनंदजोपुरातन ॥ तेचिकांहींस्वसंवेद्यखूण ॥ आठवेविसरेवीण ॥ दृश्यात्रताजें ॥ २६ ॥ तेंचिआपणयाआपण ॥ भोगेंवीणभोगितसेजाण ॥ तेंचिहेंग्रंथप्रस्थान ॥ रूपाआलें ॥ २७ ॥ जऱ्हींआपणतेंचि ॥ तऱ्हींभोगींनवीरुचि ॥ ह्मणोनिहा उचितुचि ॥ ग्रंथप्रसंगु ॥ २८ ॥

**याकारणेंमिया ॥ गौप्यदाविलेंबोलोनियां ॥**

**ऐसेंनाहींआपसया ॥ प्रकाशुचि ॥ १४ ॥**

जऱ्हींहेंकांहींमियाबोलिलें ॥ तरीगुह्यचिअसेसंचलें ॥ कांजेंबोलेंनांहींसांडिलें ॥ मौन्यमुद्रेतें ॥ २९ ॥ अगावाचाजेणेंवावडे ॥ तेनयेचिकींवाचेचेनिपाडे ॥ जऱ्हींमोडलेंगाडें ॥ बोलाचेंउदंड ॥ १३० ॥ सागराचाथावजाण ॥ दाऊंगेलेंजैंलवण ॥ दाविलेंनाआपण ॥ दोन्हींनाहीं ॥ ३१ ॥ तेवींहेंबोलींबोलोंजातां ॥ बोलूचिनदिसेथिता ॥ माहेबोलाचियापंथा ॥ येईलकाई ॥ ३२ ॥ ह्मणोनउदंडकांहींबोलिलें ॥ परीगुह्यनाहींमोडलें ॥ किंबहुनानाहींघडलें ॥ बोलणेंचिकांहीं ३३ एवंनबोलतांचिबोलें ॥ आपेआपचिप्रकाशिलें ॥ ऐसेनिनावेकआलें ॥ विलासासी ॥ ३४ ॥ विशेषसामान्यतेवीण ॥ संबंधातेंनदेखोन ॥ प्रकाशुचिजाण ॥ प्रकाशलाअसे ॥ ३५ ॥ पुढेंहेंचि निरूपण ॥ अनुभवाचीखूण ॥ बोललीतेथेंअवधान ॥ अनुभवेंदीजे ॥ ३६ ॥

**आणिपूर्णाहंतावेंठलों ॥ सैंधआह्मीचदाटलों ॥**

**मालोपलोंनाप्रकटलों ॥ कोणाहोऊनि ॥ १५ ॥**

आतांआपेआपप्रकाशलें ॥ परीजालेपणासीनाहींआलें ॥ कांजेंप्रत्ययेनाहींदेखिलें ॥ दुसरियेदशेसी ॥ ३७ ॥ तेथेंमीएकनिरोपिता ॥ दुजाएकअवधारिता ॥ याभेदाचीवार्ता ॥ नाहींजेथें३८

जेथेंइंद्रियेंमनेंसींबुडालीं ॥ अहंकाराचीवाटमोडली ॥ ज्ञातेपणाचीसरली ॥ भरोवरीयेथें॥३९॥ जेथेंज्ञेयेसीजुघवेंज्ञान ॥ जेथेंनिर्देशेसीवायिलीआण ॥ ऐसेंसांडूनिआह्मीपण ॥ आहेप्रत्ययोजों ॥ १४० ॥ तयेअहंतेचेनिप्रकाशें ॥ आह्मावीणकांहींनसे ॥ ह्मणोनिप्रकटलोपाचियेदशे ॥ नघडे चियेणें ॥ ४१ अहोऐसेंजेंआह्मीकांहीं ॥ तेंअनादिऐसेंचिपाहीं ॥ कधींलोपलेंचिनाहीं ॥ माप्र कटणेंकाइसें ॥ ४२ ॥ ह्मणोनपूर्वींजोबोलिलोंउपचारु ॥ तोअसोआतांअघवापसरु ॥ आमचें पूर्णत्वेंहीरु ॥ दुजानाहीं ॥ ४३ ॥ एवंआह्मीचिआह्मीपूर्ण ॥ येरवाउगेंअवघेंप्रतारण ॥ पुढलिये पदींखूण ॥ बोलिलीस्पष्ट ॥ ४४ ॥

**आपणयाआपणपें ॥ निरूपणकायवोपें ॥**
**माउगेपणेंहरपे ॥ ऐसेंआहे ॥ १६ ॥**

ह्मणोनहाजोकांहींविलासजाण ॥ तेआमुचीपूर्णत्वाचीखूण॥ वांचूनियेथेंनिरूपितानिरूपण॥ केउतींअसती ॥ ४५ ॥ अगामीचिमीआपणापें ॥ आतांनिरूपणकवणाअर्पें ॥ उगेपणेंकायहा रपे ॥ ऐसेंआहे ॥ ४६ ॥ अगामियामजनिरूपिलें ॥ मगमाझेंमजसत्यत्वेंआलें ॥ तरीनिरूपणचि घडलें ॥ कवणीयेसत्ता ॥ ४७ ॥ ह्मणोनआपलियेसत्यत्वेंजाण ॥ हेंबोलूनिदाविलेंउगेपण ॥ ऐसीकांहींखूण ॥ अनुभवाची ॥ ४८ ॥ अथवाहेंकांहींजेदाविलीखूण ॥ हेंबोलीनव्हेनाउगेपण॥ काजेंपरादिकांबोळवण ॥ तेथेंशब्दकैंचा ॥ ४९ ॥ आतांशब्दचिजेथेंनाहीं ॥ तेथेंउगेपणतेंआतां काई ॥ ह्मणोनदोहींवीणकांहीं ॥ रूपमात्रचिअसेहें ॥ १५० ॥ अहोहेंजेंअळुमाळकांहीं ॥ बोलिलें सेंदिसेपाहीं ॥ तरीपुढेंइयेविषईं ॥ बोलतअसे ॥ ५१ ॥

**ह्मणोनिमाझीवैखरी ॥ मौनाचेंहीमौनकरी ॥**
**हेपाणीयावरीमकरी ॥ रेखिलीपा ॥ १७ ॥**

अहोमीयथाग्रंथप्रवाहीं ॥ बोलिलोंपरीबोलिलोंनाहीं ॥ येथेंमौनासीपाहीं ॥ पडिलेंमौन ५२ शब्दाचाधरूनिआधारु ॥ मौनासीहोतसेथारु ॥ आतांचिन्मयानंदसागरु ॥ येथेंशब्दचिनुमटे ॥ ५३ ॥ ह्मणोनशब्दाचेअभावेंजाण ॥ मौनासहीपडिलेंमौन ॥ हेंवलगनचिअवलगन ॥ होऊनि ठेलें ॥ ५४ ॥ जेवींउदकींमत्स्यरेखिला ॥ तोरेखितांचिवावजाला ॥ एवंरेखेचेनिमिशेंदाविला ॥ निराकारुचितेणें ॥ ५५ ॥ तेवींहेंकांहींबोलण ॥ मौनासीदाविलेंमौन ॥ येथेंपदेंसहितजाण ॥ वैखरीकैंची ॥ ५६ ॥ एवंलाधतांस्वरूपानुभवखूण ॥ शब्देंसीसरलेंमौन ॥ किंबहुनाअनुभवा चीहीजाण ॥ नुमटेचिमुद्रा ॥ ५७ ॥ तयास्वरूपानंददोहीं ॥ हेंविश्वचिउगवलेंनाहीं ॥ आपण आपल्याचिठाईं ॥ क्रीडतुअसे ॥ ५८ ॥ कल्लोळाचाउजिगरा ॥ नपडेचिजेवींसागरा ॥ तेवींक्रि येसीस्वरूपनिद्रा ॥ नमोडेचियाची ॥ ५९ ॥ ह्मणोनितेंक्रियानाउगेपण ॥ ऐसाकोण्हीएकस्व भावजाण ॥ त्यास्वभावाआंतीलखूण ॥ बोलिलीहेकांहीं ॥ १६० ॥ परीचंदनुधुपीयला ॥ कापुरावारादिधला ॥ चंद्रकांतमाखिला ॥ चंद्रकिरणीं ॥ ६१ ॥ कस्तूरीपुटींघातली ॥ अमृताधारदिधली ॥ येणेंपाडेंजाली ॥ ग्रंथरचनाहे ॥ ६२ ॥ नानाउदयअस्ताचीकुटीफेडूनि ॥ प्रकटकेलाहातरणी ॥ हेशशिसूर्यजेथूनि ॥ उजेडाआले ॥ ६३ ॥ तयाप्रकाशाचीहेदिवटी ॥ दा ऊनिदेखणीकेलीसृष्टि ॥ नानादृष्टीचीचपुष्टी ॥ दिठीसदिधली ॥ ६४ ॥ ऐसाकोण्हीएकचांग ॥ निरोपणाचाशिरोभाग ॥ ऐसेंबोलतसेसुभग ॥ सिद्धाचारावो ॥ ६५ ॥

**एवंदशोपनिषदें ॥ पुढारींनढाळतींपदें ॥**
**देखोनिबुडीबोधें ॥ येथेंचिदिधली ॥ १८ ॥**

एवंहेजेग्रंथरचना ॥ येथेंबोधासीहीजालाउगाणा ॥ नानाअनुभवखूणाविलाजाणा ॥ अनुभवेंचिकींहो ॥ ६६ ॥ आणिवेदपुरुषाचेंउत्तमांग ॥ उपनिषदेंशिरोभाग ॥ त्याहीमधेंचांग ॥ मुख्यमूर्ध्नीजो ॥ ६७ ॥ तेंजेंमुख्यगव्हर ॥ वेदपुरुषाचेंजिव्हार ॥ दशोपनिषदेंसार ॥ निवडिलींप्रख्यात ॥ ६८ ॥ तेंपरिव्राजकशिरोमणी ॥ आचार्यत्वेंदिनमणी ॥ असेअवतरलाशूळपाणी ॥ दीनोद्धरणार्थ ॥ ६९ ॥ तेणेंशंकरेंप्रसिद्धें ॥ अर्थिलींदशोपनिषदें ॥ अवघींमुमुक्षेंबोधें ॥ धडौतींकेलीं ॥ १७० ॥ हेंजेंदशोपनिषदें ॥ निखळबोधभरितेंपदें ॥ तोबोधअव्यग्रनांदे ॥ अनुभवामृतींइये ॥ ७१ ॥ तेंइयास्वादासोंकलीं ॥ बाहिरजावोंविसरलीं ॥ ह्मणोनिबोधेंबुडिदिधली ॥ इयेचिग्रंथीं ॥ ७२ ॥ एवंयेथेंजेदाविलीखूण ॥ तेथेंचिबोधासीअवसान ॥ हेचिखूणन्याहाळून ॥ स्वरूपतालाभे ॥ ७३ ॥ लाधतांयेथीलखूण ॥ येणेंउपनिषदेंशोभायमान ॥ ह्मणोनबोधयाह्मन ॥ आणीकनाहीं ॥ ७४ ॥ बोलिलेंसेबोलीं ॥ परीबोधेंबुडीदिधली ॥ ह्मणिजेबोधेंनाहींदेखिली ॥ शब्दाचीसिव ॥ ७५ ॥ वस्तुकाळत्रयींसंचलीं ॥ अबोधदशानाहींदेखिली ॥ ह्मणोनिबोधेंदिधली ॥ बुडीग्रंथींइये ॥ ७६ ॥ अवलोकितांशास्त्रांतर ॥ बोधासीहोयविस्तार ॥ परीबोधाचेंविश्राममंदिर ॥ अनुभवामृतचिहें ॥ ७७ ॥ जेवींकल्पावधीनपावतां ॥ नसरेउदकाचीसवेगता ॥ तेवींबोधाचीशांतता ॥ अनुभवामृतहें ॥ ७८ ॥ अगाऐक्यतेसनचुकोन ॥ उदकेंजींतींआनआन ॥ परीपावतांकल्पावसान ॥ जैसेंहोये ॥ ७९ ॥ तेंमोडूननानात्वाचीखूण ॥ अवघेंएकार्णवजीवन ॥ तेंचिबोधावसान ॥ अनुभवामृतहें ॥१८०॥ नातरीवेदरायाचेंविश्रामस्थान ॥ दशोपनिषदार्थअतिगहन ॥ तेथीलसारभागहादशप्रकरण ॥ अनुभवामृत ॥ ८१ ॥ नातरीइयेवेदगर्भागिरीं ॥ अप्रवीणअनाधिकारी ॥ ह्मणोनबैसविलामहाद्वारीं ॥ निगमसारार्थहा ॥ ८२ ॥ तेंहेंअनुभवामृत ॥ येथेंबोधझालानिवांत ॥ बोधपणाचीमात ॥ सांडिलीतेणें ॥ ८३ ॥ सांडूनबोधेंबोधकपण ॥ उगमींचराहिलापुंजाळोन ॥ तोचिहासुधाब्धीगहन ॥ अनुभवामृतनामें ॥८४॥ नानाहेंअनुभवामृत ॥ अमृतहीयेणेंचिजित ॥ ह्मणोनिबोधजालाशांत ॥ इयेठाईं ॥ ८५ ॥ आतांऐसेंजेंअमृतपान ॥ येथेंअधिकारीजीवन्मुक्तजन ॥ ह्मणोनिदाविलीअसेखूण ॥ पुढिलियेपदीं ॥ ८६ ॥

**ज्ञानदेवोह्मणेश्रीमंत ॥ हेंअनुभवामृत ॥**
**सेऊनिजीवन्मुक्त ॥ हेंचिहोतु ॥ १९ ॥**

जोवैराग्यतीर्थींनाहाला ॥ गुरूसेवेसरतजाला ॥ हादेहदुर्गसांडिला ॥ उल्लंघोनि ॥ ८७ ॥ बोधथडियेउभाठाला ॥ चिदचिद्ग्रंथीसांडवला ॥ स्वात्मबोधींपहुडला ॥ असंशयेंजो ॥ ८८ ॥ इंद्रियग्रामवर्ततां ॥ नमोडेज्याचीनिश्चळता ॥ किंबहुनास्वात्मस्वरूपींरमतां ॥ वेळुफेडी ॥८९॥ नातरीज्ञानाग्निप्रज्वळिला ॥ सकळकर्मांचाहोमकेला ॥ अवघ्राणोनिसांडिला ॥ पुरोडाशुजेणें ॥१९०॥ मगहोतांहोमाअतीत ॥ उरलाग्रहेंवीणजोग्रहस्थ ॥ एवंऐसाजोजीवन्मुक्त ॥ तोपात्रयेथें ॥९१॥ तेणेंहेंश्रीमंतअनुभवामृत ॥ सेऊनजीवन्मुक्तताविसरिजेत ॥ स्वततेणेंचिहोइजत ॥ अनुभवामृतस्वयें ॥९२॥ नातरीहेंचितोजाला ॥ जालेपणासीविसरला ॥ पूर्वापरतेचाफिटला ॥ पांगत्याचा ॥ ९३ ॥ उदेलाप्रत्ययगभस्ती ॥ येथेंपूर्वींचनव्हतीराती ॥ ह्मणोनिलाजोनिसांडिली

ख्याति ॥ उदयाचीयेणें ॥९४॥ ह्मणोनजीवन्मुक्तींजीवन्मुक्तता ॥ श्रीमंतअनुभवामृतसेवितां॥ नुरेऐसेंआतां ॥ ज्ञानदेवोह्मणे ॥ ९५ ॥ जीवपणनाहींबांधलें ॥ मुक्तत्वकैंचेंआलें ॥ ऐसेंयेणेंकेलें॥ अनुभवामृतस्वादें ॥ ९६ ॥ कल्पादिअवसान ॥ चिन्मात्रसंचलेंचिजाण ॥ तेथेंजीवभूतकोण ॥ देहधारीजाला ॥ ९७ ॥ ह्मणोनिजीवितेंसीमरणनाहीं ॥ येथेंजीवन्मुक्ततातेकाई ॥ आतांइयेअ नुभवामृतडोहीं ॥ हेंचिहोतु ॥ ९८ ॥ नानाहेंअनुभवामृत ॥ कल्पांबुचिहाअमृतभरित ॥ हेंसे ऊनिजीवन्मुक्त ॥ हेंचिहोतु ॥ ९९ ॥ ऐसेंसिद्धांचेंनिरायें ॥ उभारूनिदयावाहे ॥ प्रतिज्ञाकेलीआ हे ॥ प्रसन्मोन्मुखें ॥२००॥आतांसाधनाचेनिपंथें ॥ कैवल्यमुक्तितेंइच्छितें ॥ तियेमुक्तिचेंचिभरि तें ॥ अनुभवामृतहें ॥ १ ॥ ऐसेंचिकांहींनिरूपण ॥ पुढिलियेपदेंकरून ॥ असेतेथेंअवधान ॥ सज्जनींदीजे ॥ २ ॥

**मुक्तिकीरवेल्हाळ ॥ अनुभवामृतनिखळ ॥**
**परीअमृताहीउठीलाळ ॥ अमृतेंयेणें ॥ २० ॥**

कैवल्यमुक्तिलागीं ॥ योगेंसिणतीयोगी ॥ तेंमुक्तिलेइलाअंगीं ॥ अनुभवामृतचिहा ॥ ३ ॥ नानालेइलाहेंह्मणोंकाई ॥ कैवल्यसमुद्रहाचिपाहीं ॥ बुडालियाइयेडोहीं ॥ हेंचिहोइजे ॥ ४ ॥ अहोकोठूनकोठेंयावें ॥ मगबुडीदेऊनिरहावें ॥ ऐसेंयेथेंनसंभवे ॥ स्वात्मानुभवसागरीं ॥ ५ ॥ हाजोकांहींसिद्धांतु ॥ तोनव्हेपुस्तकजनितु ॥ कांनामनाचाहातु ॥ चोरूनिचिअसे ॥ ६ ॥ कांनामना वारून ॥ ज्ञेयज्ञानटाळून ॥ निर्वाळाजोआपण ॥ चिन्मयरूप ॥ ७ ॥ तेणेंचितोपाहाणा ॥ त्याचा चितयाउगाणा ॥ तोहाचिसुखाब्धिजाणा ॥ अनुभवामृत ॥८॥ तयारूपाह्निपाहीं ॥ कैवल्य दुजेंनाहीं ॥ तद्रूपचिहाकांहीं ॥ अनुभवामृत ॥ ९ ॥ येमुक्तीसीलाधतां ॥ जालेपणनयेचिहा तां ॥ इयेमुक्तीनेमुक्तता ॥ देखिलीचनाहीं ॥ २१० ॥ नानामुक्तपणेंमुक्तिवेल्हाळी ॥ तेअनुभवा मृतींसांठवली ॥ मुक्तित्वसांडूनिजाली ॥ अनुभवामृतचितें ॥११॥ अगाअमृतपणेंवीण ॥ मुक्ति तेअमुक्तिचजाण ॥ अमृताचेंहीजीवन ॥ अनुभवामृतहेंजे ॥ १२ ॥ एवंयेथेंजंप्रतिपाद्यकांहीं ॥ तें अंगेंजंवघडलेंनाहीं ॥ तंवमुक्तत्वजेंमानिलेंकांहीं ॥ तेंअमुक्तचिकीं हो ॥१३॥ ऐसेंहेंअनुभवामृत ॥ यासीअमृतहीसेऊंइच्छित ॥ तेंअमृतऐसेंख्यात ॥ परीअविनाशीनव्हे ॥१४॥ कांजेंपदार्थांचेंमाथां॥ काळाचीअसेसत्ता ॥ अविधिपुरलियाध्याता ॥ प्रवर्ततुअसे ॥१५॥ असोजरींदेहींबुद्धि ॥ तरीअमृ तींहीअमृतसिद्धि ॥ एवंआत्मानुभवींत्रिशुद्धीं ॥ देहचिकैंचा ॥ १६ ॥ जरीदेहींनाहींदेहपण ॥ तरीअमृतासीचआलेंमरण ॥ आटलियाघटजीवन ॥ घटसूर्यकैंचा ॥ १७ ॥ नातरीहेंअमृतजरी सांचुलें ॥ तरीप्रळयांतींकायजालें ॥ अमरगणेंसीमेलें ॥ आपणथितें ॥ १८ ॥ ह्मणोनितेंमरणा सीभयाभीत ॥ याअनुभवामृतासीवांछित ॥ पावलेंतरीचुकत ॥ त्याचेंहीमरण ॥ १९ ॥ आशं का ॥ नाहोस्वात्मानुभवाचीखूण ॥ सर्वदासरिसीचजाण ॥ तेंआपणयाआपण ॥ भोगेंवीणभोगे ॥ २२० ॥ आपणयाआपण ॥ भोगितुसेभोगेंवीण ॥ तरीयाग्रंथाचाकोण ॥ विशेषआतां ॥ २१ ॥ इयेआशंकेपरिहरण ॥ इयेचिविषईंनिरूपण ॥ पुढेंबोलतुसेजाण ॥ तेथेंअवधानदीजो ॥ २२ ॥

**निशींचाचंद्रहोये ॥ परीपुनीवेआनुआहे ॥**
**हेंकांमींह्मणोलाहें ॥ सूर्यदिठी ॥ २१ ॥**

निरंतररात्रीच्याठाईं ॥ चंद्रअसेहेंआननाहीं ॥ परीपौर्णिमेचीकांहीं ॥ वेगळीशोभा ॥ २३ ॥

दृष्टिसर्वदादेखणीअसे ॥ परीसूर्योदयींविशेषदिसे ॥ तेवींसुखजैसेंतैसें ॥ परीदुणावेयेथें ॥२४॥ चंद्रदृष्टांतादीधला ॥ तोनावेकदिसेवायिला ॥ ह्मणोनिदृष्टीचाप्रत्ययोदाविला ॥ अंगिचाअंगीं ॥ २५ ॥ जेदिवाआणिरजनी ॥ सूर्येंदृष्टिदेखणी ॥ तऱ्हींसूर्योदईदुणी ॥ शोभावाढे ॥२६॥ तेवीं गुरुकृपाआथिलेन ॥ निरंतरचिहासुखघन ॥ आणितोकृपाअर्कुंचिहाजाण ॥ अनुभवामृत॥२७॥ हाप्रकाशतांतरणी ॥ सुखतेंचिपरीचढेदुणी ॥ एवंदाविलीयेथीचाश्रवणीं ॥ सादरतापेसी॥२८

**प्रियासाबायिलीहोये ॥ तैंअंगिचेंअंगींनसमाये ॥**
**येऱ्हवींतेथेंचिआहे ॥ तारुण्यकीं ॥ २२ ॥**

तारुण्याचाभरु ॥ अंगिचाअंगींस्थिरु ॥ असोनिघेतसेपसरु ॥ प्रियेच्यामिळणी ॥ २९ ॥ ते वींइयेग्रंथींमिळणी ॥ आनंदाआनंदाचीधणी ॥ घेऊनिवेल्हावणी ॥ दावितुअसे ॥ २३० ॥

**वसंताचाआला ॥ फळींफुलींआपला ॥ गगनाचियाडाळा ॥**
**पैलतीझाडें ॥ २३ ॥ ययालागींहेंबोलणें ॥ अनुभवामृतप**
**णें ॥ स्वानुभूतिपरिगुणें ॥ वोगरिलें ॥ २४ ॥**

झाडाचेंपुष्पफळ ॥ तेंझाडींचअढळ ॥ परीवसंताचीवेळ ॥ आगळीकदावी ॥ ३१ ॥ अगा झाडींचीचडाले ॥ परीवसंताचेंनिमेळें ॥ कवळितीअंतराळें ॥ ठाईचिअसोनि ॥ ३२॥ तेवींआ पलाआपणप्रकट ॥ स्वानुभवेंअसेसदट ॥ परीबोलिलोंदेऊनिपुट ॥ अनुभवामृतैक ॥ ३३ ॥ नातरीस्वानुभवसंचला ॥ असोनितेणेंचितोपरवडिला ॥ परवडूनवोगरिला ॥ तयासीतोचि ॥ ३४ ॥ नातरीबोलणेंआणिभोक्ता ॥ दोन्हींहोऊनिवाढिता ॥ भोग्यभोक्तृत्वाचीकथा ॥ येवों चिनेदी ॥ ३५ ॥ नानास्वतास्वानुभूती ॥ परिगुणोनिपेसीयारीति ॥ वोगरिलेंतयेप्रती ॥ तये सीचिपाहा ॥ ३६ ॥ ह्मणोनिअनुभवअसेसिद्ध ॥ परीअनुभवामृतींविशेषस्वाद ॥ ओगरिला हापूर्णआनंद ॥ आनंदामाजीं ॥ ३७ ॥ आतांलाधतांहास्वाद ॥ मोडतीअधिकारभेद ॥ ऐसें चिकांहींविशद ॥ बोलतुअसेपुढां ॥ ३८ ॥

**आणिमुक्तमुमुक्षुबद्ध ॥ हेतंववरीयोग्यताभेद ॥**
**अनुभवामृतस्वाद ॥ विधुरजव ॥ २५ ॥**

असोयेथेंग्रंथेंकरून ॥ स्वानुभूतिनिचाडअसोन ॥ आपलेंआरोगण ॥ आपणचिकरी ॥ ३९ ॥ आणिसचाडहीहोऊनि ॥ सेवितीहेसंजीवनी ॥ त्याचीहीचाडसरोनि ॥ ऐसेंहोये॥ २४० ॥एक मुक्तएकबद्ध ॥ एकमुमुक्षुऐसेभेद ॥ हेमासलेविविध ॥ विरोनिजाती ॥ ४१ ॥ ह्मणोनिअनुभवा मृतस्वादजिहीं ॥ आळुमाळहीचाखिलानाहीं ॥ मुक्तमुमुक्षुबद्धपाहीं ॥ तंववरीभेदु ॥ ४२ ॥ येणेंस्वादेंविधुरअसती ॥ तेइतस्ततभेदेंभ्रमती ॥ ययास्वादींजेसज्ञहोती ॥ तेथेंभेदुकैंचा॥४३॥ लाधलीजैंहेखूण ॥ तैंअधिकारभोगीकवण ॥ देखिलेंनाहींआन ॥ प्रत्ययेंकधीं ॥ ४४ ॥ एवंहेंअ धिकारमासलें ॥ जैंअनुभवामृतींमिळालें ॥ तेहींहोऊनिठेलें ॥ अनुभवामृतचि ॥ ४५ ॥

**गंगावगाहानाआली ॥ पाणीयेंगंगाजाली ॥**
**कांतिमिरेंभेटलीं ॥ सूर्याजैसीं ॥ २६ ॥**

नद्यादिसंभार ॥ पावलेंजैंगंगानीर ॥ तैंगंगाएकियेर ॥ पाणियेंकैंची ॥ ४६ ॥ पाणीयेंपाणी

अवगाहिलें ॥ हेंहीयेथेंनाहींउरलें ॥ तैसेंयेणेंकेलें ॥ अनुभवामृतस्वादें ॥ ४७ ॥ किंवातमेंहोइजे सूर्याकडें ॥ तैंतमचिकोठूनिनिवडे ॥ तेवींअधिकारभेदाघडे ॥ अनुभवामृतींइये ॥ ४८ ॥

**नाहींपरिसाचीकसवटी ॥ तंववरीचवानियांच्यागोठी ॥ मगपंधरावयाच्यापाठीं ॥ बैसावेंकीं ॥ २७ ॥ तैसेंजयाअ खरा ॥ भेटतीगाभारां ॥ तेवोघजैसेसागरा ॥ आंतुआ लें ॥ २८ ॥ जैशाअकारादिअक्षरा ॥ भेटतीपन्नासहीमात्रा ॥ तैसेंयाचराचरा ॥ दुसरेंनाहीं ॥ २९ ॥**

परिसाचीकसवटीकसूनि ॥ पारखिजेतीहीणाउत्तमावानी ॥ तैंसाडेपंधरांवांचूनि ॥ दुजें कैंचें ॥ ४९ ॥ यालागींपरिसाचीकसवटीजंवनाहीं ॥ तंववरीचवानींभेदपाहीं ॥ तेवींयेथीचा रसुजिहीं ॥ चाखिलानाहीं ॥ २५० ॥ तयामुक्तमुमुक्षुआणिबद्ध ॥ वास्तवेंवीणजेंवानींभेद ॥ जो गाऊनिवाद ॥ वाढतअसेजो ॥ ५१ ॥ स्वरूपनहोनिविलक्षण ॥ वानिभेदजेवाचारंभण ॥ केवळ अक्षराचेंउच्चारण ॥ वाढलेंजें ॥ ५२ ॥ त्याशब्दींचिशब्दत्वनाहीं ॥ ऐसेंयेथेंचिपडिलेंठायीं ॥ मा मिळावेंतेंकाइ ॥ अर्थेंवीण ॥ ५३ ॥ अगाअक्षरेंस्वगर्भीभेटलीं ॥ ह्मणिजेअकारींअवघींमिळालीं ॥ तैंसहजचिमोडूनगेली ॥ शब्दाचीखूण ॥५४॥ आतांकेवळजोआकार ॥ तोस्वस्थानींजालास्थीर॥ सेविलेंविश्राममंदीर ॥ ॐकाराख्य ॥ ५५ ॥ नातरीवर्णभेदेंवीण ॥ निखळअकारुचिजोजाण ॥ तोमोडूनिराहिलाखूण ॥ ॐकाराचीही ॥५६॥ आतांमात्रात्रयेंगळित ॥ केवळऔकारअर्थमात्र ख्यात ॥ अकारसांठवलानिश्चित ॥ स्फुरणमात्रींतियें ॥५७॥ तेथेंध्वनीहीमोडूनिगेला ॥ बिंदुनादें सीविराला ॥ आतांशस्यंशनिराळा ॥ अनुभवाख्यजो ॥ ५८ ॥ एवंअक्षरेंमिळालींगाभारा ॥ मोडलाशब्दाचापसारा ॥ मगअनुभवामृताचियाघरा ॥ नयेतांचिआलें ॥ ५९ ॥ जेवींवोघ पाणीचिअसोनि ॥ आलेंसिंधुच्चियेमिळणी ॥ तेवींवाणीभेदसरोनि ॥ आलेंयेथें ॥ २६० ॥ अहोअनुभवामृताख्यरस ॥ तेंचिशब्दींवोतोनिमुस ॥ आलेंअनुभवामृतास ॥ भेटावया ॥६१॥ आतांशब्दचिजरीअशब्द ॥ तरीमुक्तमुमुक्षादिभेद ॥ तेभेदचिअभेद ॥ नकरितांजाले ॥ ६२ ॥ एवंमुक्तमुमुक्षादिजोध्वनी ॥ तोध्वनिचिजालाअध्वनी ॥ मगअनुभवामृताच्चियेमिळणी ॥ नयेतांआलें ॥ ६३ ॥ नातरीमुक्तमुमुक्षादिप्रचारू ॥ हाशब्दाचाजोउपचारु ॥ तोतैसा चिअसोनिमोडलाहीरु ॥ लाधतांखूण ॥ ६४ ॥ जेवींसाखरेचेगजघोडे ॥ हाशब्दजरीन मोडें ॥ तऱ्हींभोक्तयासीआवडे ॥ साखरमात्र ॥ ६५ ॥ किंवागंधर्वनगरीचेहुडे ॥ हेशब्दा चेपवाडे ॥ नमोडतांचिनघडे ॥ भाव्यार्थतेथें ॥ ६६ ॥ तेवींमुक्तमुमुक्षुशब्द ॥ हेजेवाणीभेद ॥ लाधतांअमृतानुभवस्वाद ॥ हेचझाले ॥ ६७ ॥ असोवोघमिळालेसागरा ॥ तेवींशब्दमिळोनि गाभारां ॥ येतांअनुभवामृताचियाघरा ॥ हेंचिहोती ॥ ६८ ॥ एवंहेंअनुभवाचीखूण ॥ अनुभ वामृतींचिलाधेजाण ॥ इयेविषईंनिरूपण ॥ अवधाराहोजी ॥ ६९ ॥

**जैसितयेईश्वरीं ॥ अंगोळिनुभेचिदुसरी ॥ किंबहुनासरोभरी ॥ शिवेंशिचि ॥ ३० ॥**

ईश्वराचीसंज्ञादावावी ॥ तरीएकिअंगोळीउभारावी ॥ तेवींस्वात्मानुभवाचीदीवी ॥ हेंचिए कि ॥ २७० ॥ किंबहुनानिखळसदाशिव ॥ तोचिहाअमृतानुभव ॥ समाधानाचाठाव ॥ हाचि

एक ॥ ७१ ॥ अगास्वात्मसुखलाधावेंव्हावें ॥ तरीहेंशास्त्रआस्वादावें ॥ व्युत्थानेंसीविसर्जावें ॥ समाधिसयेथें ॥७२॥ केलियाअनुभवामृतपान ॥ समाधिपावेसमाधान ॥ दोन्हीदशासांडून॥ हेचिहोये ॥ ७३ ॥ सांडूनसविकल्पनिर्विकल्पपण ॥ सहजसमाधिहाजाण ॥ येथीललाधतां खूण ॥ हेंचिहोइजे ॥ ७४ ॥ अहोहेंआत्मारामैकस्थान ॥ आत्मारामाचेंचिरमण ॥ ऐसेंबोलूनिउ पसंहरण ॥ अवसानकेलें ॥ ७५ ॥

**ह्मणोनिज्ञानदेवोह्मणें ॥ अनुभवामृतेंयेणें ॥**
**सणुभोगिजेसणें ॥ विश्वाचेनि ॥ ३१ ॥**

अगाविश्वाचासण ॥ ह्मणिजेविश्वजेणेंसुखघन ॥ किंबहुनाचेतन ॥ चित्तादिकांचेंजें ॥ ७६ ॥ नानाचळनाचेंहीचेतन ॥ जोपरपुरुषुसंधिहीन ॥ तोहीसुखावेजाण ॥ येथीलसुखें ॥ ७७ ॥ मा येराचापाडकोण ॥ केवळसुखीहीयेणेंसुखघन ॥ ह्मणोनिसर्वदासेव्यजाण ॥ ग्रंथराजुहाकीं ७८ नानापरमात्माजऱ्हींपरिपूर्ण ॥ तऱ्हींहेंशास्त्रतेथिंचेंरमण ॥ सुखसुखाचीआरोगण ॥ येणेंग्रंथें ॥७९॥ स्वरूपअसोनिजैसेंतैसें ॥ याग्रंथाचियेलालसें ॥ आपणचिहोतसे ॥ भोग्यभोक्तें ॥२८०॥ ह्मणोनिश्रीग्रंथाचार्य ॥ ज्ञानदेवजेज्ञानाचार्य ॥ ऐसेंह्मणितिलेंवर्य ॥ वचनद्वारा ॥ ८१ ॥ नानाहाअनुभवामृत ॥ नव्हेवचनैकसंकेत ॥ कांजेंपूर्वीचखुंटिलायेथ ॥ शब्दहीरु ॥ ८२ ॥ अहोशब्दाचेंखंडण ॥ पूर्वीचकेलेंप्रस्थान ॥ ह्मणोनहेंवचनेंवीण ॥ ग्रंथाचीरचना ॥ ८३ ॥ किंवा हाग्रंथकांहीं ॥ रचिलेंवीणरचलापाहीं ॥ अर्थठाईंचाठाई ॥ संचलासे ॥ ८४ ॥ ह्मणोनहेंप्रक र्ण ॥ ग्रंथमाहात्मैकखूण ॥ दाहावेंअवसान ॥ येथवरीआलें ॥ ८५ ॥ अहोहाअमृतार्णव पूर्ण ॥ येथेंकल्पार्णवाचीमोडिलीखूण ॥ सर्वदासंधीहीन ॥ सरलाचिअसे ॥ ८६ ॥ इयें सुधारसडोहीं ॥ प्रकर्णप्रांतुकांहींनाहीं ॥ परीनिरूपणप्रवाहीं ॥ प्रकर्णसंधी ॥ ८७ ॥ ह्मणोन दशधाभेदहीन ॥ ग्रंथराजदशप्रकर्ण ॥ यांतुनवांभक्तिवरिलजाण ॥ दाहाविहेस्थिती ॥ ८८ ॥ तेंहेंदाहावेंप्रकर्ण ॥ संपविलेंयेथेंविवरण ॥ येणेंप्रीतिपावोपूर्णे ॥ परमपुरुषीं ॥ ८९ ॥ अ होज्ञानाज्ञानशून्य ॥ ज्ञानमात्रचिपरिपूर्ण ॥ ज्ञानेश्वरेंहेखूण ॥ दाविलीजना ॥ २९० ॥ तयाचा विलासुजाण ॥ नित्यानंदेंकहेजेखूण ॥ केलेंहेंविवरण ॥ अवलोकनद्वारा ॥ ९१ ॥ एवंनित्यानंदें भरित ॥ पावलोंहाविवरणप्रांत ॥ येणेंप्रीतिपावोश्रीमंत ॥ ज्ञानाधिराज ॥ ९२ ॥ नातरीहाआ नंदार्णवअपार ॥ जियेआनंदींचापाझर ॥ तोनित्यानंदनिरंतर ॥ प्रीतिपावोयेथें ॥ ९३ ॥ जेवीं हातींघेऊनिआरति ॥ वोवाळिजेगभस्ति ॥ किंवाचुळोदकेंआपांपती ॥ तृप्तिकीजे ॥ ९४ ॥ ते वींआपोंनतेथींचेंतेथें ॥ संतोषीजेभुवननाथें ॥ जोपुंडलिकाचेनिचित्तें ॥ आकळूनिधरिला ९५ कांजेंचित्तींचाजोचैतन्य ॥ ह्मणोनफांकोनसकेचिजाण ॥ उभापदद्वयजोडून ॥ श्रद्धेइटेवरी ९६ मोडूनिक्षराक्षराचाभाव ॥ दाविलाउत्तमतेचाठाव ॥ ह्मणोनिसमपदाचीराणीव ॥ दाविलीते णें ॥ ९७ ॥ नानासच्चिदानंदपदाचाविवादु ॥ सांडूनिनिखळचिदाविलाआनंदु ॥ ह्मणोनिपाणि द्वयेंमधु ॥ सोडिलानाहीं ॥९८॥ नातरीभासताचिद्विलासभान ॥ चिन्मात्राचीएकलीचखूण ॥ ह्मणोनपीतांबराचेंपांघरूण ॥ केलेंदेवें ॥ ९९ ॥ नानापीतांबराचीझळाळ ॥ तोडीअंधकाराचें मूळ ॥ जेवींरवीचेंराउळ ॥ नसेवितेंतम ॥ ३०० ॥ आतांसंतोषाचीखूण ॥ काळत्रयींनव्हेअवि च्छिन्न ॥ ह्मणोनसर्वदाहास्यवदन ॥ प्रसन्नोन्मुख ॥ १ ॥ तैसेंचिदृश्यात्रद्रष्टेपण ॥ तेथेंनाहींमी ळनोन्मीळण ॥ नानादेखणाकमळनयन ॥ देखणेंचिमात्र ॥ २ ॥ ह्मणोनिटवकारलेंनिनयनें ॥ न

यनींगोविलींमुनिमनें ॥ येथेंनयनाचींचझणें ॥ धरालखूण ॥ ३ अहोहानयनाचाहीनयन ॥ ना तरीश्रवणाचाहीश्रवण ॥ नातरीसकळाहीजाण ॥ सकळनहोनिहोये ॥ ४ ॥ यावरीमस्तकाची पदवी ॥ तेकैसेनिआतांवर्णावी ॥ तमैवोवाळिजेरवी ॥ हेंकायघडे ॥ ५ ॥ अहोपावतांठावो ॥ परादिकांकैचाउगवो ॥ आतांवर्णनाचाप्रस्तावो ॥ राहिलासहज ॥ ६ ॥ पावतांकल्पां तजळ ॥ कैचेंतेथेंनदीवोहाळ ॥ तेवींसिरोभागचीझळाळ ॥ दुमदुमोनिठेला ॥ ७ ॥ तेथेंकोणीएकउत्तमांग ॥ येरअवघाअधोभाग ॥ हेअवघीलगबग ॥ लाजोनिठेली ॥ ८ ॥ आतां याझळाळेभीतरीं ॥ दिसावयाचीचअवसरी ॥ नानास्वानंदक्षीरसागरीं ॥ पहुडलेहरी ॥ ९ ॥ शांतिलक्ष्मीयेचेसेजे ॥ स्वरूपनिद्राकेलीवोजे ॥ आतांतेणेंसीचविराजे ॥ आथिलेनिप्रेमें॥३१०॥ भावपुंडलीकाजवळी ॥ नामघोषाच्याकल्लोळीं ॥ प्रेमळेंसीकेलीं ॥ कौतुकेंपुरवी ॥ ११ ॥तोहा सगुणनानिर्गुण ॥ सगुणानिर्गुणाविहीन ॥ निखळचिदानंदचिद्धन ॥ प्रीतिपाविजेतेणें ॥ १२ ॥ जेवींगुडाचियादेवा ॥ गुडनैवद्यसमर्पावा ॥ तेवींयेणेंस्तोत्रेंसंतोषावा ॥ कैवल्यपति ॥ १३ ॥ आतांग्रंथाचाप्रांत ॥ अवांकिलातात्पर्यार्थ ॥ नित्यानंदअद्भुत ॥ लाधलेनि ॥ १४ ॥ तोअन्यथा कधींनोहे ॥ परीनावेकलीळेंनिविग्रहें ॥ दावितांहीअनारिसेंनव्हे ॥ संचलेपण ॥ १५ ॥ तस्मा त्पूर्वापरतेवीण ॥ चिन्मात्रसंचलेंपरिपूर्ण ॥ तयाजाणावयाजाण ॥ दुजेंनाहीं ॥ १६ ॥ जाणत याजाणणयांदोहीं ॥ धर्माधर्मत्वनाहीं ॥ ह्मणोनिजयातयाप्रवाहीं ॥ पालटुचिनधरी ॥ १७ ॥ स्वरूपअनारिसेंनहोनि ॥ उमटतीनानात्वाचीयावाणी ॥ इयेचिखुणेपाहिजेन्याहाळुनि ॥ तरी नानात्वकैचें ॥१८॥ अगासृष्टीच्याआगमींअपाई ॥ प्रत्ययोअन्यथाजालानाहीं ॥ हेंहीपडिलेंठाई॥ तेणेंचिप्रत्ययें ॥ १९ ॥ नानाहाजोप्रत्ययमात्रकांहीं ॥ येथेंआदिअवसानेंसीसृष्टिनाहीं ॥ आणि नसोनिविलासलेंजेंकांहीं ॥ तेंतेथेंचिउमटे ॥ ३२० ॥ ऐसासिद्धप्रत्ययोजोकांहीं ॥ तेणेंचितो पाडिजेठाई ॥ ह्मणोनशरणरिघावेंपाई ॥ सद्गुरुच्या ॥ २१ ॥ नातरीप्रत्ययाचेंसदन ॥ जेंचिदा नंदचिद्धन ॥ जेणेंप्रकाशेजाण ॥ शरणशरण्यभाव ॥ २२ ॥ तेंसद्गुरुचेंरूपजाण ॥ तेंचिशरणरि- घावयाचेंस्थान ॥ आणिशरणभावाचेंहीउत्पादन ॥ तेथेंचिहोये ॥ २३ ॥ असोतेथेंचिझराउम टला ॥ तोहाअमृतेंसागरभरला ॥ जोनित्यानंदुचिसंचला ॥ अनुभवांमृताख्य ॥ २४ ॥ जेणें आह्मासीआह्मीपण ॥ अहंप्रत्यायाचीनित्यखूण ॥ ह्मणोनिनित्यानंदपरिपूर्ण ॥ काळत्रयातीत ॥ २५ ॥ अहोपसरलेंपदेपद ॥ परीनमोडेनित्यानंद ॥ कांजेंपदभेदेंअभेद ॥ एकपणजेथींचें॥२६ ह्मणोनशरण्यभावसारून ॥ त्याचाजालोंशरण ॥ मगलाधलोंपसायदान ॥ अनुभवामृतहें॥२७॥ मागेंउपमन्याचियेआळीसाटी ॥ दीधलीक्षीरसागराचीवाटी ॥ परीतेहीह्मणोंयेथेंकुटी ॥ येणें पाडें ॥ २८ ॥ कांजेंययाअनुभवामृतासाठीं ॥ क्षीरसिंधुहींलाळघोटी ॥ माउपमन्याचीगोठी ॥ केऊतियेथें ॥ २९॥ अगाचंद्रमादीजेखेळणा ॥ परीतोहीयेणेंमानेंसाना ॥ चंद्रयेथींचापोसणा ॥ चंद्रिकालाभे ॥ ३३० ॥ ह्मणोनिकृपाळुगुरुजननी ॥ अनुभवामृतेंकासघालोनि ॥ मजस्तनपा नदेऊनि ॥ तद्रूपताकेली ॥३१॥ नातरीश्रीनित्यानंदचरणीं ॥ हेंविवरणमंदाकिनी ॥ किंवाउत्फ ळलीहृत्कमळणी ॥ कृपाकिरणस्पर्शे ॥ ३२ ॥ मंदाकिनीमज्जनकीजे ॥ भ्रमरहोऊनिकमळींव सिजे ॥ तरीहेखूणलाहिजे ॥ नित्यानंदैक ॥ ३३ ॥ एवंनित्यानंदमजजीवन ॥ नित्यानंदमजमी पण ॥ ह्मणोनिसर्वकाळकल्याण ॥ असिजेशिवें ॥ ३४ ॥ यानित्यानंदाचापाई ॥ कल्याणावीण काई ॥ ह्मणोनियेथेंचिपाहीं ॥ करावित्स्ती ॥ ३५ ॥ येथींचेवस्तिकरूव्हावें ॥ नित्यानंदेंकरी जियावें ॥ प्रारब्धसोडूनद्यावें ॥ येचितिर्थीं ॥ ३६ ॥ हेंतीर्थनव्हेनातीर्थफळ ॥ निखळनित्यानं

